# होळकरांची कैफियत


संशोधन व टीपा

यशवंत नरसिंह केळकर








प्रकाशक — सदाशिव लक्ष्मण कोकाटे,
हनुमान प्रकाशन कार्यालय, पुणे २.

मुद्रक — भाऊ लक्ष्मणराव कोकाटे,
हनुमान छापखाना, ३०० सदाशिव, पुणे २

प्रथमावृत्ति ]　　किंमत ५ रुपये　　[ सन १९५४

# प्रस्तावना

"होळकराची कैफियत" ही बखर कै. का. ना. साने यांनी काव्येतिहास संग्रहात शके १८०८ म्हणजे सन १८८६ साली प्रथम प्रसिद्ध केली अर्थात् त्याला ६८ वर्षे होऊन गेलीं. त्यानंतर तिचें पुनर्मुद्रण केव्हांहि झालें नाहीं. वास्तविक ही बखर काव्येतिहास–संग्रहात प्रसिद्ध झालेल्या इतर सर्व बखरीपेक्षां मोठी आहे. एवढेच नव्हे तर उत्तमोत्तम म्हणून प्रसिद्धी लाभलेल्या भाऊसाहेबांच्या बखरीच्या तोडीची ती आहे असे असता ती मागे पडली, याचीं आमच्या मते मुख्य दोन कारणें संभवतात. त्यापैकी पहिले हें कीं, मराठी इतिहासकारांनीं शिंदे होळकर घराण्याची वारवार तुलना करून होळकराची कृत्ये सारीं स्वार्थमूलक तर शिंद्याचीं कृत्ये तेवढीं सारीं उदात्त, स्वामिनिष्ठेचीं असे रंगविण्याचा प्रघात पाडला. यामुळें होळकर बदनाम झाले व त्यांच्या विषयींची बखर आवर्जून वाचण्यास लोकास उल्हास वाटेनासा झाला. दुसरें कारण म्हटले म्हणजे भाऊसाहेबाच्या बखरींत शिंद्याना पानपत प्रसंगामुळें मिळालेली अभिलषणीय बैठक. त्या बखरीचा शेवट भाऊगर्दीच्या वीरकरुण प्रसंगानें झालेला असल्यामुळे त्याचे आकर्षण केव्हांहि स्वाभाविकच अधिक वाटते वास्तविक ती बखर म्हणजे होळकराच्या कैफियती-सारखीच शिंद्याची कैफियत आहे व तिला 'शिंद्याची कैफियत' किंवा 'शिंद्याची बखर' असेंच नाव देणे योग्य झालें असते. परंतु तिचा शेवट भाऊसाहेब पेशव्यांच्या पानपत स्वारीनें झालेला असल्यामुळे व सान्यांना उपलब्ध झालेल्या पुणें येथील प्रतीच्या १२७ व्या बंदाच्या डोकीवर 'बखर भाऊसाहेबाची' असें लिहिलें होतें तेवढ्याच्या आधारावर सान्यांनी त्या बखरीला भाऊसाहेबाची बखर असें आकर्षक नाव दिलें इतकेंच.

तें कसेंहि असो, होळकराची ही कैफियत इतिहास व वाङ्मय या दोन्ही दृष्टींनीं भाऊसाहेब बखरीइतकीच सरस असल्यामुळें या बखरीचें पुनर्मुद्रण करण्याची कल्पना मी माझे स्नेही हनुमान प्रकाशन संस्थेचे मालक यास सुचविली. ती त्यास पसंत पडून त्यांनीं बखर पुनर्मुद्रित करण्याचें ठरविलें. ६८ वर्षांपूर्वी सान्यांनीं केलेलें या कैफियतीचे संपादन त्यांच्या लौकिकास शोभण्यासारखेच टापटिपीचें होतें. त्यांनीं अनेक प्रति जमवून शुद्धाशुद्ध ठरवून आणि अर्थनिर्णायक व आवांतर माहितीच्या विपुल टीपासह ही होळकराची कैफियत प्रसिद्ध केली होती. फार परिश्रम घेऊनहि बखरींतील अनेक ठिकाणीं शब्दार्थांच्या वा इतर चुका राहिल्याची जाणीव साने यांना होती.

बखरींतील तशा अनेक चुका पुढें सान्यांचे इदूरकर मित्र श्री. बळवंत कमळाकर यांनीं त्यांच्या नजरेस आणल्या व चुका दुरुस्त करून त्याचें टिपणहि त्यांनीं साने यांजकडे पाठविलें. नतर साने यांनीं सशोधकाच्या निराग्रह बाण्यास अनुसरून तें सर्व टिपण काव्येतिहास-सग्रहात 'शुद्धीकरण व अधिक टिप्पणे' या मथळ्याखालीं छापूनहि काढलें होतें. तथापि इतके करूनहि होळकर कैफियतींत पुष्कळच चुका शिल्लक राहून गेल्या. गेल्या ६८ वर्षांत महाराष्ट्रात ऐतिहासिक साधन वाङ्मय प्रचड प्रमाणांत प्रसिद्ध झालें आणि अभ्यासहि त्या प्रमाणांत वाढला व त्यामुळेंच सान्यांच्या मूळ होळकर कैफियतींत राहिलेल्या चुका आता दुरुस्त करता येऊ शकल्या व बखरींतील मजकुराला विपुल प्रत्यतर पुरावेहि देता येऊ शकले.

सान्यांच्या होळकर कैफियतीत पृष्ठ ४९ वर परिच्छेद तोडला आहे, त्यापुढील मधला बराचसा मजकूर गहाळ झाल्याचे त्यानीं पुढीलप्रमाणें टीप लिहून कळविलें होते "येथें दुसऱ्या दोनही प्रती त्रुटित आहेत. वर आलेला मजकूर चौसष्टाव्या बदाच्या शेवटीं सपला. पुढे १०१ बदापर्यंत ३६ बद गहाळ झालेले आहेत. हे बद मिळविण्याची खटपट आमच्या हातून होईल तितकी आम्ही केली, पण ते मिळाले नाहींत. पुढेंही मिळतील अशी फारशी आशा नाही. तेव्हां हे प्रकरण असेंच त्रुटित प्रसिद्ध करणें भाग पडलें आहे मधील ३६ बद न मिळाल्यामुळे हिंदुस्थानातील वगैरे काहीं मसलतीत तुकोजीरावानें कोणता कार्यभाग कसा उरकला वगैरे हकीकत नाहींशीं झाली आहे. हा त्रुटित भाग कोणी इदूरकर मित्र मिळवून आमच्याकडे पाठवितील तर त्यांचे आम्ही अत्यत आभारी होऊं"

सुदैवानें कै. पारसनीस याना तो उपलब्ध झाला व त्यानी तो त्याच्या इतिहास-सग्रह पुस्तक ४ अक १, २, ३ (ऑगस्ट, सप्टेंबर व ऑक्टोबर) मध्यें प्रसिद्ध केला. पारसनीसांना बहुधा होळकराच्या कैफियतीची एखादी सपूर्ण प्रतच मिळाली असावी. ती सान्याच्या प्रतीशी ताडून पाहून सान्यांच्या प्रतींत जेवढा भाग गहाळ झाला होता तेवढाच त्यानीं नेमका प्रसिद्ध केला. पारसनीसांच्या इतिहाससग्रहात होळकर कैफियतींतील गहाळ झालेला तो मजकूर २४ पृष्ठे दिलेला आहे. "तो मी कुलदीपक कारकून उत्पन्न" या वाक्यापाशीं तो मजकूर सपतो. त्या खालीं त्यांनीं काहींच खुलासा केलेला नाहीं म्हणून आणखी काहीं शिल्लक राहिलेला मजकूर त्यांनीं पुढील अकांत छापला असावा कीं काय म्हणून आम्ही शोध केला. इतिहाससग्रहाचे अक तपासले. परंतु तसा मजकूर पुढें केव्हां छापलेला आढळला नाहीं. म्हणजे १ ते २४ पृष्ठें एवढाच मजकूर गहाळ झालेला होता असे दिसते फार तर एखाद दुसरीच ओळ राहिली असेल तर असेल. इतिहाससग्रहांतील तो सर्व मजकूर आमच्या होळ-

करांच्या कैफियतीच्या प्रस्तुतच्या आवृत्तींत आम्ही समाविष्ट केला आहे. यामुळें बखरीला पूर्णता आली आहे.

होळकर कैफियतीचा लेखक कोण असावा याचा सुगावा लागलेला नाहीं. कैफियतीच्या म्हणजे बखरीच्या समाप्तीपूर्वी लेखकाचा उल्लेख केलेला नाहीं. फक्त "अग्रे ईश्वरो वेत्ति भावी पदार्थ आगमन ऐकिले पाहिजे त्या धोरणावर इतिहास यच्चावत् लिहिला असे." येवढेच शब्द आहेत. तथापि बखरलेखक हा होळकरांचा पिढीजात नोकर आणि निकटचा विश्वासू मुत्सद्दी असला पाहिजे असे त्यानें बखरींत जे निरनिराळे प्रसंग तपशिलवार वर्णिले आहेत किंवा ज्या खासगत घराऊ बाबी त्यानें उल्लेखिल्या आहेत त्यावरून स्पष्ट दिसून येईल.

बखरीचा कर्ता किंवा लेखक कोण असावा याविषयीं एक तर्क मात्र आम्हास सुचला आहे. काव्येतिहाससंग्रह व भारतवर्ष यांत पूर्वी प्रसिद्ध झालेल्या साधनांची पुनरावृत्ति आणखी बऱ्याच नवीन पत्रांची भर घालून 'ऐतिहासिक पत्रव्यवहार' या नांवानें सरदेसाई, कुळकर्णी व काळे या संपादकत्रयीनें सन १९३३ सालीं प्रसिद्ध केली त्या पत्रव्यवहारात श्री. भा. रा. भालेराव यांच्या संग्रहांतील कांहीं पत्रें आहेत. त्यापैकीं पत्र नं. ३६७ व पत्र नं. ३९५ या पत्रांचा लेखक जो कोणी असेल तोच या बखरीचा लेखक असला पाहिजे असा संशय आम्हास येतो वास्तविक तीं पत्रें काशीराव व यशवंतराव होळकर यांच्या नांवाने लिहिलेलीं असलीं तरी त्यांचा मसुदा किंवा मजकूर जुळणी अर्थातच त्यांच्या पदरच्या दिवाणानें किंवा चिटणीसानें केलेली आहे. त्या पत्रांची भाषा आणि होळकराची कैफियत या बखरींतील भाषा हीं एका धर्तीची भासतात. बखरकार "या भावी" "समय समर्पक" इत्यादि जे शब्द वारवार वापरतो तेच शब्द नेमके या दोन पत्रांत आलेले आहेत, व मुख्यतः त्यावरूनच त्या दोन पत्रांचा जो कोणी लेखक असेल तोच होळकर कैफियत या बखरीचा कर्ता म्हणजे लेखक असला पाहिजे असे आम्हास वाटते.

बखर लेखक वृद्ध, माहितगार व होळकर कुळाचा अभिमानी आहेच. पण त्यांतल्या त्यांत तो यशवंतराव होळकराशीं निकट संबंध असलेला व त्याच्या पराक्रमामुळें त्यावर बेहद्द खूष असलेला, त्याला कांहीं ईश्वरी कृपाप्रसादच होता असे मानणारा होता. हे त्यानें यशवंतरावाविषयींच्या हकीकतींत ठिकठिकाणीं काढलेल्या उद्गारांवरून वाटते. राठोडाशीं होळकरांची जी एक सफेजंगीची लढाई झाली त्यांत बखरकारानें यशवंतरावांचा आवर्जून उल्लेख केलेला आहे. वास्तविक तेव्हां यशवंतराव अवघा १०-१२ वर्षांचा होता. बखरकार लिहितो, "निमे राहिले त्यांणीं हल्ला बापू होळकराचा गोल उठला हें पाहून पलटणचा मुकाबला सोडून यांजवर आले.

मेळामेळ होऊन चार घटका समरगणीं भाला, बंदुक यांचें काम पडलेंच नाहीं. एकमेकांचे गळां हात घालून घोड्याखालीं येऊन तरवार, कटार, दांत अशानिशीं रजपूत एक जाऊ न दिल्हा. चार पांचशें रांगडे खपू देऊन आपलेकडील महाळोजी पिंगळेसारखी दोन तीनशे नांवाची माणसे कामास आलीं. यशवंतराव महाराज, बारा वर्षांचें वय, प्रथम तरवार तेथें केली. ”

सन १९२६ सालीं श्री. अ. ना. भागवत व श्री. ना. के. भवरासकर यांनी 'भवानी शकर बक्षी यांची रोजनिशी' प्रसिद्ध केली ही रोजनिशी म्हणजे यशवंतराव होळकर व भवानी शकर बक्षी यांची बखरच आहे. त्या बखरीच्या प्रस्तावनेंत भागवत यांना उपलब्ध झालेल्या होळकरांच्या कैफियतीच्या एका निराळ्याच प्रतीचा उल्लेख आहे व ती होळकरांची कैफियत छापत असल्याची जाहिरातहि भवानी शकर बक्षीच्या रोजनिशीच्या पुस्तकाच्या पाठीमागें छापलेली आहे. तथापि त्यानतर ती होळकर कैफियत कधींहि छापून निघाली नाही भागवताची ती होळकर कैफियत व कै. साने यांनीं प्रसिद्ध केलेली होळकर कैफियत या दोन्ही एकच असण्याचा सभव आहे. भागवताची होळकर कैफियत छापली गेली असती तर कदाचित् त्यांत बखरीच्या लेखकाचे नाव सांपडण्याचा सभव होता.

पुणें, ता. २०-२-१९५४. य. न. केळकर

---

## प्रकाशकाचें निवेदन

साहित्यसम्राट कै. नरसिंह चिंतामण केळकर याचे सुपुत्र, इतिहास संशोधक श्री. यशवंत नरसिंह केळकर याचे सहकार्यानें आज होळकर कैफियत प्रसिद्ध करितांना विशेष आनंद होत आहे. या पुस्तकाची उपयुक्तता इतिहासज्ञच जाणू शकतील. या पुस्तकाचा खप अत्यल्प होणार हें माहीत असूनही किंमत शक्य तितकी कमी ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. शिक्षण सस्थांनीं मनावर घेतल्यास व त्या सर्व घेतील असा विश्वास जाणूनच पुस्तक-प्रसिद्धीचें धाडस केलें आहे. जनता-जनार्दन व शिक्षण सस्था या पुस्तकाच्या प्रति खरेदी करून माझ्या धाडसाचें कौतुक करतील असा विश्वास आहे.

पुणें, ता. १०-२-१९५४. प्रकाशक

# विषयानुक्रमणिका

## मल्हारराव होळकर

(१) मल्हारराव होळकराचें पूर्ववृत्त, बाल्य, नागाचा चमत्कार. (२) मल्हारराव पेंढारी पथकांत दाखल होऊन पेशव्याच्या नर्मदापार दिल्ली-स्वाऱ्यांत जातो, प्रत्यक्ष बाजीरावास ढेकूळ मारून आपल्या निधड्या छातीची परीक्षा देतो; होळकरांचा गोट लुटण्याचा पेशव्यांचा विचार व त्याचें पर्यवसान. (३) मल्हारराव बाजीरावास ओळ्या-कांठीं गाठून चकित करतो, बाजीरावानें केलेली मल्हाररावाच्या पराक्रमाची बूज, उभय-ताची शपथक्रिया, पाच हजार स्वारांची सरदारी मल्हाररावास देण्याचें बाजीरावाचें आश्वासन (४) बढवाणीची लढाई, मल्हाररावामार्फत तह ठरतो. (५) पेशव्याचा उदाजी पवारास सामील करून घेण्याचा प्रयत्न, उदाजीची मग्रुरी, नतर पेशवे मल्हारजी होळकरास बारगळाकडे मागतात व मल्हारजी पेशव्यांचा नोकर बनतो (६) पेशवे पवाराची मनधरणी करतात, तरी तो ऐकत नाहीं. सबब त्याचा नाद सोडण्याचा मल्हारराव इषारा देतो. पवाराचा पश्चात्ताप. (७) रजपूत संस्थानिकांचा पुढारी सवाई जयसिंग दिल्लीकराशीं बिघडतो, मराठ्यांची मदत चाहतो व त्यासाठीं बोलणीं करण्या-करिता नदलाल मडलोईस पाठवितो मडलोई घाटातील वाटा दाखवून सैन्य दया-बहादूरावर नेऊन घालण्याचें आश्वासन देतो. (८) मल्हारराव व उदाजी पवार दयाबहादूरावर धाड घालतात. लढाईत दयाबहादूर ठार होतो, धारेंत पेशव्यांची द्वाही फिरते, उज्जनीचा कबजा, माळव्यात मराठे दहशत पाडण्याकरता गढीवाल्याची क्रूर पारिपत्यें करतात, होळकराचें पुण्यास प्रयाण, पुण्याहून बाजीराव दिल्लीच्या स्वारीस निघतो, दिल्लीची लूट, जयसिंगाशीं सख्याचा करार, जयसिंगाकडून तीस लाखाची खडणी घेतात. (९) मल्हाररावाच्या खास शिफारसीनें राणोजी शिंदे हुजऱ्याचा सरदार बनतो (१०) माळव्यांतील उत्पन्नाच्या पेशवे, शिंदे, होळकर व पवार यांच्या वाट-ण्यांचें प्रमाण, सवाई जयसिंगाच्या मुलांतील भांडणें, रजपूत भांडणामुळें मराठ्यांचा राजपुतान्यांत प्रवेश (११) नानासाहेब पेशवा जयपूरवाल्यांच्या पारिपत्यास निघतो; ईश्वरसिंग व मल्हारराव होळकर यांची लढाई, बुंदीचें राज्य व २० लाख रुपये खडणी मिळते, बुंदीवर उमेदसिंग हाडे याची स्थापना. (१२) ईश्वरसिंगाचा विषप्रळय, माधो-सिंगाची स्थापना मल्हारराव करतो. शिंदे-होळकरांचें वैमनस्य सुरू, जयपूरवाल्यांनीं शिंद्याची केलेली कत्तल, मल्हारराव धुळेवाल्याची गढी काबीज करतो, जयपूरकर २५ लाख रुपये गुन्हेगारी देतात. (१३) मनसूरअल्लीचें मल्हाररावाकडे राजकारण, सादल-बादलाचे फौजेशीं युद्ध, सादलबादलाचा मृत्यु, पठाण रोहिल्यांशीं तह, शिंदे-होळकरांची दिल्लीपतीशीं भेट व खिलतचौघड्याची प्राप्ती (१४) निजामाची पेशव्यावर स्वारी, सुपा येथें रामदासपंतांनीं घातलेला छापा, गाजुद्दीखान यांस दक्षिणची सुभेदारी बहाल, औरंगाबाद मुक्कामीं गाजुद्दीखानास विषप्रयोग व त्याचा मृत्यु. मल्हारजी होळकर दिलेल्या

शपथेनुसार गाजुद्दीखानाचें प्रेत दिल्लीस पोंचवतें करतो. ( १५ ) कुंभेरीचा वेढा, खंडेरावाचा मृत्यु, मल्हारराव मथुरेहून दिल्लीवर धाड घालतो, मलकाजमानीची विटबना व मल्हाररावाचें आश्वासन. ( १६ ) मल्हारराव बादशहाकडून ८० लाखांचा ठराव करून घेतो. ( १७ ) मल्हाररावाची दादासाहेब पेशव्यांसह हिंदुस्थानावर स्वारी, नजीबास दिल्लीबाहेर काढले, मल्हाररावाची लाहोर सरहद्दपर्यंत स्वारी, दिनाबेग रुजू होतो. ( १८ ) भाऊसाहेब पेशवे मल्हारराव होळकरास दाबलेला ६० लक्षाचा पैका ओकावयास लावतात. मल्हाररावाची व भाऊसाहेबाची झटापट ( १९ ) मल्हारराव ६० लक्ष रुपयांचा भरणा पेशव्यास कबूल केल्याप्रमाणें विष्णू महादेव गद्र्यामार्फत करून देतो. ( २० ) शिंदे याच्या नजीब व गिलचे यांशीं लढाया, जनकोजीबाबा जखमी होतो, दत्ताजी शिंदे ठार होतो. ( २१ ) मल्हारराव, शिंद्यांच्या मदतीसाठी निघतो. रेवाडीस शिंदे–होळकर भेटी होतात, शिंदे-होळकराच्या नजीबाशीं झटापटी, होळकराकडील अन्याबा पळशीकर दिवाण व शेटीबा खराडे ठार होतात, होळकर आग्र्याहून जयपूरच्या मुलुखात येऊन छावणी करतात. ( २२ ) कुजपुरा व पानपत येथील लढाया, होळकरांचा व भाऊसाहेबांचा बेबनाव, पुन्हा समेट, जाटास मदतीस आणण्याचें कारस्थान ( २३ ) जाटास दगा करण्याचा बेत, मल्हाररावाचा विरोध, मल्हारराव जाटास सुखरूप काढून देतो. ( २४ ) पानपतची अखेरची लढाई, विश्वासरावांचा मृत्यु, मराठ्याचा मोड, होळकर दाक्षिणेचा रस्ता धरतात. ( २५ ) कृतोपकार स्मरून जाटानें होळकरास केलेलें सहाय्य होळकर ग्वालेरीस येतात. ( २६ ) ग्वालेरीस पुन्हा फौज जमून मल्हारराव रांगडे व रजपूत यांचा बंदोबस्त करतो, भटवाट वाड्याची लढाई, मल्हारराव जखमी होतो तरी लढतो व २५ लक्ष रुपये खंडणी घेतो, इंदुरास जातो, नतर तुकोजी होळकरास माळवे प्रांतीं ठेवून देशीं देवदर्शनास येतो ( २७ ) मेवात्यांच्या दग्यामुळें मल्हारराव पुन्हा माळव्यात जातो व बंड शमवितो, नानासाहेब पेशव्यांचा मृत्यु, मल्हाररावाचा पुण्यांत ६ महिने मुक्काम. ( २८ ) जाट व नजीब याच्या लढाया, सुरजमल्लाचा मृत्यू, मल्हारराव जाटांच्या मदतीस जातो, जाटाचा व नजीबाचा तह ठरवुन देऊन मल्हारराव अनुपशहरास जातो ( २९ ) सुभेदार व सुजाउद्दौला याच्या इंग्रजांशीं लढाया, होळकरांवर इंग्रजांचे छापे, होळकर पराभव पावून झांशीस येतो. ( ३० ) जाट व गोसावी झांशी जिंकतात, ३ महिन्यांच्या युद्धानतर मल्हारराव झांशी घेतो, दतिया जिंकतो. ( ३१ ) गोहदचा वेढा, शिंद्यांची फितुरी, मल्हारराव होळकराची मध्यस्थी, गोहदकर जाटाशीं ३० लक्ष रुपये खंडणी घेऊन सल्ला. ( ३२ ) अलमपूर मुक्कामीं मल्हारराव होळकराचा मृत्यु. छत्री बांधण्यास सुरुवात.

## अहिल्याबाई व तुकोजीराव होळकर

( ३३ ) मालेराव होळकराचा मृत्यु. ( ३४ ) होळकरांची दौलत जप्त करण्याचें गंगाधर यशवंत व दादासाहेब पेशवे यांचें कारस्थान आणि त्याच्या प्रतिकाराची अहिल्याबाईनें केलेली तजवीज. ( ३५ ) तुकोजी होळकरास अहिल्याबाई वस्त्रें देतें, दादासाहेब

पेशवे व अहिल्याबाईंचा समेट. ( ३६ ) अहिल्याबाईनें दादासाहेबांशीं लढण्यासाठीं आच-केल्या भोसले, गायकवाड व रजपुतादि सरदारांना निरोप. ( ३७ ) गंगाधर यशवंतावर अहिल्याबाईंची बेमर्जी, माधवराव व दादासाहेब यांच्यांत बेबनाव, तुकोजी होळकर गुप्त-पणें माधवरावास सामील होतो, धोडपची लढाई, दादासाहेबांचा पराभव. ( ३८ ) गंगाधर यशवंत सन्यास घेऊन पळत असतां त्यास अटक. ( ३९ ) दादासाहेब माधवराव पेशव्यांच्या स्वाधीन होतात. ( ४० ) गंगाधर यशवंताच्या जागीं दुसरा कारभारी निवडण्याची वाटाघाट, शिवबा बाजी व नारोपंत शौचे यातून निवड करून नारो गणेशास कारभारी-पद किंवा दिवाणगिरी पेशवे देतात. ( ४१ ) गंगाधर यशवंताचें पारिपत्य ( ४२ ) उत्तर हिंदुस्थानची स्वारी, रामचंद्र गणेश कानडे याची तुकोजी होळकर याची शिंद्याबरोबर तिकडे रवानगी ( ४३ ) शिवबा बाजी होळकरांतर्फे पेशव्यांच्या दरबारी राहातो ( ४४ ) नारोपंतनानावर अहिल्याबाईचा राग, उत्तरेच्या स्वारीस निघण्याआधीं तुकोजी होळकर अहिल्याबाईशीं एकनिष्ठ राहाण्याचें वचनप्रमाण करतो, अहिल्याबाईच्या व तुकोजी होळकरांच्या महालाची वांटणी. ( ४५ ) दिल्लीचा बादशहा उठविला, होळकरांनीं पुन्हा त्यास गादीवर बसविले, शिंदे-होळकरांत वैमनस्य, तुकोजी शत्रूस दिलेला शब्द पाळतो, बक्षीच्या फौजेचा धुव्वा ( ४६ ) पथ्थरगडावर हल्ला, तुकोजी होळकरांची जाटाशीं निकराची लढाई, जाट पळून डिगेचा आश्रय घेतो ( ४७ ) माधवराव पेशव्याचा मृत्यु, होळकर इंदुरास परत येतात, होळकरी फौजेच्या समजाविशीचा पडलेला राडा, राणोजी शिंदे चोंडीकर नारोपंत नानाकडून सक्तीनें पथकाच्या पगाराची बाकी वसूल करितो. (४८) नारायणराव पेशव्याचा खून, कासेगावची लढाई, त्रिंबकराव पेठ्याचा मृत्यू, दादा-साहेबांचा तुकोजी होळकरांस सामील करून घेण्याचा प्रयत्न. ( ४९ ) तोतयाचें बंड, मोरो-बाचें बंड, सखारामबापूचा फितूर, मोरोबा व सखारामबापूस कैद, नारो गणेशास कैद, नारो गणेशाच्या जागीं पेशवे दादाजी गंगाधराची तुकोजीचा कारभारी म्हणून नेमणूक करतात, अखेर सहा महिन्यांनीं नारो गणेश पुन्हा होळकरांचा दिवाण बनतो. ( ५० ) दादाचा पाठलाग, गुजराथेंतील मोहीम, हरीपंततात्यांची अहिल्याबाईंच्या दरबारीं शिष्टाई परंतु ती अपेशी ठरली, तुकोजी होळकर व अहिल्याबाई यांच्यांत वैमनस्य. महादजी शिंद्यांची मध्यस्थी, अहिल्याबाईचा बाणेदारपणा ( ५१ ) इंग्रज व दादासाहेब यांची पुण्यावर स्वारी, बोरघाटातील लढाया, बापू होळकराचा पराक्रम. ( ५२ ) होळकरांमार्फत इंग्रज तहाचें बोलणें लावतात, होळकराचा पेशव्यानीं केलेला सन्मान, बापू होळकरांची स्वामि-निष्ठा व बाणेदारपणा, पेशवा त्यास रावेर व कोंचमहाल हे महाल जहागीर करून देतात, ( ५३ ) दादासाहेब हरीबाबाजीस मारून कैदेतून पळून जातात, व इंग्रजांचा आश्रय घेतात. ( ५४ ) सवाई मल्हारराव होळकराचें लग्न ( ५५ ) टिपूवरील स्वारी, टिपू मरा-ठ्यांच्या लष्करांवर छापा घालतो. तुकोजीचा दूरदर्शीपणा. ( ५६ ) जाट व इंग्रज यांचें शिंद्याशीं युद्ध, गोविंद शामराज यांचा लढाईत मृत्यु, इंग्रज ग्वाल्हेर घेतात, होळकरांचें बाळूजी इंगळे व राजाराम रणसोड हे शिंद्यांच्या मदतीस जातात. ( ५७ ) काशीचा राजा चेतसिंग इंग्रजाविरुद्ध उठतो, शिंदे ग्वाल्हेर परत जिंकतात, लालसोटची लढाई, महाद-

ऱ्यांचा पराभव व पश्चात्ताप. ( ५८ ) आग्र्याचे नजीबकुलीखानाचे मोर्चे उठवून मथुरा वगैरे ठाणीं शिंदे काबीज करतात. ( ५९ ) राजपुतांचा होळकरांविरुद्ध उठाव, होळकरांचा अबाजीपन लढाईंत ठार होतो, चकरडयाची लढाई, मकाजी गित्याचा पराक्रम, पजू जमादार, चतरसिंग बेचाणी इत्यादि रांगडे सरदारांचा मृत्यु. ( ६० ) अमदेचा वेढा, सोभागसिंगाचा मृत्यु. ( ६१ ) काशीराव होळकरांच्या कन्येचें लग्न, अबाजी इंगळे यांची अहिल्याबाईनें घेतलेली हजेरी. ( ६२ ) बमण्याच्या गढीवरील लढाई, बापू होळकरांचा पराक्रम. ( ६३ ) तुकोजी व अलिबहादूर महादजी शिंद्यांस भेटतात नारोपतनाना व तुकोजी वैमनस्य. ( ६४ ) नारोपतांचा छळ व मृत्यु. ( ६५ ) गुलाम कादर पकडला जातो, हिंमतबहादूरावरून अलिबहादूराचा शिंद्यांशीं कलह, होळकरांची जयपूरच्या मुलुखात आबाबाव, इस्मायल बेगाचा पराभव, बापू होळकराचा पराक्रम. ( ६६ ) मारवाडवाल्यांशीं सामना, होळकराचें शिंद्यांस साहाय्य. ( ६७ ) तुकोजी व महादजी यांची भेट. एकमेकांचा पाणउतारा करण्याचा प्रयत्न. ( ६८ ) शिंदे दक्षिणेंत येण्यास निघतात. ( ६९ ) सत्वासगढीवरून अहिल्याबाईचा महादजीस शाप ( ७० ) हिंदुस्थानात गोपाळराव चिटणीस व होळकर यात वैमनस्य, ' कामा 'ची लढाई ( ७१ ) राजपुतान्यांत शिंदे होळकरांच्या लढाया, व नतर तात्पुरता सलोखा ( ७२ ) सवाई मल्हारराव होळकरास अहिल्याबाई राजपुतान्यांत पाठवितें. पुन्हा शिंदे होळकर लढाई सुरू जुजरनेक व डिबॉइन यांच्या कवाइती रपूचा सग्राम, होळकराचा लाखेरीस पराभव, महादजी शिंद्यांचा मृत्यु. ( ७३ ) खड्यांची लढाई. ( ७४ ) अहिल्याबाईचा मृत्यू. ( ७५ ) सवाई माधवरावाचा मृत्यु, तुकोजीरावाच्या पुत्रांतील कलह, काशीरावास वस्त्रें मिळतात. मल्हारराव रागावून निराळा होतो.

## काशिराव ऊर्फ बाळासाहेब होळकर

( ७६ ) तुकोजीच्या मृत्यूनतर मल्हारराव बड करतो. मल्हाररावाची दानत. ( ७७ ) मल्हाररावावर काशीराव व शिंदे दग्यानें हल्ला करतात, मल्हाररावाचा मृत्यु, लाख्या बारगीराचा मृत्यु, यशवतराव होळकराचा पराक्रम. ( ७८ ) बाळोबा तात्या शिंदे होळकराचा समेट करून देतात ( ७९ ) शिंद्याच्या दरबारांतील शेणवी मडळ कैद, सर्जेरावाचे पुण्यांतील उत्पात ( ८० ) यशवतरावाचें नागपुरास प्रयाण. ( ८१ ) यशवतराव नागपूरकरांच्या कैदेंतून युक्तीनें सुटतो. ( ८२ ) ययवतराव व भवानी शकर यांची प्रथम भेट. जुजरनाईकाची भेट. ( ८३ ) यशवतराव, पवारच्या आश्रयास जातो. ( ८४ ) शामराव माहडीकाची भेट. ( ८५ ) यशवतराव सैन्य उभारतो. ( ८६ ) धोंडोपत गोडबोल्याचा पराभव. ( ८७ ) यशवतराव महेश्वर बळकावतो. ( ८८ ) यशवतरावाची स्वारी शिकारी. ( ८९-९० ) यशवतराव शिंदेबायास लुटून घेतो. ( ९१ ) कृष्णाजी मुकुद बक्षी याची बहादुरी ( ९२ ) उज्जनची लढाई. ( ९३ ) शिंद्याची इदुरावर चाल. ( ९४ ) इदुराजवळच्या चकमकी. ( ९५ ) कपूत बिघाड. ( ९६ ) जुजरनेकास कैद, इदुराची जाळपोळ. ( ९७ ) काशीराव यशवतराव होळकरास भेटतो. ( ९८ ) गोपाळराव

---

# होळकरांची कैफियत

कैफियत कैलासवासी मल्हारजी होळकर यांनीं स्वपराक्रमें करून दौलत उभी केली, त्याचा इतिहास इस्तकबिल तागाईतअखेर येणेंप्रमाणे :—

( १ ) मौजे होळ मुरूम, नीरेचे काठीं जेजुरीजवळ आहे. तेथे खंडूजी वीरकर खुटेकर धनगर चौगुले राहत होते. त्याजला मौजे तळोदें परगणे सुलतानपूर येथील भोजराजजी बारगळ याने आपली बहीण दिल्ही होती. तिचे पोटीं पुत्र जाहला. त्याचे नाव मल्हारजी होळकर. तो काहीं दिवस त्या गावींच होता त्याचा पिता मृत्यु पावला. मल्हारजी होळकर मूल, तीन वर्षांचे असता, भाऊबद मुलाची हेळसांड करू लागले बाईचे काहीं चालू दिले नाहीं वतन वाटा आपणच दाबून वहिवाट चालविली. बाईस नित्यकृत्याचाही आधार नाहीं. मुलास काहीं अपाय होईल असें समजून चिरजीवासुद्धा माहेरी भावापाशीं येऊन राहिली. मल्हारजी होळकर मूळचे होळचे राहणारे म्हणून 'होळकर' नाव चालले काहीं मोठे झाल्यावर बारगळ याणी भाच्यास घरचीं मेंढरें चारावयास लाविलें दररोज रानात जाऊन मेंढया चारून सायकाळीं घरास यावें हा क्रम चालत असता, कोणे एके दिवशीं अरण्यात दोन प्रहरा झाडाखाली मल्हारजी निद्रिस्त झाल्यावर, वारुळातून नाग निघून ( त्यानें ) मुलावर फणीची छाया केली. तितक्यात मातुश्री घरीहून भाकरी घेऊन आली. तिने पाहिले भयभीत होऊन माघारी जाऊन भावास वगैरे वर्तमान कळवून त्याजसुद्धा तेथें आली. तो भुजग सर्वानी तसाच पाहिला. मनुष्याची भीड नागाचे दृष्टीस पडल्यावर नाग वारुळात गेला. नतर मुलास सावध करून पाहिलें असता, अन्य विचार दृष्टीस न पडला तेथेच मुलास भोजन घालून घरास घेऊन आले. अभ्यंग

---

( १ ) **कैफियत** – हकीकत, वृत्तान्त. **इस्तकबिल** – पासून. **तागाईत** – पर्यंत, अखेर. **तागाइतअखेर** – वास्तविक 'अखेर' या शब्दाची पुन्हां जरूर नाहीं. तथापि जुन्या काळीं तसाहि वाक्प्रचार करण्याची रीत होती. **खुटेकर** – धनगरातील एक पोट जात. धनगरांत खुटेकर, हटकर, सेगर व सणगर असे चार पोट भेद आहेत. **चौगुला** – पाटलाच्या हाताखालील एक ग्रामाधिकारी. पाटलाचे हाताखालीं चौगुला, हवालदार, रामोशी वगैरे नोकर असतात. त्यांत चौगुला मुख्य होय. **नित्यकृत्य** – रोजची उपजीविका. **भीड** – गर्दी, जमाव. **अन्य विचार दृष्टीस न पडला** – नागानें दंश वगैरे केल्याचें कांहीं चिन्ह दृष्टीस पडलें नाहीं.

स्नान घालून दूधभात खाऊ घातला. या गोष्टीचें मातुश्रीस आश्चर्य होऊन चौघे म्हातारे ममतेचे धनगर ( होते ) त्यांस विचारलें. त्यांस त्यांच्या उपमा अन्यत्रांस, ते तर प्रत्यक्षच ! त्यांतही एकानें सांगितलें कीं, " बाई, ब्राह्मणास पूस. तो सागेल. " मग ब्राह्मणास एकातीं विचारिलें. ब्राह्मणानें सांगितलें कीं, "बाई, हा मूल पृथ्वीपति होईल. त्यास दहा वर्षांचा होई तावत्काल फार साभाळावे. पुढें हा पृथ्वीस संभाळून तुला पृथ्वीपतीची आई म्हणवील !" त्या दिवसापासोन ( मामाने ) रानात जावयाचें मना करून घरचे घोड्याची देखरेख ( मल्हारीस ) सागितली. यानंतर मातोश्रीचा काळ सत्वरच झाला.

( २ ) त्या दिवसात बाळाजी विश्वनाथ पेशवे याजला सातारकर राजे यानी दौलतीची सोप करून गिरासपणा करूं लागले. प्रथम स्वारी गोदावरी पर्यत जाहली ' गगेस घोडे न्हाले ' अशी म्हण आहे. नतर पेशवे याणीं पवार, धनगर वगैरे अवघे मराठे मडळी जमा करून गगेपुढे चाल केली त्यात पेंढारी सरदार याचे पथकांत बारगळ याणीं मल्हारजी होळकर याचे जिम्मेस, पाच पंचवीस घोडे होते ते, करून पेंढारी याचे पथकाबरोबर रवाना केले. चाकरीत तैनात कांहीं एक नाहीं. लुटींत जें ज्यास प्राप्त होईल ते त्याचें. हुकूम पेशवे मशारनिल्हे याचा. अशा चालीनें नर्मदा दक्षण तीरपर्यंत स्वारी केली. ते पेंढारियाप्रमाणे दौडीऱ्या चालीनें दिल्लीपर्यंत गेले. पातशाई सलतन मोठी. फौज आली गेली हें कोणाचे गावीही नाहीं. दिल्लीचे आसपास पोंहचल्यावर एक्या महालचे खडणीचा जाब ठरला. तेथें हारी बिघडूं नये

---

( १ ) **मातुश्रीस आश्चर्य होऊन** – मातुश्रीस आश्चर्य वाटून. **त्यास त्याच्या उपमा अन्यत्रास इ०** – अडाणी किंवा अज्ञानी मनुष्यास धनगराची उपमा देतात. मग ते तर काय प्रत्यक्षच धनगर होते. ते त्या चमत्काराचा उलगडा कसा करून दाखविणार !

( २ ) **सोप करणे** – सोपवून देणें, हवाली करणें. **गिरासपणा** – लुटालूट. येथें अर्थ स्वारीशिकारी किंवा मोहीम. **गंगेस घोडे न्हाले** – गोदावरी नदीलाहि गगा म्हणण्याचा प्रघात होता व अद्यापहि आहे. **तैनात** – पगार, वेतन. **मशारनिल्हे** – उपर्युक्त, पूर्वोक्त. **पेंढारियाप्रमाणे दौडीच्या चालीनें दिल्लीपर्यंत गेले** – वाटेल तेवढ्या लांब लांब मजली मारण्याबद्दल पेंढाऱ्यांची फार ख्याति असे. **सलतन** – सलतनत, राज्य. **हारी बिघडू नये** – 'हरीफी घडू नये' असे पाहिजे. **हरीफी** – दांडगेपणा, कपटाई. महालाकडून अमुक इतकी खडणी घेण्याचें ठरले होते म्हणूनच त्या महालात लुटालूट करण्यास किंवा शेतें कापण्यास सेनापतीनें बदी केली होती.

असा करार. त्यांत मल्हारजी होळकर यानीं आपल्या स्वारांनिशीं हारी कापून आणून घोड्यापुढें टाकिली. याचा बोभाट पेशवे यांपर्यंत गेला. तेव्हां बाळाजी विश्वनाथ पेशवे याचे चिरंजीव बाजीराव हे जातीनीं हातांत काठी घेऊन ताकिदीस निघाले. तों पहात पहात मल्हारजी होळकर याचे गोटात घोड्यापुढे हारी पाहून एका बारगिरावर बाजीराव यानीं काठी टाकिली. तों मल्हारजी होळकर राहुटीचे तोंडीं चऱ्हाड वळीत बसले होते तेथून शिव्या देऊन मातीचें ढेंकूळ बाजीराव यांस मारिलें ! "आम्हास काय रोजमुरे देऊन भागलास म्हणून काव्या मारितोस ?" याप्रमाणे शिपाईभाषणें केलीं ते समयीं बाजीराव याणीं खामोश करून आपले खाजगत डेऱ्यात गेले. तेथे जाऊन वडिलापाशीं बहुत निग्रह केला, "असे विदेशात बेहुकुमी होऊं लागली असता परिणाम काय ?" (तेव्हा) बाळाजी विश्वनाथ याणी विचार करून उदईक मल्हारजी होळकरास लुटून घ्यावें असा विचार केला. हे वर्तमान मल्हारजी होळकर यास समजताच याणीं आपले बारगिरास बोलावून एका केला, "जो माझ्या मरणाचा सोबती असेल त्याणें राहावें. जो सोबती नसेल त्याणे यावेळेस निघून जाऊन आपला बचाव करावा." मग जावयाचे ते निघून गेले. वीस बावीस असाम्या मरणोन्मुख होऊन घोडीं लष्करात सोडून दिलीं. खोगरें राहुटी वगैरे अजबाब जाळून, अगास राख लावून, ढाल तरवारेनिशीं मागें टेकडी होती त्या टेंकडीवर जाऊन बसले. हें वर्तमान फौजेंत कोणी हाटकर धनगर, बाराशें रावताचा जमाव, (ज्याजवळ असा) मुस्तकीम होता, त्याजला समजलें. त्यांनीं मल्हारजी होळकर याजला सागून पाठविलें कीं, "हिंमत सोडूं नको ! हाटकर खुटेकर धनगराचें बीज (ज्याचें) असेल तो तुजला सामील आहे. तुझी वाट ती आमची वाट." असें सांगून आपण जातीने पेशवे याजकडे जाऊन बहुत निषेध केला कीं, "सरदारी करूं म्हणता, आणि शिपाई याची बरदास्त या प्रकारची ! अशानें वेल माडवास कसे जातील ? तुम्हास ढेंकूळ मारिलें तो तुमचे हरिपाचा प्राण घ्यावयास कसा चुकेल ? हें पहाणें एकीकडे ठेवून (वर्तता!) पंचवीस

---

(२) **हारी** – तयार झालेलीं शेतें. **शिपाईभाषण** – शिपायास शोभेल असें बिनमुरवतीचें, रागाचें किंवा मग्रुरीचें भाषण. **खामोश करून** – गम खाऊन. **निग्रह** – हट्ट. **बेहुकुमी** – हुकूमबाह्यवर्तन. **एका करणें** – एक विचार करणें, पक्की जूट करणें, किंवा एकत्र जमविणें. **मरणोन्मुख होऊन** – मरणास सन्मुख होऊन, मारू किंवा मरू असा निश्चय करून. **अजबाब** – सामानसुमान, सामुग्री. **मुस्तकीम** – तयार, जय्यत किंवा भक्कम. **वेल मांडवास जाणें** – महत्वाकाक्षा सफळ होणें, दौलत वाढणें. **हरीप** – हरीफ, शत्रु.

स्वार लुटून घेतल्यांत लौकिकी, (किंवा) फौजेस हामराई किंवा बरदास्त केल्यांत ? यातील विचार पाहावा. बाकी तो तर मरणें संकल्पून बसलाच आहे कदाचित् धनगरमात्र त्याजला सामील झाल्यास कसें पडेल ?" अशा भावें बोलणें बोलून, लुटून घेणें महकूब करून, घोडीं लष्करांत जिकडे गेलीं असतील तीं जमा करून, त्यांची त्यांस देऊन, अजबाब पंचवीस हजार रुपये नक्त द्यावे, असे ठरावांत आणून आपले गोटात गेला. प्रातःकाळी पुनः येऊन बाळाजी विश्वनाथ व चिरंजीव बाजीराव उभयतां आणखी सरदार बरोबर घेऊन मल्हारजी होळकर टेंकडीवर बसले होते त्याजपाशीं आले. बहुता प्रकारें दीलजमाई करून, आगास राख लाऊन बसले होते तितक्यास वस्त्रें देऊन, अजबाबाकरितां वीस हजार रुपये नक्त पदरीं घालून, घोडीं ज्या ज्या गोटात गेलीं होतीं तितकीं जमा करून त्याचे स्वाधीन केलीं

( ३ ) याप्रमाणे किस्सा निर्गत होऊन स्वारी माघारी फिरली लोक आबाद जाहले मल्हारजी होळकर यांणीं पंचवीस घोड्याचीं सव्वाशे घोडीं केलीं माघारी फिरतांना सिपरी कोल्हारस या मैदानात आले. तेथे नाल्याचे काठीं झाडझुडका होता त्या छायेंत बाजीराव जातीनें स्नान करून भोजन करीत होते मुक्काम जवळपासच होता दहा वीस स्वार बरोबर तितक्यात मल्हारजी होळकर लबार भरून पाचशे स्वार कडाचूर आडरानानें आले बाजीरावास पाहून गराडा घातला रायाचे छातीस भाला आणून भाषण केलें कीं, "ते दिवशी ढेकूळच मारलें आता भाला पार करितों! तुझा वाली कोण ?" याप्रमाणें आडव्या तिडव्या गोष्टी बोलोन (घेतल्या). मग रायांनीं उठोन, घोड्याखालीं उतरवून, मल्हारजी होळकर याचा स्तुतिवाद फार केला की, "ज्या ठिकाणीं कामकाज पडलें तेथें तरवार तुझीच पाहण्यात आली. भोजन करावें" यांणीं उत्तर केलें कीं, "तुझे मनात आम्हांविषयीं खत्रा, तेव्हां तुझे पत्तीस आम्हीं कशास जेऊं ?" मग बाजीराव बोलले, "तुमची आमची या अन्नाची क्रिया. पुनः स्वारी करण्याचे समयीं तुम्हाकडे पाच हजार फौजेची सरदारी सांगूं" असें बोलून

---

( २ ) **लौकिकी** – मोठेपणा, पराक्रम, शौर्य. **हामराई करणे** – लगामी लाऊन घेणें. **धनगरमात्र** – सैन्यांतील झाडून सारे धनगर लोक. **महकूब** – तहकूब.

( ३ ) **किस्सा** – कज्जा, तटा. **निर्गत होणे** – निकालात निघणें. **आबाद** – संपन्न, समृद्ध, अर्थात मुलुखगिरींतील लुटीमुळें. **लबार** – मूळ शब्द लब्बा म्हणजे बैल. लबार भरून म्हणजे कही भरून. **कडाचूर असणें** – आपल्या नादात गर्क असणें. **तेथें तरवार तुझीच पाहण्यांत आली** – लढायांतून ऐन गर्दीच्या, मारामारीच्या ठिकाणीं तूच जातीनें पराक्रम केलास तो आम्ही प्रत्यक्ष पाहिला आहे. **खत्रा** – खुनस, किल्मिष, संशय. **क्रिया** – शपथ.

अन्नावर हात ठेविला. इतःपर मागील सशय एकरूप उभयपक्षीं ठेवू नये असें खचित बोलण्यात येऊन श्रीमंत दरमजल पुण्यास गेले. फौज आपले आपले जागीं गेली.

( ४ ) मल्हारजी होळकर तळोद्यास आपले सरंजामानिशीं आले. मामाची भेट घेतली. वित्तविषय अप्रतरणीक मामास समजून दिले. घोडे माणूस, सरंजाम हुशार पाहून मामा प्रसन्न जाहला. मग आपली कन्या गौतमाबाई होती ती याजला द्यावी हें मनात वागवून बायकोस विचारिले बायकोनें काहीं नाक मुरडिलें ( पण ) तें काहीं एक मनात न आणिता आपली मूल गौतमाबाई मशारनिल्हेस दिली. समयीं समर्पक लग्नाचा उच्छाह होऊन पुढे घोड्याचे निर्वाहाचें कठीण पडले. मामी मागें पुढे कुरकूर करू लागली हें मल्हारजी होळकर यास न सोसवे. सबब श्रीमंताची फौज बढवणीस येऊन लागली होती त्यापूर्वी मल्हारजी होळकर आपल्या घोड्या-निशीं बढवणीस चाकरीस राहिले होते बाहेरील फौजेची मोर्चेबंदी झाल्यावर मल्हा-रजी होळकर याणी चौदाशे माणसानी बाहेर निघून मोर्च्याचा कट्टा करून वारा-पाणी करावें अशी तीन महिने लढाई घेतली. फौज त्रासरूप होऊन श्रीमतांस पत्रें लिहिलीं कीं, " रांगडे याची बाबत ती काय ? परतु मल्हारजी होळकर त्यात सामील. तो दाद लागूं देत नाहीं ! " मग श्रीमतानीं मल्हारजी होळकर यास पत्रें लिहून " उभयपक्षीं तुम्हाकडे मुखत्यारी. खडणीचा जाब ठराव करून फौजेची रवानगी करावी, " ( असें लिहिले ). हे पत्र आलियावर मल्हारजी होळकर दरम्यान पडून, श्रीमंताचें वर्चस्व ठेवून, फौजखर्ची बाहेर काढून, खडणीचा ऐवज अक्लेश जामदारखान्यात पावता केला. याजवर श्रीमंताची आस्था होळकर याचे ठायी बहुत बसून, असे माणूस दौलतीत असावे हे मनात वागून ( राहिले ). किंचित काळातरें स्वारी मोहीमशीर होण्याचा बेत ठरला.

( ५ ) त्या स्वारीस कलमी फौज ठेवावी असा इरादा. तेव्हा ते उदाजी पवार हे राजे याचे चाकर ! चाकरी कबूल करीनात. "तुम्हीं आम्हीं एक्या धन्याचे चाकर

---

( ३ ) **एकरूप** – बिलकूल, निखालस.

( ४ ) **वित्तविषय** – मोहीमात आणलेली लूट. **अप्रतरणीक** – काहीं एक प्रतारणा किंवा फसवणूक न करता **वागवून** – मनात आणून. **समयीं समर्पक** – समर्पक समयीं, योग्य मुहूर्तावर. **येऊन लागली होती** – वेढा घालून बसली होती. **कट्टा करणें** – कत्तल करणे, नाश करणें. **वारा पाणी करणे** – दाणादाण करणें **त्रासरूप होऊन** – सत्रस्त होऊन. **फौज खर्ची बाहेर काढून**–फौजेस पडलेला खर्चहि वसूल करून घेऊन. **अक्लेश**–सुरळीत,विनायास.

( ५ ) **कलमी फौज** – नक्त पगार देऊन ठेवलेली फौज. **राजे** – शाहू राजे.

तुम्हांस हजेरी देऊन रोजमुरा आम्हीं कां घेऊं ? " ( असें म्हणू लागले ). त्यांत उदाजी पवार शिपाई, मारती तरवार. त्याचें म्हणणें पडलें कीं, " आम्हांस बरोबर हिस्सा द्याल तर आम्हीं स्वारीस येऊं." यात श्रीमंत कायल झाले. निमे हिस्सा कबूल करून न्यावें तर आपलें वर्चस्व तें काय ? न नेल्यास नावाचे माणूस, तरवार-बहादर. टाकून जावें हें ठीक नाहीं. मग बाजीराव साहेब यानीं विचार केला कीं, मल्हारजी होळकर आपलेसे करून मग याचा विचार करू ऐसा विचार करून मल्हारजी होळकर याजला पत्रें लिहिलीं कीं, "तुम्हाकडील मुकत्यार कारकून बोलावयास पाठवावें. " या भावीं पत्रे आलियावर याणींही विचार केला की, मुग्ध कारकून पाठवून एकादा करार ठरण्यात आल्यास मालकी बारगळाची ठरली, ( असें होईल. ) आपण आपले मजूरचे मजूर राहू. ऐसा विचार मनात येऊन श्रीमतास उत्तर लिहिलें कीं, "आम्ही चाकर बारगळाचे, त्याजपासून ( आपण ) मागून घेत असल्यास हजरच आहोत " या भावीं उत्तरें पाठविली मग त्यानी मोठा माणूस बाळोजी बाबा म्हणून परभू कारकून होता, त्याजला बारगळाकडे पाठवून मल्हारजी होळकर यांस मागून घेतलें. यास खटपट बरीच लागली शेवटीं बार-गळानीं मल्हारजींस आज्ञा दिल्यावर स्वच्छ उत्तर केले, "आपले आज्ञेवरून चाकर पेशवे याचा झालों (यापुढें) आपला हुकूम मजवर राहिला नाहीं." बारगळानींही रुकार दिल्हा. नंतर रामाजीपत पळसकर कारकून श्रीमताकडे पाठविले. त्याची व श्रीमंताची भेट जवळें मुक्कामीं झाली. भोजनाचे समयीं जाऊन पोहोचले श्रीमतास समजल्यावर पगत खोळंबून, स्नान यांजला घालून, आपले शेजारीं पाट ताट मांडून भोजनास घातलें. भोजनोत्तर एकातीं घेऊन तीन लक्ष रुपयान्या हुडया त्याचे स्वाधीन करून आज्ञा केली कीं, 'पाच हजार फौजेनिशीं गोदातीरीं सामील व्हावें ' तत्क्षणीं रवाना केले. इकडे होळकर फौजेचे सचणींत होतेच रामाजीपत येऊन पोहोचल्यावर पैका फौजेस देऊन कलमजारी सुरू करून पाच हजार फौज, कट्टा सरंजाम, नवी उमेद, ( असे ) श्रीमंत गंगातीरास आले तों दाखल झाले काहीं दिवसाचे अंतरानें श्रीमतही आले.

( ६ ) भेटी होऊन प्रथम मसलत पवार प्रकरणीं. होळकर यानीं खात्री केली (कीं) शेदवें मुक्कामीं पवार आहेत तेथें आपण उभयता जाऊन त्याची दीलजमाई करून बराबर घेऊं. असा इरादा करून दरकूच शेदवें मुक्कामीं आले. उदाजी पवार याचीं

---

( ५ ) **शिपाई** – लढवय्या. **मारती तलवार** – तलवार करून दाखविणारा पराक्रमी शिपाई. **कायल** – निरुत्तर. **मुग्ध कारकून** – अडाणी कारकून. **संचणी** – जमवाजमव, भरती. **कलमजारी** – सैन्य भरती.

भेट झाली. त्रिवर्ग एकातीं बसून पवार यांची दिलजमाई बहुतां प्रकारें केली. परतु पवार मार्गावर न येत. त्यास तरवारीचा व जमयतीचा आजम. आम्हां वांचून ब्राम्हणाच्याने काय करावयाचें आहे, हा फद ! शेवटीं बाजीराव याणीं पागोटें काढून उदाजी पवार याचे पुढें ठेविलें. तथापि त्याचें बोलणें तेंच. तेव्हा मल्हारजी होळकर यांजला त्वेष येऊन बाजीरावाचा हात धरून वोढले, " इतके मनावीत असता ध्यानास न ये ! एक कुळबट न आले तर काय चिंता आहे ? आपलें नशीब आपले बराबर आहे " असे बोलून बाजीराव यास हात धरून उठविलें. पानसुपारी न घेता आपले गोटात येऊन नौबत दिली. कूच करून नर्मदेचे काठीं यावे हा इरादा तों मागें पवाराचे कारभारी कवठेकर यानीं उदाजी पवार याशीं बुद्धिवाद ठेवून कायल केलें कीं, "तुम्हीं फार चुकला. या प्रसंगीं श्रीमतानीं बहुत ग्लानी केली. तुम्हीं रुकार न दिल्हा. यात आपले पायावर धोडा पाडून घेतला त्याचे हातीं मल्हारजी होळकर निधी लागला आहे हा पाहिजे ते करील कमजोर झाल्यावर कोणास तरी आपलें करून ठेवावें. यात माणूस जख खात नाहीं. असे सिद्धात आहेत. " हे दिवाणाचें सागणे पवार यास सोईकर वाटून दिवाणासी उत्तर केले कीं, " पुढे मेळ कसा करावा ? " तेव्हा कवठेकरानी सागितले की, " मल्हारजी होळकर बाजीराव यास नर्मदा उतरवीत नाहीत. सडे आपण उतरतील. ही बातमी ठेवून मागोमाग आपले सरजामानिशीं जाऊन मल्हारजीस सामल व्हावें. तो अनादर करणार नाहीं. "

---

( ६ ) **मार्गावर न येत** – सागितलेले ऐकेनात. **त्यास तरवारीचा व जमयतीचा आजम** – आपण तरवार बहाद्दर आहो व आपणाजवळ जमयत म्हणजे सैन्याचा जमावहि पुष्कळ आहे, या घमेंडीत उदाजी पवार होता. **आजम** – मूळ शब्द '**उजम**' असा आहे त्याचा अर्थ 'थोरवी,' येथें गर्व, अभिमान या अर्थी हा शब्द वापरला आहे **ब्राह्मणाच्याने काय करावयाचे आहे** – ब्राह्मणाच्या हातून काय पराक्रम घडणार ? आम्ही एवढे तोल्दार फौजबद सरदार ते बरोबर नसलो तर विचाऱ्या बाजीरावाच्या हातून मुलूखगिरी कसली होते ? **फन्द** – घमेंड, स्फुद **मनावणे** – समजावणें, आर्जव करणें **कुळंबट** – कुणबी, कुळबट व कुणबट एकच. मराठ्यात जातीने मजूरासारखा शेती करतो तो हलका समजण्यांत येत असे येथें कुळबट शब्दाचा तुच्छतादर्शक उपयोग होळकरांनीं केला. **नौबद दिली** – कुचाचा इशारा देण्यासाठीं नौबद, नगारा वाजविला. **बुद्धिवाद ठेवून** – मुळांत बुद्धिवाद देऊन असे असावे. बुद्धिवाद देऊन म्हणजे युक्तिवाद करून. **ग्लानी** – आर्जव, अजीजी. **निधी** – भाण्डार, खाण, कल्पतरु अशा अर्थी. **जख खाणे** – गोता खाणें, नुकसानी होणें, नाश होणें. **मेळ** – सलोखा.

( ७ ) तों इकडे जयपूरवाले जोतपूरवाले वगैरे रजवाडे यांजवर पातशाही कर तिसरे वर्षांत डोकेंदेणे लागत होता. या त्रासानें आपले जागा दिक्क. मनांतील धर्म, कसेही करून बादशाहीस धक्का द्यावा हा इरादा. परतु पातशाही सलतानाचा प्रसार मोठा राजेरजवाडे खातरेत नाहींत. तेव्हां सर्वांनीं एकदील बादशाहीस धक्का द्यावा हा इरादा करून, जयपूरवाले राजे सवाई जयसिंग यास पुढे करून, दक्षणी घोडीवाले यांस बगलेंत घेऊन गिरास करावे, हा मनसुबा सिद्ध करून, उज्जनीस देवदर्शनाचे मिसें करून आले. तेव्हां एकाएकीं उघाड होतां नये सबब इदूरकर मडलोई ( यास ) मल्हारजी होळकर याजकडे पाठविलें. कारण 'तुम्ही जुवामर्दीचा इरादा धरला आहे त्या पक्षीं तुम्हांस तमाम रजवाडे जयपूर, जोतपूर आदीकरून लहान मोठे सामल करून देऊ परतु तुम्ही दयाबहादर सुभा उज्जन बातशाई आहेत, त्या बराबर सरंजाम साठ हजार पठाण व चाळीस हजार आलिगोल व तीनशे तोफा चालू, याप्रमाणे आहे याचे पारपत्य करून धारा उज्जन येथें अमलाफैला तुमचा होऊन पुढें चाल चालू झाली म्हणजे एकसमयावछिन्न लहान मोठे रजवाडे याचे वकील तुम्हापाशीं आणितों ' या भावीं ( मल्हाररावाशी ) बोलून फौज हमरा करून सुभा पातशाही याजवर आणून घालावे तेथे घोडीवाल्याकडून सुभ्याचे पारपत्य झाल्यास पुढें आठ दहा रोजात रजवाड्याशीं व घोडीवाल्याशीं मेळ घालून हिंदुस्थान पाहावे. कदाचित् सुभ्यानें याचे पारिपत्य केले तर ' आग फसे बदा हुशार ' अशी मसलत करून इदूरचे जमीदार मल्हारजी होळकर याजकडे पाठविले. मल्हारजी होळकर व बाजीराव पेशवे यांनीं मसलत करून बाजीराव यास माघारे पुण्यास रवाना करून ( दिले व ) आपण सडा घोडा राऊत, त्यांत पालपडदा बायको जातें इत्यादि

---

( ७ ) डोके देणे – जिझीया नावाचा हिन्दुवर लादलेला कर. हा कर दर डोई द्यावा लागत असे **दिक्क** – कष्टी. **सलतान** – राज्य, अमल. **प्रसार** – पसारा. **एकदील** – एकदील करून. **गिरास** – बड. **उघाड** – परिस्फुटता. **कारण** – कीं **दयाबहादर सुभा उज्जन** – उज्जनचा सुभेदार दयाबहादर. **आलिगोल** – तोफेचा गोलदाज. **चालू** – प्रत्यक्ष उपयोगांत असलेल्या, शोभेच्या नव्हेत. **अमलाफैला** – अधिकार, अमल **एकसमयावछिन्न** – एकसमयावच्छेदेकरून, एकाच वेळीं **हमरा करणे** – बरोबर घेणे, सामील करून घेणे **घोडीवाले** – मराठे. **हिंदुस्थान पहावे** – उत्तर हिंदुस्थानात प्रवेश करावा. इन्दूर, माळवा हे उत्तर हिदुस्थानांत प्रवेश करण्याचें द्वारच होय. **आग फसे बन्दा हुशार** – पुढाच्यास ठेंच मागचा शहाणा. **पालपडदा** – तबू, राहुटी. **सडा घोडा राऊत इ०** – लष्करातील डेरे राहुट्या कुटुंब कबिले इ सर्व मागें ठेवून केवळ सडी स्वारी करून दयाबहादरावर धाड घालावी असा मल्हाररावानें बेत केला.

पडदळाचें नांव नाहीं, असा बेत करून नर्मदा उतरावी. याचा माहितगार वाट-घाटाचा कोणी तरी असावा या उद्देशांत. तों नंदलाल मडलोई दोनशें स्वारानिशीं येऊन दाखल झाले. मल्हारजी होळकर याच्या त्याच्या भेटी झाल्या. राजे सवाई जयसिंग याणीं रवानगी केली त्या समयीं जे पर्याय बोलण्यात आणले ते सर्व बोलून आशा-दुराशाही विशेष दाखविली परतु सुभा बुडविल्याचे पोटीं इतक्याही गोष्टी नमुदास आणून देऊ. मल्हारजी होळकर यांणीं श्रवण करून उत्तर केले कीं, "आम्हास-हि सुभ्याशीच काम आहे सुभा पाहून घेतल्यावर राजे रजवाडे व हिंदुस्थान पात-शाई सलतन पाहून घेऊ" राजकारणप्रकरणीं हा दम देऊन जमीदार याची खातरतसलीम करून पगडीबदल भाईचारा करून त्यास आज्ञा केली कीं, "तुम्हीं आम्हास घाटावाट निटोप्याची दाखऊन दोन प्रहराचे संधीस त्याजवर आम्हास नेऊन सोडावें. मग श्रीमार्तंड काय करील ते अवघ्याचे दृष्टीस पडेल." या प्रमाणे इदूर-कर जमीदाराशी सफाईचे बोलणे होऊन घाट पाडण्याचा जिमा त्याने केला

(८) इकडे घोडीवाले पार उतरोन दगा करतील यास्तव फौज सरजामसुद्धा कूच करून दयाबहादूर धारचे मुक्कामी येऊन नाक्या घाटाचा बदोबस्त करून होते तेव्हा इदूरकर जमीदार व काही सामल पूर्व स्नेहावर बढवाणीकर, यां उभयताचे विचारे घाट वाट अनोळखी काढून, सुभ्याकडील बदोबस्त जागचे जागींच राहोन, नर्मदा पार उतरोन सूर्योदयापूर्वीं घाट चढोन गेले ही बातमी उदाजी पवार यानीं ठेऊन ज्या वाटेने मल्हारजी होळकर उतरून गेले त्याच वाटेनें हेही आपल्या सर-जामानिशी उतरून घाटावर सामल जहाले. मल्हारजी बावास कळले कीं, उदाजी

---

(७) **पडदळ** – पडथळ, सामानसुमान **उद्देशात** – शोधात. **पर्याय** – मुद्दे, कलमें **अशादुराशा** – आमिष **परतु** – कीं **नमुदास आणून देऊं** – सिद्ध करून देऊ, घडवून दाखवू, प्रत्ययास आणून देऊ. **सुभा पाहून घेतल्यावर** सुभ्याचा पराभव केल्यावर, सुभ्याचा नाश केल्यावर. **सुभा** – सुभेदार (दयाबहादर) **हा** – असा. **दम** – विश्वास, भरवसा, आश्वासन. **खातरतसलीम** – खातरनिशा, खात्री **पगडीबदल भाईचारा करणे** – एकमेकांनीं परस्परांचीं शिरोभूषणें घेऊन स्वतःच्या डोक्यावर घालणें उत्तर हिंदुस्थानात भाईचारा म्हणजे स्नेह किंवा पक्की एकी झाली असे दाखविण्याकरितां अशा रीतीनें पगडया किंवा शिरोभूषणें बदलण्याचा रिवाज होता **घाटावाट** – घाटांतली वाट. **निटोप्याची** – जवळची वाट (Short cut) मूळ शब्द निटोपा (Straightness). **घाट पाडणे** – घाटातून वाट तयार करणें, काढणें.

(८) **जिम्मा करणे** – हमी घेणें **पार उतरून** – पलीकडे उतरून **सामल** – सामील

पवार आले. ते क्षणीं त्याचे मंडळांत जाऊन, भेट घेऊन, बहुत खातरी केली. हमराहा करून तेथें घोड्याचे खोगीर तोबरे घालून दोन प्रहराचे संधीस जमीदारांनीं कोशा अदकोशाच्या छटीनें गांठ घालून दिली. चैत्राचा महिना, उष्ण अति तीव्र, यावनी सलतान, जागा जागा तहखाने सामसूम होते. अदकोशावरून ' हर हर महादेव ! ' करून घोडे घातले, त्यात भेसळ होऊन निजला त्यास उठूं दिला नाहीं, बसला त्यास उभे राहू दिलें नाहीं, उभा त्यास घोड्यास हात लावूं दिला नाहीं !! याप्रमाणें तहखान्याचे तहखान्यात व बाहेरचे बाहेर, एकसा कत्तल जाहली. तोफखाना आपलासा केला. पायदळ कडब्यासारखें कापले इतक्या अवसरात दयाबहादर जातीनें अवसान धरून पांच चार हजार पठाण हमराहा करून लढाई सुरू झाली. एक प्रहर धुमसाधुमसी होऊन शेवटीं प्रहर दिवस राहताना घोडे घातले. पाच हजार स्वार नाहींसे करून दयाबहादूर याचें डोके हत्तीवर कापले. नतर धारेत पेशवे याची द्वाही फिरवून, सलतन आटपावयास विठोजी बुळे इतलाखी बोलीनें होते, त्याजपाशीं दोन हजार स्वार ठेवून जातीनें आठ हजार स्वारानिशीं उज्जनीस येऊन अमलफैला केला कांहीं एक अवघड पडलें नाहीं. एवढा सुभा बुडवावयास वर्षांची वर्षे लागावी तो एक छाप्यात गावखुद जाहला हा दक्षण्याचा होतकाळ, श्रीमताचा प्रताप, मल्हारजी होळकर याचे तलवारीचा जलूस ! वर्षोगणती परिश्रम एक दिवसात सिद्ध जाहले उज्जन इंदूर वगैरे माळव्यात अमलफैला करून सोदवाड्यांत ज्या गढीवाल्यानें गोळी वाजविली त्या गढीचा कट्टा करून तीनशे तीनशे पाच पाचशे माणूस मेकसूखालीं मारिले ! नारळ फोडीत गेले !! असा निग्रह रबाब पडण्याप्रीत्यर्थ करून माळव्यात अमलफैला केला तो रजवाडयाचे जाब आले.

---

(८) **हमराह** – सामील करून घेऊन. **छटीने** – छटयाने, अन्तराने, तफावतीने. **उष्ण** – ऊन **तहखाना** – उष्णतेपासून बचाव करण्याकरितां जमिनींत खोदलेलें तळघर **जागा जागा तहखानें सामसुम होते** मुसलमानी सैनिक तळघरातून आराम करीत पडले होते. **त्यात भेसळ होऊन** – शत्रूच्या सैनिकात घुसून **एकसा** - एकसहा, सरसकट. **आपलासा केला** – जिंकला. **धुमसाधुमसी** – लाबून लाबून प्रत्यक्ष अगास आग न भिडता चाललेले हल्ले, प्रतिहल्ले. **गांवखुद होणे** – नष्ट, निष्प्रभ होणें **'होत काळ' किंवा 'होता काळ'** – म्हणजे उत्कर्षाचा योग, बढतीचे दिवस. मुळात साने यांनी 'बेत काळ' असें छापले आहे ती मोडी वाचनाची चूक होय. **जलुष** – दरारा, पराक्रम. **गोळी वाजविली** – प्रतिकार केला, बन्दुकीच्या गोळ्या सोडून. **कट्टा करणे** – नाश करणें. **रबाब** – रुबाब, धाक किंवा दरारा.

त्यास बरोबर घेऊन नर्मदा उतरून पुण्यास आले. पुण्यास रजवाडयांचे वकिलांचीं बोलणीं चालणीं खात्रीचीं होऊन बाजीराव साहेब पेशवे यांजला समागमें घेऊन माळव्यांत आले. माळव्या पावेतों अमलफैला आपलाच जाहला होता. पुढें राजवाड्यापैकीं सवाई जयसिंग जयपूरवाले यांचे विचारें राजवाडा पार होऊन दिल्लीचे आसपास खूब धुमा चौफडे केली जाळपोळ अशी केली कीं, दिल्लीचे बाहेर चाळीस चाळीस कोस दिवा ना बत्ती. कुजपुरा लुटला. त्यानें फौजेंत अन्यत्र धातूंचा परित्याग होऊन सुवर्णाचा सग्रह जाहला. पातशाई हालवून माघारे फिरले जयपुरावर येऊन सवाई जयसिंग याच्या व श्रीमंताच्या व मल्हारजी होळकर याच्या भेटी जाहल्या. त्या दिवसापासून मल्हारजी होळकराचा पगडीबदल भाईचारा (झाला). पाच चार रोज लोटल्यावर राजास खर्चाचे अडचणीची निकट लाविली. तेव्हा राजाचे उत्तर पडलें की, आमची विद्या आम्हासच प्रत्ययास येऊं म्हणते कीं काय ? यांनी उत्तर केलें कीं, " हा विषय आपण मनात आणूं नये. खर्चाची सरबरा करावी. " तेव्हा जबरीचा जाब पाहोन जयपुरवाले छद्मी. त्याणीं विचार केला, पैका देणें सुटत नाहीं तथापि काहीं वर्चस्व ठेवून देणे तें द्यावें. अशा भावे मुद्दा घातला कीं 'आम्हीं देणें ते तुळशीपत्र ठेवून देऊ' पेशवे याणी कबूल केले "आम्ही ब्राह्मण आहो, म्हणाल तर तुम्हांला तीर्थही देऊं, परंतु खर्चीस पाहिजे " तेव्हां तीस लाख रुपये तुळशीपत्रासह घेतलें. तेथून निघोन देशात आले

(९) त्याजवर मल्हारजी होळकर पुण्याचे मुक्कामीं होते. त्यांजला दुवक्ता थाळा राणोजी शिंदा चाभारगोंदेकर श्रीमतांपाशीं खिजमातगार होता, तो घेऊन येत होता. त्या समयीं मल्हारजी होळकर याचें बोलणें श्रीमतांपाशीं पडलें होतें कीं, " तुम्हां कडील एक पाग्या व जरीपटका व मुतालकी शिक्के व ब्राह्मण कारभारी द्यावा जरीपटका व खासा डेरा मधीं देऊन आम्हीं डावे बाजूस पागा उतरून कारभार डेऱ्यात होत जावा. आपल्यास पत्रे येणें तीं पाग्या व आमच्या नांवें येत असावीं. असा

---

(८) **रजवाडा पार होऊन** – राजपुताना ओलांडून. **धुमा** – धामधूम. **सुवर्णाचा संग्रह झाला** – खूप लूट मिळाली. **आमची विद्या आम्हासच प्रत्ययास येऊ म्हणते कीं काय** – आम्ही तुम्हास मुलुखगिरीला मार्ग दाखवून दिला ते तुम्ही आम्हापाशींहि खडणी मागू लागलात तेव्हां आमची विद्या आम्हासच फळली असें झालें ! **सरबरा** – तरतूद, पुरवठा **छद्मी** – कपटी. **तुळशीपत्र ठेऊन देऊ** – म्हणजे खडणी म्हणून देणार नाही, दान म्हणून पैका देऊ. दान करावयाच्या वस्तूवर तुळशीपत्र ठेऊन ती देण्याची वहिवाट असते.

(९) **थाळा** – जेवणाचें ताट.

बेत करून द्यावा " श्रीमत यांचें उत्तर " तुम्ही सागाल त्यास पागा देऊं." असें बोलणें चाललेंच होतें. तों एके दिवशीं राणोजी शिंदे थाळा मुदबखात ठेवून मल्हारजी होळकर बिचोब्यात निजले होते, त्याचे पायथ्याशी येऊन उभा राहिला राम राम करून जावे तितक्यात मल्हारजी होळकर राणोजी शिंदे हुजरे यासी बोलिले कीं, " राणू, तुला पागा, जरीपटका, मुतालकी शिक्का देतो. तूं (मज) बराबर चाल " त्याणें उत्तर केलें कीं, " मी जोडा उचलणार, माझी थट्टा करितां कीं काय ? " तेव्हां मल्हारजी बावा बोलिले की, " तिसरे प्रहरी काय होतें ते पहावें." तो राम राम करून पुण्यात गेला. तिसरे प्रहरी मल्हारजीबावा कचेरीस आले. तो बाजीरावसाहेब गादीवर बसून राणोजी शिंदा चौरी उडवीत होता ते समयीं सुभेदारानीं पुनः विनति केली, " आमचे समागमें द्यावयास योजना कोणाची करितां ? " तेव्हा श्रीमतांनीं उत्तर केले की, " तुम्ही सागाल त्यास देऊ " नंतर मल्हारजीबावा बोलिले कीं, " हा राणू चौरी उडवितो याजला वस्त्रे द्यावीं " उत्तम आहे, असे म्हणोन तेच समयीं वस्त्रें आणून राणोजी शिंदे यास दिलीं वस्त्रे पागा देऊन बाहेर गारपिरावर डेरा दिल्हा. कारभारी याची योजना होण्यास एक दोन रोज विचार जाहला. मग रामचंद्रबावा शेणवई कारभारी नेमात आले मल्हारजीबावानीं सरकारी शिक्के कटार श्रीमंताचे रुबरू राणोजीबावास दिले त्या दिवसापासून शिंदे होळकराची गाठ

(१०) उभयता पुनः माळवे प्राती आले रामचद्रबावा कर्ते पुरुष व मल्हारजी होळकर याजला सरदारी दिली ते समयीं कारभारी गगाधर येशवंत करून दिले होते (ते, अशा) उभयतानीं एक विचारे माळव्याचे महालाचा आकार पाहून वाटण्या केल्या निमे शिंदे निमे होळकर ऐसी वहिवाट चालली परंतु वाटणीचा तपशील येणेप्रमाणें — श्रीमत ४५, शिंदे २२॥, होळकर २२॥, पवार १०. याप्रमाणें आकार पाहून माळवा वाटून दिल्हा ते समयीं उदाजी पवार यास वैषम्य वाटलें कीं, आम्ही काय नाकार म्हणोन आम्हास दहा ? तेव्हा कौठेकर यानीं पवाराचें शातवन केलें कीं, " त्यान्या जमेती मोठया व बाजीरावसाहेब यानीं पागोटें काढून तुमचे पुढे ठेविले ते समयीं सन्मानाने आला असता तर इतकेही बोलणें शोभते आता बोलले असता पुन्हा फाटा पडून पूर्ववत् होईल यास्तव जहालें हेंच

(९) **मुदबख** – पाकशाळा. **बिचोवा** – एक काठीची लहान राहुटी. **गारपीर** – स्वारीस निघतांना पुण्याबाहेर सैन्याचा तळ पडण्याची नेहमींची जागा. **रुबरू** – समक्ष, देखत.

(१०) **नाकार** – नादान. **फाटा पडणे** – बिघाड होणें.

उत्तम मोजून सोभत द्यावी. " असें सांगितलें. तेव्हा पवार आपले मनात समजोन उगेच राहिले. महालाच्या वाटण्या जाहल्या त्याप्रमाणें अद्यापि चालतात. फौज उभयतानीं कोणी कितीक ठेवावी ही श्रीमताची नेमणूक नाहीं. उभयता सरदारानीं आपले नावालौकिकाकरिता फौज लागेल तशी ठेवून राजेरजवाडे याजवर जरब बसवून उत्पन्नावर हुकूम वाटून घेऊन नक्षा राखावा याप्रमाणें राणोजीबावा असता वहिवाट चालली. पुढें राणोजीबावा याचे पुत्र जयाजी, दत्ताजी व जोतिबा हे त्रिवर्ग खासे, व तुकोजी व म्हादजी उभयता विदुर, एकूण पाचजण होते. त्यापैकीं तुकोजीचें व जयाजीचें न बने, यामुळे ते श्रीमतापाशीं राहिले जयाजी शिंदे व मल्हारजी होळकर याणीं स्वाऱ्या शिकाऱ्या करून, रजवाडे जेर करून पुण्यास आले ते दिवसात जयपूरवाले सवाई जयसिंगाचे चिरजीव उभयता ( होते ) त्यात गादीचा अधिकारी सिसोदेवालीचा पुत्र माधोसिंग परतु हे धाकटे वयानें, सबब राजाने कनिष्ठेचा पुत्र ईश्वरसिंग हा गादीवर बसवून आसन्न काळाचे समयीं जयसिंगानें असे करून निधन पावले नतर ईश्वरसिंगास राज्याभिषेक होऊन गादीचा मालक माधोसिंग याजला दगा करून मारून टाकावा या इलाजात होते. तेव्हा माधोसिंगाची मातुश्री माधोसिंगास घेऊन माहेरी उदेपुरास आली मग राणाजीनें रामपुरा चद्रावताचे येथे माधोसिंगास ठेवून मल्हारजी होळकर याजकडे सधान केलें की, " माधोसिंग तुमचा भाचा आहे, याची शरम ठेवून जयपुरीं गादीवर बसवावें." असेंच उमेदसिंग होडे याची सापत्नमाता जयसिंग जयपूरकर याची बहीण, तिनें सापत्न पुत्र वाढविला काहीं बहीण-भावाचे बोलण्यात विग्रह होऊन बहीण मूल उमेदसिंग याजला घेऊन पुण्यास मल्हारजी होळकर याजपाशी आली कीं, " मी तुझी बहीण, जयसिंगाने बोलण्यात विग्रह केला. याजमुळें मी राज्य सोडून तुजपाशीं आलें मागे भावानें बुंदीचे राज्यात अमलफैला केला. आता या मुलास स्थानारूढ करणें तुजकडे आहे. "

(११) दोन्ही राजकारणें घेऊन ( मल्हारराव ) बाजीराव पेशवे याचे चिरंजीव नानासाहेब याजला घेऊन माळव्यात आले पुढें चाल करून परगणे नेवाई प्रांत धुडाड

( १० ) **सोभत द्यावी** – सोबत द्यावी म्हणजे शिन्दे होळकराबरोबर राहून काम करावें. **उत्पन्नावर हुकूम वांटून घेऊन** – 'हुकूम वाटून घेऊन' या ऐवजीं मूळांत 'हुंड्या वाटून घेऊन' असे असावे. मोडी वाचनाची चूक आहे. **विदूर** – अनौरस, लेकवळे, रक्षापुत्र, खर्चीं संतति. **खासे** – औरस **ते** – तुकोजी. **सिसोदेवाली** – उदेपूरकर राजाची कन्या. **कनिष्ठेचा** – कनिष्ठ बायकोचा **बसवून** – बसविला. **इलाज** – उपाय. **राणाजीनें** – उदेपूरच्या राण्यानें.

येथ पावेतों आले. जयपूरवाल्याचें पारिपत्य करावें. तो शिरावर बरसात वारद झाली च राजा सरंजामें करून जबर. तेव्हा नाना यांणीं मसलत काढिली की हा दिवस लढाईचा नव्हे. बाजबरसात याचें पारिपत्य करू. आता शहास गुंतून छावणी केल्यास खर्चाची अडचण पडेल. याप्रमाणें विचार काढला. तेव्हा मल्हारजी होळकर याणीं आपलें कुटुंब खंडेराव होळकर चिरजीव बराबर देऊन मार्गस्थ केले. आपण जातीनें होळकर व सडी फौज घोडा राऊत त्याच निजध्यासात राहिले शिंदे याचे कोणी बराबर नव्हतें. नाना कूच करून गेल्यावर जयपूरचा राजा ईश्वरसिंग मल्हारजी होळकर याजवर चालून आला त्याची यांची तफावत सात आठ कोसाची. हें सुभेदार यास कळतांच निवडक दोन हजार स्वार घेऊन पूर्व रात्रीस रागड्याचे आसपास गलीमी करावी याकरिता गेले हे जाऊन पोचताच रागडे याचे कूच होऊन सडी स्वारी पुढे अर्ध कोशावर, बुणगे दरोबस्त ठिकाणी, अशी संधि पाहून, बुणग्यावर जाऊन पडताच त्यास समजले, "मल्हार आया !" मग मनुष्याचें जिवात जीव न रहाता मर्दनामर्द एकसारिखें जाहले दोन घटिकेत लुटून लाखेरीच्या दऱ्याकडे घेऊन गेले. पाऊस सतत लागला. राजाचे फौजेत अन्नपाणी ( घेण्यास ) अमळ देखील मवसर नाही जेर जहाले तेव्हा कारभारी याणीं मसलत दिली कीं, "बुणगे गेले, जामदारखाना गेला, फौजेनें हैबत खाल्लीं. आता तह ठरवावा " मग वकील पाठवून बोलों लागले तेव्हा सुभेदार याणीं बोलणें घातलें कीं, "बुदीचे राज्य व पंचवीस लाख रुपये द्यावे तेव्हा तुम्हास जाग्यावरून हालूं देऊं." तेव्हा राजानें निरुपाय जाणून वीस लाख रुपये व बुंदीचें राज्य देऊन जयपुरास गेला. इतके अवसरांत श्रीमत इंदुरास दाखल जाहले तों हें वर्तमान समजल्यावर श्रीमंतांस संतोष जहाला. बुंदीचे राज्यावर उमेदसिंग होडे याजला बसवून दिले राजामल्ल खत्री जयपूरचा कारभारी त्याचें व राजाचें चित्त शुद्ध नव्हतें तो सुभेदार यास मिळोन होता. मग सुभेदार इंदुरास येऊन श्रीमंतांसुद्धा देशी आले.

( १२ ) पुनः मल्हारजी होळकर फौजबंदी करून माळव्यांत एकटेच आले. हें वर्तमान राजामल्लास कळल्यावर सुभेदार याजला फौजेसुद्धां चाटसू प्रांत धुडाड येथपावेतों आणून ईश्वरसिंग राजास कळविलें कीं, मल्हारजी होळकर आला. तेव्हां

---

( ११ ) **बरसात** – पावसाळा. **वारद** – प्राप्त. **शिरावर बरसात वारद झाली** – पाऊसकाळ डोक्यावर आला. **बाजबरसात** – पावसाळ्यानंतर, बाज म्हणजे नतर. **निजध्यासांत** – जयपूरवाल्यांचा कांटा काढण्याच्या उद्योगात. **गनिमी** – गनिमी पद्धतीचे छापे घालणें, धामधूम उडवून देणें. **मवसर** – अवसर, सवड. **हैबत** – भीति, धास्ती.

आज्ञा केली कीं, आपली फौज जमा करा. ऐकून कानागाडा केला. हा फितूर राजास समजताच राजानें विषप्रळय केला. हें वृत्त कारभारी यांणीं मल्हारजीबावांस कळविताच कूच करून दरवाज्याजवळ मुक्काम केला. दरवाजे उघडून आंत जाऊन राजास अग्निसंस्कार करून, नियतशाबूदी व पुढें होतकाळाचे लक्षण, जयपुरासारिखें राज्य बैतन हातीं लागले असता दुराशा रतिमात्र न करिता बदोबस्त कारभारी यासी सोपवून आपण मुक्कामास येऊन साडणी स्वार रामपुऱ्यास पाठवून माधोसिंग राजा जयपूरचा तेथें आणून (त्याची) चिरंजीव म्हणून स्थापना केली. पाऊण कोट रुपये नजर व रामपुरा, हिंगळाजगड व टोंक व धाकटा रामपुरा इतक्या जागा दिल्या तो मागाहून शिंदे आले यांणीं ठरलेला कार मोडावा, दुसरा राजा बसवावा, असे मनात आणून महिनाभर घोळ पडला शेवटीं जयपूरवाले छत्री यांणीं शहरात कौलाचा बाजार भरवून शभराची रक्कम पचविसांत द्यावी. ही शोहरत शिंद्याचे फौजेत कळताच कमक्सर दहा हजार मनुष्य चढापाला शहरांत खरेदी

---

(१२) **कानागाडा** – कानाडोळा, दुर्लक्ष. **विषप्रळय केला** – विषप्राशन केलें. **नियतशाबूद** – वचनाचे धड, दिलेला शब्द पाळणारे. **होतकाळ** – उत्कर्ष काळ. **बैतन** – बेवारस झालेले. **दुराशा** – लोभ. **यांणीं** – मल्हारराव होळकरांनी. **कार** – करार, ठराव. **कौलाचा बाजार** – मौलाचा बाजार असे असावें. या बाबत अत्रेकृत मल्हारराव होळकर चरित्रात अशी माहिती दिलेली आहे.

"मौल म्हणजे कपट इंद्रजाल वगैरे. मौलाचा बाजार व मिनाबाजार भरविण्याची पूर्वी चाल होती कै. श्री जयाजीराव शिंदे हे मिनाबाजार भरवीत असत असें ऐकिवात आहे. या बाजारात मालाची विक्री करण्यास बहुधा वेश्या किंवा स्त्रिया असतात. त्या मालाची मागतील तितकीच किंमत द्यावी लागते, व एकदा रक्कम किंवा माल मागितल्यावर तो घ्यावाच लागतो असा नियम आहे. हा बाजार रात्रीस भरतो ह्याचाच दुसरा प्रकार खोट्या रकमा (वस्तु) किंवा रकमेचें रूपांतर करून बहुत किंमतीची रक्कम थोड्या किंमतीस द्यावयाची, व यासच 'मौलाचा बाजार' म्हणतात. "मौलाचा" ऐवजीं 'कौलाचा' वाचणें ही मोडी वाचनाची चूक समजावी.

**शोहरत** – आवाई. **मनुष्य चढापाला** – 'मनुष्याचा ढाबळा' असा दुसरा पाठच बरोबर वाटतो. 'ढाबळी' किंवा 'ढाबळा' म्हणजे कबुतरांना राहावयाकरतां केलेली अनेक कप्प्या कप्प्याची पेटारी. एकेका ढाबळींत शें दोनशें सुद्धां कबुतरें राहू शकतात. त्यावरून ढाबळा किंवा ढाबळी म्हणजे जमाव, थवा असा अर्थ निष्पन्न झाला. येथें दहा हजार शिंद्याच्या माणसांचा जमाव कबुतरांच्या ढाबळ्याप्रमाणें एक गटानें मौलाच्या बाजारास गेला. **कमकसर**–कमी अधिक, अजमासें, सुमारें, फार नाहीं तरी.

करितां गेले. त्यांनीं शहराचे दरवाजे लावून कत्तल केली. हें वर्तमान बाहेर रतिमात्र फुटों दिले नाहीं. तेव्हां दोन स्वार राजमहालाचा दरवाजा तिरपुल्यापासून घोडे हाकून, कोट शहराचा आतून वीस हात उंच व बाहेरून शंभर हात उंच असा कोट उडून दोन राऊत आले. त्यात एक तर कोटाचे चारव्यास अडकून बरोबर जाहला. एक शाबुतीनें लष्करात आला. त्याणें वर्तमान समजाविलें. सात आठ हजार खासा कामास आला. लष्कर बरबाद जाहले येणें करून शिंदे याचा तोरा राहिला नाही. मग शिंद्यानीं आपसात समेट घालून मल्हारजी होळकर याणीं ठराव केला त्यास अनुसर होऊन राजाचे कारभारी बोलावून त्यास जरब दिली कीं, "तुम्हास गादी-वर बसविले याचा फायदा आम्हास हाच कीं काय? विश्वासघात करून दगा केला! काय चिंता आहे जयपूर खोदून बराबर करितो!" तेव्हा जयपूरचे कारभारी याणीं उत्तर केले कीं, "आम्हास ठिकाणशीर बसविलें असता आम्हाकडून अशी हराम-खोरी कशी घडेल? माणसाची चुरस होऊन समेटात न येता अरे अरे करणे आमचे आम्हापाशीं राहून ही दशा जाहली." अशी लाचारी बोलतात, इतक्यात धुळेवाला रजपूत भाईबेटा राजाचा, त्याची पहाडावर गढी, माची (स) शहर, ती अस्तमानी स्वारी जाऊन मल्हारजी होळकर सुभेदार याणीं माचीची वस्ती लुटून जाळून गढी खोदून बरबाद केली. प्रहर दिवस येता लष्करात आले आणि बोलून दाखविले की, "याप्रमाणें तुमचे राज्याची अवस्था एक्या महिन्यात करितों आजची मिती माडून ठेवावी." असें बोलता जयपूरचे कारभारी याजवर जरब पडली. त्याणीं बहुत आधिनी करून गुन्हेगारी बाबत पचवीस लाख रुपये याची निशा देऊन येथून कूच

---

(१२) **तिरुपला** – तिरपुल्या. म्हणजे तीन कमानींचा. असे दरवाजे बाजारास पूर्वी करीत असत. सध्या रतलाम येथें असा एक दरवाजा आहे. **कोट उडून** – कोटयाच्या तटावरून घोडे उडवून. **चारवा** – मूळ शब्द 'चर्या' असा असावा. त्याचा अर्थ राजव्यवहार कोशांत 'चर्या प्राकारफालिका' असा दिला आहे. त्यावरून, तटाच्या भिंतीवरच्या माथ्यास, कातरलेल्या करजी प्रमाणे किंवा कमळाच्या पाकळ्या प्रमाणें बांधकाम केलेलें असतें ते. महाराष्ट्र शब्द कोशात तुकाराम गाथेंतील अवतरण दिले आहे तें असें "उभारिली दुर्गे दारवटे फाजी। कोटि चर्या माझी शोभलिया।" यावरून शब्दकोशकारांनीं चर्या या शब्दाचा अर्थ रचना, बांधणी असा मोघम कांही तरी लाविला आहे. नक्की वर्णन कळत नाहीं. **बरोबर जाहला** – ठार झाला. **बरबाद** – नष्ट. **तोरा** – वरचष्मा, डौल. **अनुसर होणें** – कबुल होणें. **ठिकाणशीर** – योग्य त्या ठिकाणीं. **आधिनी** – अजीजी, आर्जव, विनवणी. **निशा** – खात्री.

करावें असें ठरावून कूच करविलें.

(१३) त्या सधींत दिल्लीकडील राजकारण मनसूर अल्ली दिल्लीचा वजीर याजला फर्काबादवाले पठाण यानीं दग्यानें लुटून घेतलें, याजमुळे मनसूर अल्ली लाचार कायल होऊन सुभेदार यांजकडे बोलणें करण्यास वकील पाठविला कीं, "तुम्हीं आमची मदत करावी तुम्हास कुचाचे लाख, मुक्कामाचे पन्नास हजार रुपये देत जाऊ" असे शिंदे होळकर यांशीं बोलणे होऊन दरकूच आगऱ्यास आले तिकडून मनसूर अल्ली दिल्लीहून आगऱ्यास आला. सरदाराऱ्या त्यांच्या भेटी जाहल्या. हें वर्तमान फर्काबादवाल्यास समजल्यावर त्यांणीं सादलबादल पठाण चाळीस हजार फौज व दोनशें तोफा, काही पायदळ भरवशाचे, हा जमाव कासमगजाचे पुलावर पाठविले हें वर्तमान शिंदे होळकर यास समजताच सुभेदार याणीं आपले कडील गगाधर येशवंत व शिंद्याकडील साबाजी शिंदे वीस पचवीस हजार घोडा सडा राऊत तत्क्षणीं रवाना केले यानीं यमुना उतरून, त्याशीं मुकाबला घाल्न तिसरे लढाईस सादलबादल याची फौज लुटून घेऊन सरदाराची डोकीं कापून आणिलीं. हे वर्तमान शिंदे होळकर उभयता सरदारापाशीं येताच मनसूरअल्लीसुद्धा कूच करून फर्काबादेस गेले फर्काबादवाले पठाण शहर सोडून भागीरथीचे खळ्यात जाऊन राहून गंगापार रोहिल्याचे मुलुखांतून रसद आणून खळ्याचे आसऱ्याने राहिले. तेथें शिंदे होळकर याचा उपाय, जागा बिकट याजकरिता, न चाले. तेव्हां गंगा उतरून रोहिलखडात शिरले तेथें बातमी राखून फरकाबादवाल्याची रसद बद करून मारून आणिली त्यास खळ्यात अन्नाची भ्राति जाहली. तेव्हा फर्काबादवाले यास रोहिले सामल होते पन्नास, शंभर हजार फौजेचा जमाव करून रोहिले यांणीं शिंदे होळकर याचा मुकाबला केला. उभयता सरदारानीं त्याचे फौजेभोंवती गनिमी करून अन्नपाणी, हागमूत बंद करून आठ रोजात लुटून घेतलें. जातीनें पळून कमाऊचे पहाडात शिरले. त्याचे मागोमाग फौजा रवाना होऊन पहाडात कायल केले. तेव्हां रोहिले व फर्काबादवाले पठाण मनसूरअल्ली वजीर यासी शरण जाऊन भेटले. वजीरानीं आपले मनोदयानुरूप पठाण रोहिले यांचा तह ठरावून, मसलत समेटून शिंदे होळकर यास दिल्लीस घेऊन आले. पातशाई भेटी होऊन

(१३) खळी – खळगा, सखल प्रदेश. खळ्या खोचरे असा शब्द ऐतिहासिक पत्रांतून अनेक वेळां आलेला आहे. खोचर किंवा खोचार याचा अर्थ A gorge, recess, or hollow amongst hills. खळी – A pit hole or hollow, A cavity or small depression. रसद – धान्याचा पुरवठा. मारून आणली – लुटून आणली.

खिलत चौघडा शिंदे होळकर यांस दिल्हा पैसा मनसूरअलीनें कबूल केल्याप्रमाणें कवडी कवडी चुकघून दिली.

(१४) त्या संधीस देशीं निजामअली याचा दिवाण रामदासपंत यांनीं फौजबंदी करून नानासाहेब व भाऊसाहेब याजवर चाल केली. पारनेराजीक लोणी कोल्ह्याची येथें मुक्काम आला. श्रीमंताचा मुक्काम तीन कोसांच्या छटीने सुप्यावर होता. ती बातमी रामदासपतानीं ठेवून छापा घातला. तो छापा श्रीमतानीं मारून शाबुतीने राहिले ईश्वरे खैर केली. हें वर्तमान दिल्लीस गेलें शिंदे होळकर यांजला समजले तेव्हा निजामअली याचा भाऊ गाजुदीखा दिल्लींत होता त्याजला दक्षणचा सुभा पातशापासून सागून निजामअलीची तहगिरी केली बाहालीच्या सनदा गाजुदी-खांस देऊन त्याजला घेऊन देशी आले औरगाबादेस आलियावर गाजुदीखां शह-रात भेटावयास गेला तेथे निजामअलीच्या कोणी बायका होत्या, त्याणी जहर घालून त्यास मारून टाकिले. त्याजबराबर पाच कोटीची रोकड होती त्याजवर श्रीमंतांनी बदनियत ठेविली होती तेव्हा मल्हारजी होळकर याणीं सुभा आणिला त्याचा अभिमान धरून श्रीमतासी उत्तर केले की, "म्या बेलभडार देऊन आणिलें. त्याचा प्रकार असा जाहला. ईश्वरी कृत्य यास उपाय नाहीं. परंतु त्याची वस्तवानी व शरीर दिल्लीस पोचवून देईन" असे बोलून सटवाजी राजोळे पाच हजार फौजेनिशीं गाजुदीखांचे प्रेताबरोबर देऊन सुतळीच्या तोड्यासुद्धा दिल्लीस पावता करून दिल्हा या प्रमाणे ती स्वारी झाली.

(१५) त्या उपर तिसरे स्वारीस फौजबदी करून श्रीमत दादासाहेब व जयाजी शिंदे व आपण कुंभेरीस येऊन सुरजमल्ल जाट यास शह दिला जाटानें कुंभेरीचा किल्ला बळकावून लढायास सिद्ध झाला तेथें फार करून आग्रह सुभेदाराचा, श्रीमत व शिंदे यांचा आंतून जाटाशीं मेळ, (म्हणून) ते मोर्च्याचा निकट करीनासे जाहले. जाटाचे उपराळ्याकरिता महमदशा पातशाई दिल्लीहून कूच करून चमेल सिकंदरा येथें आला. इतक्यामध्ये मल्हारजी होळकर याचे पुत्र खंडेराव होळकर कुंभेरीच्या मोर्च्यामध्यें गोळी लागून कामास आले. मग होळकर याचा मनोभग होऊन सर्व

---

(१३) खिलत – सन्मानाचा पोषाख.

(१४) तहगिरी – अधिकारावरून दूर करणें, बडतर्फी. जहर – विष. बदनियत – पापदृष्टि. पेशव्याच्या मनांत गाजीउद्दीनखानाची पाच कोटीची रोकड लुटून घ्यावयाचे होते. बेलभंडार – शपथ, आणक्रिया, वचन.

(१५) बळकाऊन – मजबूत करून. मोर्च्याचा निकट करीनासे जाहले– होळकराच्या मोर्चांना मदत करीनासे झाले. उपराळा – मदत. मनोभंग–हिरमोड.

प्रकारें उदास जाहले. मग दादासाहेब व शिंदे यांणीं पातशा याचा दबाव दाखवून जाटाचा मेळ करावा अशा भावें सुभेदार याशीं बोलू लागले. याणीं उदासीच्या भावे उत्तर केलें "आपण धनी व शिंदे मुकत्यार सरदार, चांगलें तेंच कराल. आम्हीं शिलेदार सागाल ती चाकरी करूं." अशा भावीं उदासीचीं बोलणीं होऊन चिरंजीवाचें उत्तरकार्यानिमित्त न पुसता मथुरेस कूच करून आले. तेथून पातशा चाळीस कोस. तिसऱ्या प्रहरापासून चाळीस हजार पेंढारी, दाहा हजार स्वार, दाणा-चारा करून पांच हजार स्वाराच्या हाती एकेक दोन दोन बाण इतक्यानीं मथुरेहून दौड करून जातीनें मागील पाच घटका रात्र राहता पातशाई सल्तानापाशी दाखल जाहले पातशाई सलतानात! पाहाटचा वेळ, आपले जागा ऐषआरामात! याणी जाताच फौजेभोंवताला तलावा दिला. कोणी असे बोलेना की, "तुम्हीं कोण कोठील?" अशी गाफली पाहून काही बाजारावर व काहीं खाशा डेऱ्यावर बाण टाकिले. त्या बाणाच्या गराट्यानें 'मल्हार आया!' या दहशतीने पुरुषमात्राने बायको सोडून दिल्लीचा रस्ता धरिला. असेच पातशाई नालखीत बसोन दिल्लीस गेले मग फौज लुटावयास सुरुवात जाहली. हे फौज लुटून फन्ना केली. मलकाजमानी पातशाहाची बेगम, पेंढारी याशीं गाठ, तेव्हा इचे तालेमाले काहीं एक न राहता, विवस्त्र करून **चा देखील झाडा घेतला तिचे म्हणणे "मल्हार कहा है?" हे वर्तमान सुभेदारास समजल्यावर तोंडावर मारून घेऊन, 'ही सर्वांची मातोश्री, इच्यावर हा गजब, मी प्रसगी असतां! हा केवल प्रमाद!' असे दु ख मनात आणून हातात नागवी समशेर घेऊन पायउतारा धावत गेले. तेथे पेंढारी याची गलबल पाच सात पेंढारी आपल्या हातानें तोडून, बाईजवळ गेले बाई दर्जोत नग्न उभी! तेव्हा दोरव्याच्या शेल्याची पाचग होती तो शेला सोडून (तिच्या) आगावर टाकिला काहीं शासन देण्याकरिता पाय धरिले, तेव्हा

(१५) **दबाव** – भीति. **उदासी** – उदासीनता. **उदासीच्या भावे** – उदासीनपणामुळें, खिन्नतेमुळें. **सलतान** – लष्कर. **तलावा देणे** – भोंवतीं घिरट्या घालणें. **गराटा** – दरारा, दणका. **नालखी** – पालखीपेक्षा वरिष्ठदर्जाचें वाहन. नालखीचा मान पालखीपेक्षां फार मोठा मानतात **पातशाही नालखींत बसून दिल्लीस गेले** – मोगल सरदारानें पळून जातांना आपली 'नालखी' तेथेंच टाकली होती. त्याच नालखींतून मल्हारराव दिल्लीत गेले **ताले-माले** – मोठेपण, प्रतिष्ठा. **दर्जो** – मूळ शब्द 'पर्जो' असावा. 'परज' म्हणजे 'कैद.' दर्जो असा शब्द स्वीकारल्यास "अशा ऐश्वर्यांत!" असा अर्थ होईल. **पाचंग** – पचंग, पासोडी, कांबळें इ. वस्त्र मानेपासून कमरेपर्यंत पोट पाठ झाकेल असें गुडाळून गळ्यामागें गांठ देण्याचा प्रकार **कांहीं शासन देण्याकरितां पाय धरले** – 'मी गुन्हेगार आहें. मला चुकीबद्दल वाटेल ते शासन करावें' असें म्हणून मलकाजमानीचे पाय धरले.

तिनेंही छातीशीं लाविलें, "बेटा—तूं होते (तो) हमारे पर ऐसा गजब न होना! परंतु खुदाका गजब! तू क्या करेगा ?" या भावीं समाधान करून तितक्यात सुभेदारानीं पेंढारी लुटारी वगैरे दूर करून पांचशें स्वार चौकीस उभे केले. आणि ते समयीं कारकून बापूजी त्रिंबक वरखेडकर दृष्टीस पडला त्याजला तेथील सोंप केली. "जे बाईचे मुखावाटें निघेल त्यास रुकार देऊन तत्क्षणीं मजला लिहीत जावें. सरबरा होईल." असें सांगून तेथील लुटीपैकींच लाख दोन लाख रुपये त्याचे तसलमातीस देऊन चौकी पाहऱ्याचा वगैरे त्याचे बंदोबस्त करून आणखीही बायका होत्या त्यांजला एकत्र केलें. वरकड सलतान बाजार वगैरे जातीनें पातशा मागें गेले, पातशाई सलतन तेथील तेथेंच राहिली, याचा बदोबस्त सुभेदारानीं केला.

( १६ ) हें वर्तमान दादासाहेब व शिंदे यास समजल्यावर शिंदे यानीं नक्षाची गोष्ट एकीकडे ठेवून, वैषम्य मोजून, वाटा न घेता, मारवाड प्रांतीं उठोन गेले. त्या दिवसापासून शिंदे व होळकरांची मनओळख पडली! पातशाई सलतन लुटींत आली तिचा होळकर यानीं आपला वाटा घेऊन शिंदे व श्रीमंत याचा वांटा दादासाहेब याचे हवाला केला. शिंदे मारवाडात गेले ते तेथें दगा होऊन मृत्यु पावले. होळकर दिल्लीस गेल्यावर पातशाहापासून ऐशीं लाख रुपये ठरावावरून काहीं नक्त, बाकी ऐवजाचे माहाल अंतरवेदींत विटावे तालुक्यापैकीं घेतले याप्रमाणें ती मुलुखगिरी होऊन देशीं आले.

( १७ ) त्या उपर फौजबदी करून श्रीमंत दादासाहेबास घेऊन हिंदुस्थानांत आले. जयाजी शिंदे याचे बधु दत्ताजी शिंदे हे मारवाडांतच होते. दादासाहेब व होळकर दिल्लीस आले. दिल्लीमध्यें नजीबखान दिल्ली बळकावून होता. त्याजला सामदाम करून दिल्लीबाहेर काढून त्याजला शुक्रतालीं पोहोंचाऊन दिलें. अदले वर्षीं नादरशा गिलच्या दिल्लीस येऊन, दिल्ली व मथुरा लुटून, आपलें ठाणें बसवून आपले ठिकाणीं गेला. त्याच्या फौजा सरहद्द लाहोर येथें होत्या. त्याकरितां सुभेदार अग्रेसर होऊन दादासाहेबांस घेऊन सरहदेस गेले. तेथें गिलच्यांची फौज दोन सरदार होते. त्यांशीं लढाई करून फौज लुटून सरदार धरले. तेथून लाहोरास गेले. तेथें दिनाबेग गिलच्याकडील सरदार होता. त्यास जरब दिली. तेव्हां हात जोडून

---

( १६ ) **वैषम्य मोजून** – वैषम्य वाटून घेऊन. **मन ओळख** – वैर, द्वाडवैर, मनापासून वैर. **ठरावावरून** – मुद्रणदोष दिसतो 'ठराव करून' असें असावें.

( १७ ) **नादरशा** – स्वतः नादीरशहा नव्हे. त्याचा सरदार अहमदशाह. **सरहद** – सरहिंद. **दिनाबेग** – आदिना बेग.

रुजू जाहला. तथापि त्याजलाही लुटून एक महिना मुक्काम करून होते. पुन्हा दरमजल माळव्यांत येऊन श्रीमंत दादासाहेब शिरोंजेच्या मार्गे देशीं गेले. शिंदेहि मारवाडांतून देशीं गेले होते त्यांणीं फौजबंदी करून दिल्लीचे रोखे गेले. सुभेदार इंदुरीं आल्यावर लोकांचा समजावेश करून देशीं जावें या विचारांत होते.

(१८) तितक्यांत देशींचीं पत्रें वकिलांकडून सुभेदारांस आलीं कीं, तुमचे ठायीं श्रीमंतांची नजर ठीक नाहीं, तुम्हीं सावध होणें. हें ऐकून सुभेदारांनीं पुढें गंगाधर येशवंत व अन्याबा पळशीकर रवाना केले. मागाहून जातीनें फौज आठ दहा हजार खाशांसुद्धा जेजुरीस गेले. तेथें श्रीमंत नानासाहेबांचा पुत्र माधवरावसाहेब जाऊन भेटी गोष्टी जाहल्या. जेजुरीहून पुणेंयाचे मुक्कामीं यावें तों त्यांचे मनांत कल्पना येऊन वेलवढयावर मुक्काम झाला. मग संताजी वाबळे, मोत्याजी खराडे यांणीं सुभेदार यास बुद्धिवाद मनसुब्याचें धोरण व सत्क्रियेचें लक्षण (इत्यादि) उपदेश करून श्रीमतांची भेट घ्यावी असें ठरविलें. मग दहा वीस रावतांनिशीं पालखींत बसून पुण्यात भेटीस चालले. हें वर्तमान नानाभाऊस समजल्यावर उभयतां चाळिसां स्वारांनिशीं सामोरे आले. कुंभार वेशीपाशीं भेटी जाहाल्या. हे मुक्कामीं आल्यावर सुभेदार यांणीं मनसुबा करून मागील प्रहर रात्र राहता, पालखींत बसून एकाएकीं श्रीमंतांचे वाड्यात जाऊन बिवाजी नाईक (होता) त्याच्या बगलेंत पालखींतील गादी व तक्या देऊन समोरले ओसरीवर माणसें काणसें निजलीं होतीं, त्यातच गादी टाकून आपण वर निजले. तों श्रीमत नाना भाऊ हे उठोन आपलाले तालीमखान्यांत जाऊन बाहेर आले तों चौकीदारांनीं जाऊन विनती केली, "सुभेदार चार घटिका जाहल्या ओसरीवर येऊन माणसा काणसात निजलें आहेत." तसेच उभयता सुभेदारांजवळ आले. बिंबाजी नाईक बुक्या मारीत होता. तो उठोन एकीकडे उभा राहून उभयतांस कुरणीस केली. उभयतानीं त्यास प्रश्न केला कीं, "सुभेदार जागे आहेत किंवा झोंपेंत आहेत?" त्याणें उत्तर "डोळा लागला आहे," असें केलें. "आज्ञा जाहल्यास जागे करितों." ही भाषणें परस्परेंची ऐकून जागे होतांच, झडपडोन उठोन एकीकडे

(१७) **रूजू जहाला** — शरण येऊन भेटीस आला. **समजावेश** — समजाविशी.

(१८) **वेलवढ्यावर** — येलवढ्यावर असें पाहिजे. येलवढे म्हणजे सध्यांचें येरवडें. **मागील प्रहर रात्र राहतां** — एक प्रहर रात्र उरली असता. **एकाएकी** — एकटेच. **माणसें काणसे** — माणसें बिणसें, सामान्य जन, नोकर लोक. **तसेंच** — तत्काल. **बुक्क्या मारीत होता** — पुष्कळ श्रीमत लोकांना नोकरांकडून बुक्क्या मारून घेऊन, अग रगडून किंवा मालीश करून घेत झोपण्याची सवय असते. **कुरणीस** — कुर्णीसात. **झडपडोन** — खडबडोन, दचकल्यासारखें.

उभे राहून श्रीमंतास रामराम केला. हात जोडोन उभे राहिले. तेव्हां नानांनीं पुढें येऊन हात धरून गादीवर बसले. "सुभेदार! आपण रायांचे ठायीं! आज पावेतों आपलेंही करणें वडीलपणासारखेंच (मग) आज लवून रामराम करणें, हात जोडणें कोठून आणिलें?" इतकें बोलणें होई तोंपर्यंत भाऊ जागचे जागांच उभे होते. त्यांसी सुभेदार बोलले कीं, "बाबा तूं कां उभा? बैस. तुला काय प्राण घेणें, कैद करणें, तें कर." असें भाऊसाहेबास बोलून बसविलें. मग उभयतांसी बोलूं लागले कीं, "बाळाजीपंत नाना, बाजीरावसाहेब, यांन्यापुढें आम्ही बेकैदी हे लेंकुरपणें जे करूं नये ती केली. परंतु त्यांणीं सर्वोपरी बरदास्त करून या मरातबास आणिलें. त्यांच्या लोभावर आम्ही म्हणजे (वास्तविक) चाकर. कोणतेंहि राजकारण (त्यांन्या) इतल्याशिवाय करूं नये, हे कांहीं एक मनांत न वागतां रजवाडे दूर केले, उठविले, बसविलें. जें केलें त्यास त्याचा रुकार होत गेला. त्याचेंच वंशज आपण. तेव्हा असेंच चालेल हा भरंवसा. परंतु सांप्रतकाळीं आपली क्रूरदृष्टी पाहून डोळे उघडले. त्यास एकला येऊन हजर झालों. आपण धनी, आम्ही सेवक. बालंबाल गुन्हे आहेत. काय पारपत्य करणें, पायांत बिड्या घालून किल्यावर टाकावें, अथवा प्राण घ्यावा, हजर आहों." तेव्हां नाना बोलले, "आपण अशा गोष्टी बोलूं लागला यांत आमचे विषम काळाचें सूचक दिसतें." अशा भावीं बहुत ग्लानी करून बोलले. डोळ्यास पाणी आणलें. तेव्हां सुभेदाराचे मनासही कळवळा आला. मग बोलले कीं, "त्या गाढवीस

---

(१८) **रायांचे ठायीं** – वडील बाजीराव यांच्या ठिकाणीं. **हें** – हीं. **लेकुरपणें** – अज्ञानामुळें. **मरातब** – मान्यता, हुद्दा, पदवी. **त्यास** – म्हणून. **बालंबाल गुन्हे आहेत** – बाल म्हणजे केस, रोम. अगावरच्या केसागणिक अपराध माझ्या हातून घडले आहेत. **ग्लानी** – आर्जव, अजीजी. **गाढवी** – गढवी किंवा गडवी असे पाहिजे. गडवी हा गरवी या शब्दाचें अपभ्रष्ट रूप. गडवी म्हणजे Important-Respectable. नानासाहेबाची आई काशीबाई हीच तेवढीं पेशव्यांच्या घरांत वडील माणसापैकीं राहिली होती. तिला बोलावून आणून तिच्या समक्ष म्हाताऱ्या मल्हारराव होळकरानें भाऊसाहेब पेशव्याची यथेच्छ शिव्यागाळी करून पूजा बांधली. पेशव्यांच्या दिवाणागिरीचें व वसूलादिकाचा आयव्यय पहाण्याचें काम नानासाहेबानें भाऊसाहेबावर सोपविलें होतें. भाऊसाहेब हा कामांत अत्यंत चोख व हुशार होता. परंतु स्वभावानें जरा गर्विष्ठ व तापट होता. नानासाहेबासारखा धोरण पाहून गोड शब्दांनीं काम करून घेणारा [पुढील पानावर पहा]

बोलावून आणा." मग काशीबाईस बोलाविलें. बाई आलियावर तिला प्रश्न केला कीं, "नाना हा आमचा पोटचा खरा, दादा हा देवपुजापाशीं छिटून उत्पन्न केला; (पण) हा कोठीचा काळकूट कोणाचे पोटचा आहे सांग." तेव्हां भाऊसाहेब बोलले,— "नानासाहेब धनी, आपण सरदार, शास्त्रार्थांच्या गोष्टी उभयतांसही बोलण्यास हिंगफटकू लागत नाहीं. परंतु माझे गळ्यांत ससाराचें लोहडणें घातलें. तेव्हां

(१८) नव्हता. उत्तर हिंदुस्थानांतल्या स्वाऱ्यांत मल्हारराव होळकरादिकांनीं ठरल्याप्रमाणें योग्य तो सरकारवसूल पाठवून दिला नाहीं. हिशेबांत गफलत केली. ती भाऊसाहेबांनीं शोधून काढून होळकरास कडक पत्रें लिहिलीं त्यानें होळकराचा आग भडका झाला. त्याच्या हातून कुचराई झालीच होती. व ती त्याला पदरांत घेणें प्राप्तच होतें. पण बाकीचा इतका पैसा ओकावा लागणार यामुळें त्याचा संताप झाला; व तो त्यानें वडीलकीच्या नावाखालीं धनगराला शोभण्यासारख्या अचकट विचकट शिव्या देऊन शमवून घेतला. मल्हारराव हा बाळाजी विश्वनाथापासून पेशव्यांच्या चाकरीस होता त्याच्या इतका वृद्ध अनुभवी सरदार दुसरा नव्हता नानासाहेब व भाऊसाहेब तर त्यांस काका असे सम्बोधित असत. हे लक्षात घेता, व जुन्या काळीं घरांत बायकामाणसासमोरहि बीभत्स, अश्लील शब्द उच्चारण्यांत फारसा विधिनिषेध मानला जात नसे, हें लक्षात घेतले म्हणजे मल्हाररावाच्या शिवीगाळीनें चमत्कारिक वाटणार नाहीं. **नाना हा आमचा पोटचा खरा** – नाना हा आमच्या म्हणजे धनगराच्या पोटचा उपजलेला म्हणजेच अज्ञानी, वेडा, व्यवहारशून्य. धनगर म्हणजे अडाणी असेंच सर्व प्रसिध्द आहे. **दादा हा देवपुजापाशीं छिटून उत्पन्न केला** – देवपुजा म्हणजे देवपूजा करणारा भिक्षूक. छिटून म्हणजे सग करून. भावार्थ दादासाहेब हा भिक्षुकापासून उपजला. अर्थात् त्याचीही अकल भटाभिक्षुकाइतपतच. **हा** – हा भाऊसाहेब. **कोठीचा काळकूट** – कोठीवर, खजिन्यावर संरक्षक म्हणून बसलेला भुजग. **हिंगफटकू** – हिंग आणि फटकूर. फटकूर म्हणजे कापडाचा किंवा चिंधीचा तुकडा. या दोन्ही वस्तु क्षुद्र. त्यांस खर्चवेच लागत नाहीं. भाऊसाहेबांच्या म्हणण्याचा भावार्थ असा, "नानासाहेब मालक आणि आपण मोठे तोलदार सरदार. त्यांना थोड्याच सर्व बारीक सारीक गोष्टी तपासाव्या लागणार ? तेव्हां त्यांनीं लंब्या चवड्या गोष्टी बोलल्या तर त्यांना त्या शोभतातच. नुसत्या बोलण्याला कवडीचाहि खर्च लागत नाहीं. परतु माझ्या गळ्यांत पेशवाईच्या ससाराचें म्हणजे नफा नुकसानी पहाण्याचें फडणीशीचें काम घातलें आहे. तेव्हां मला बारीकसारीकहि खर्चवेच तपासून पहावा लागतो. पेशव्यांना किती कर्ज झालेलें आहे, उलट पक्षी सरदारांनीं आपल्या खंडण्या देण्याचें लुच्चेगिरीनें कसें टाळलें आहे ते तुम्हीच दोघे [पुढील पानावर पहा]

बाजारांतून डाळ, पीठ आणून प्रसंग संपादावयाच्या पोटीं देणेदाराची कोचवण किती आहे याची रफेदफे धणी अथवा आपण करून मला मोकळें करावें. म्हणजे मीही उभयतापेक्षां गोड बोलणीं बोलून उभयतांसही आवडवून घेईन. श्रीमतांचें दौलतीस कर्ज होऊन दौलत कर्जभरीत झाल्यावर मग कर्ज बाहेर निघणें कळतच आहे. यास्तव धणी व तुम्हीं वडिलांचे हातचीं माणसें एकत्र जाहला, हिशेबकितेबाचा सशय असल्यास कागदपत्र तयार आहेत, हिशेब पाहून मला मोकळें करावें." तेव्हां सुभेदार बोललें कीं, "तुझे आईवर तलाख आहे, खेरेंच सांग दौलतीस देणें किती ?" तेव्हां मग भाऊसाहेब हासून बोलले, "पाऊण कोट रुपये देणें आहे." "खेरेंच कीं काय ?" म्हणोन सुभेदारांनीं पुसिलें. तेव्हां भाऊ बोललें कीं, "बोललों यात दहावीस हजार अधिक उणें (इतकेच)" मग सुभेदार बोलले, "दौत लेखणी बंद आण." तत्क्षणी आणविलें. भाऊसाहेब यास म्हणाले कीं, "याद धर." तीस लक्ष आपलें नावें लिहिले. तीस लक्ष शिंदे याचें नावें लिहिलें. "बाकी काय राहिली ?" म्हणून प्रश्न केला. भाउसाहेब बोललें कीं, "पंधरा लक्ष राहिले" "याची वर्गणी विंचूरकर वगैरे लहान मोठे सरदार याचा मेळ करून देऊं किंवा तुम्ही करून घ्याल ?" त्याचें उत्तर भाऊंनीं केलें कीं, "आम्हीं करून घेऊं. परतु साठ कधीं पटतील ?" तत्क्षणीं त्रिंबाजी नाईक, विष्णू महादेव यास बोलावूं पाठवून घेऊन आले. पूर्व सकेत नसतां त्याचे रूबरू विष्णु महादेव यास सागितलें कीं, "साठ लक्ष रुपये भाऊंस आज द्यावें." त्याचे अगास डबडबा घाम आला. तथापि हो म्हणणें प्राप्त झालें. भाऊस सुभेदार याणीं पुशिले "रुपये आले ?" भाऊ म्हणाले "हे देतील." तेव्हा मग विष्णुपंत बावास सुभेदार बोलले "खातरी भाऊची कर." विष्णुपत बावा याणीं हिंमत धरून भाऊसाहेबास विनती केली, "आपण हो म्हणावे, सशय असल्यास उट पाठवावे." असें बोलल्यावर भाऊंनीं

---

(१८) वाटल्यास तपासून पहा, व मला बोला. सरकार कामाला लागणारा पैसा जर मलाच कोठींतून काढून द्यावा लागतो, तर येणेंकऱ्यांच्याकडे तगादा करून तो पैसा कोठींत आणून भरणें हेंहि माझे कामच आहे. मग होळकराकडे पैशाची मागणी केल्याबद्दल त्यांना राग का यावा ? **कोचवण** – जाच, तगादा, तसदी, टोंचणी. **रफेदफे** – निवाडा, निकाल, निराकरण. **कर्जभरीत** – कर्जानें वाकलेली, कर्जानें ग्रासलेली. **वडीलाचे हातचीं माणसे** – कदीम, जुनी, विश्वासू माणसें. **तुझे आईवर तलाख आहे** – तुला आईची शपथ आहे. **तलाख** – शपथ. **बद** – कागद. **आपले** – मल्हाररावाचे, स्वतःचे. **वर्गणी** – वांटणी. **विष्णु महादेव** – गद्रे सावकार. **उंट पाठवावे** – पैसा भरून आणण्यासाठीं.

रुकार दिला. मग सुभेदार भाऊंशीं बोलले कीं, "बाबा, दौलतीचें कर्ज फिटलें कीं ?" मग भाऊसाहेबांनीं उत्तर केलें, "आपलेसारखीं माणसें दौलतींत असून कर्ज कोठून राहील ? परंतु मजकडे वाईटपणा स्थापून अर्थ जाहला वडील आहां, क्षमा करावी." या रीतीनें सफाई होऊन बोलले "डेऱ्यास जाऊं किंवा आणखी काहीं तुझ्या मनात राहिलें ?" तेव्हां मातोश्री बोललीं कीं, "येथेंच भोजन करून जा." तेव्हा सुभेदारानीं उत्तर केलें कीं, "तूं भाकरी कर आणि तिघांस जेऊं घालशील तर जेऊं" मग बाईनीं स्वयंपाक करून त्रिवर्गास भोजनास हातें घातलें.

(१९) नतर सुभेदार डेऱ्यास आले. गगोबा तात्या व अन्याबा पळसीकर सफाईस आले होते त्यास ही वार्ता ठाऊक नाहीं. डेऱ्यास आल्यावर उभयतास वर्तमान सांगितलें. त्यानीं उत्तर केलें कीं, "आम्ही दोन महिने अगोदर येऊन काय गवऱ्या वळल्या ? परतु 'सोम्या मारी गोम्याला, प्रायश्चित राजधराला' साठ लक्ष रुपये आज मी विष्णुपतबावास कोठून देऊ ?" "तुम्ही जाणें तुमचें कर्म जाणें, जाहलें वर्तमान तुम्हास सागितलें," (येवढेच मल्हारराव बोलले) (त्यावर) भाऊसाहेबानीं सूर्योदय झाल्यावर कारकून उटें विष्णु महादेव यांचे घरीं पाठविलीं. बाबानीं तेचक्षणीं साठ लक्ष रुपये यांचा भरणा करून दिला. मग लष्करात आले. तात्यास बुद्धिवाद फार केला कीं, "पूर्वे सकेत नाहीं, श्रीमंताशीं गाठ. आमचा प्राणच घ्यावयाचा होता तर आपले डेऱ्यापासून

---

(१८) फिटलें कीं ? – फिटले की नाहीं ! **परंतु मजकडे वाईटपणा स्थापून अर्थ जाहला** – भाऊसाहेबानें असा टोमणा दिला कीं, आता कर्ज फिटलें. अर्थ जाहला म्हणजे पैका उत्पन्न झाला, पण त्यासाठीं मला इतका वाईटपणा पत्करावा लागला तेव्हां !

(१९) **सफाईस** – वसूलाच्या रुजवातीस, हिशेब समजावून देण्याकरता. होळकराचे गगोबातात्या व पळशीकर पुण्यास अगोदर दोन महिन्यापासून, भाऊसाहेबाकडे आले होते. **सोम्या मारी गोम्याला प्रायश्चित राजधराला** – वड्याचें तेल वांग्यावर अशा अर्थी ही म्हण आहे. भावार्थ असा. गगोबा तात्या म्हणाला, 'पेशव्यांनीं तुमची खरड काढली आणि तीस लक्ष रुपये तुम्ही मुकाट्यानें कबूल केलेत पण मी तुमचा दिवाण. उद्या विष्णुपत गद्रे सावकारास ते रुपये मी कोठून देऊ ?' त्यावर होळकरानें गगोबा तात्यास उत्तर दिलें 'ते तुमचे तुम्हीच आतां कसे तें पाहून घ्या तुम्हीच खोटाई करून माझ्या पदरीं बोल आणलात. आतां तुम्ही दिवाण आहात, तर त्या रकमेची भरपाई तुम्हालाच केली पाहिजे.'

मैंफसू लांब गेला नव्हता. सावकारी म्हणजे काचेचें बासन, जरा कैपेश जाहल्यास जन्मास मुकावयाचें काम." मग तात्या ( ह्यांनीं ) विष्णु महादेव यांचे कर्तृत्वाचें स्तुतिस्तोत्र करून साठ लक्ष रुपयाच्या वराता महालानिहाय करून दिल्ह्या. मग फौजेस बिदा करून शनवारचे हवेलींत दोन महिने मुक्काम करून राहिले.

( २० ) इकडे हिंदुस्थानीं दत्ताजी बाबा शिंदे व जनकोजी शिंदे दिल्लीकडे आले होते त्यांणीं नजीबखानाशीं बेलभंडार करून शुक्रतालाहून दिल्लीस आणिलें. दिल्लीस आल्यावर नजीबखानास धरून मारावें हा बिचार ( त्यांनीं ) केला. हें नजीबखानास समजलें. (म्हणून) त्याचे मध्यस्त होते त्याशीं बोलून शुक्रतालास माघारी गेला. मागोमाग शिंदेही कूच करून गाजुदीखान वजीर सुद्धा शुक्रतालास गेले. शुक्रतालास मोर्चेबंदी केली तेंव्हां नजीबखानानें गंगेस पूल बाधून, तिकडून रसद आणून, बेहेडे धरून मजबुदीनें राहिला. शिंदे याचा उपाय चालेना. तशात नजीबखानानें गिलन्यांकडे वकील पाठवून चार दस्ते ( म्ह. ) अठ्ठेचाळीस हजार फौज आणविली. ते सरदेस पोंचले. हें वर्तमान शिंदे यास कळताच शुक्रतालाचे मोर्चे उठवून गिलन्याचे फौजेचे सुमारें चालले. बुढिया शाहरणपूर यमुनेच्या कांठीं आहे. त्या अलीकडे पांच साहा कोशावर दत्ताजी व जनकोजी शिंदे राहून जिवाजी भोईटे सरनोबत पंधरा हजार फौजेनिशीं गिलच्याचे तोंडावर रवाना केले. हे इकडून जातां मार्गांत गिलन्याच्या फौजेशी गाठ पडली. उभयताची झटपट होऊन बारांशें ( स्वारानिशी खाशांचीं ) डोकीं कापून गिलन्यानीं नेलीं. बाकी फौज राहिली ती

(१९) **काचेचें बासन** – कांचेची उची वस्तु. बासन म्हणजे किल्ला असाहि दुसरा एक अर्थ आहे, 'बॅशन' या इंग्रजी शब्दावरून 'बासन' हा मराठी शब्द रूढ झाला. सावकाराची पत काचेच्या किल्ल्या सारखी नाजूक आहे. जरा तडा गेला कीं सपले म्हणून ती फार जपावी लागते असा भावार्थ. कबूल केल्याप्रमाणें ठराविक वेळीं रक्कम मोजू शकला नाहीं कीं सावकाराची पत सपली ! त्याचें दिवाळें निघालें ! **वराता** – चेक, हुंडी, वरात. **शनबारचे हवेलींत** – शनवार वाड्यांत नव्हे तर शनवार पेठेंत होळकरांचा जो वाडा होता त्यांत.

(२०) **बेहेडे** – मूळ शब्द बेहड. बेहड – नदीच्या जोरदार प्रवाहानें जमिनीला पडलेली खोल घळ. **सुमारे** – रोखानें. **सरनोबत** – सैन्यातील एक दर्जाचा अधिकारी, सेनापति सारखाच. **बाराशे स्वारानिशीं खाशांची डोकीं कापून गिलच्यानें नेलीं** – सान्यांनीं स्वीकारलेल्या 'बारांशें खाशांचीं डोकीं कापून' या पाठापेक्षां त्यांनीं पादटीपेंत दिलेला हाच पाठ योग्य होय. खासा म्हणजे सैन्यातील मुख्य सेनापति किंवा त्या दर्जाच्या आसपासचा मातबर अधिकारी. अर्थात १२००

पळून शिंदे यांजपाशीं आली. मार्गात यमुनेचे कालवे व दलदली यांत हजारों फौज बुडाली. बाकी राहिले ते, शिंदे होते त्या मुक्कामी आले. मग तेथून शिंदे निघोन दिल्लीस येऊन घाटोघाट चौक्या बसविल्या. गिलच्याची फौज बुढिया शहारणपुरापाशीं यमुना उतरून शुक्रताली पोंहचतांच नजीबखानानें कूच करून दिल्लीचे सुमारें येऊन यमुनेचे उत्तर तीरीं मुक्काम केला तेथून यमुनेचा पयाबा पाहून दोन हजार रोहिले यमुनेच्या मध्यें बेटावर पाठविले. वर्तमान शिंद्याकडे कळतांच शिंदे चालून त्या बेटांतील रोहिल्यांवर गेले. तेथें रोहिल्यांनीं ताशेरा दिल्हा. त्यांत गोळी जनकोजी बावाचे डावे हातास लागली. आणि दत्ताजीबावाचा तर ठिकाणच नाहीं. लढाईंत पडले किंवा कोठें गेले. अशी गोष्ट झालियावर शिंद्यांचे फौजेचा धीर सुटून फौज पळाली. बाजारबुणगे सर्व लुटले गेले. जनकोजी बावा राहिले फौजेनिशीं रेवाडीस तीस कोस गेले.

(२१) सुभेदार फौजसुद्धा जयपूर प्रांतीं होते. त्याजला येण्याविशीं शिंद्याची पत्रें आलीं. तेव्हा सुभेदार कूच करून रेवाडीस आले. अलीकडे तीन कोश पाटोली गांव आहे, तेथें सुभेदाराचा मुक्काम जहाला. तेच दिवशीं शिंदेहि रेवाडीस आले दुसरे दिवशीं शिंदे होळकर यांच्या भेटी होऊन बुणगे दरोबस्त कबिल्यासुद्धां माळव्यात रवाना करून सडे झाले. हें वर्तमान नजीबखानास समजताच गिलच्यासुद्धा कूच करून याचे सुमारें आला होळकराची गाठ पडूं न देता, यमुना उतरून शिकंदऱ्यावर ( शिंदे होळकर गेले. ) यांच्या पाठीमागें नजीबखानही यमुना उतरून आला. सुभेदारास समजताच त्याच्या तोंडावर फौजा रवाना करून आपण व जनकोजी बावा शिंदे आगऱ्याच्या सुमारें आले. तों मागें शिंदे व होळकर याच्या फौजेशीं व गिलच्याच्या फौजेशीं गांठ पडून होळकराकडील अन्याबा पळशीकर दिवाण व शेटीबा खराडे कामास आले. वरकड फौजेचा पाय सुटून कोणी मथुरेस, कोणी रामगडास गेले. सुभेदार आगऱ्यास आल्यावर मथुरेची व रामगडची पळालेली फौज येऊन सामील झाली. नजीबखानानें याचा पाटलाग न करता शुक्रतालास गिलच्यासुद्धा गेला. सुभेदारानीं मसलत केली,

(२०) खाशाचीं डोकीं कापून नेलीं हा पाठ स्वीकारला तर 'खासे' होते तरी किती ? सैनिकापेक्षां पुढाऱ्यांचीच गर्दी अधिक होती असें म्हणावें लागेल व तें तर उघडच असभाव्य. **पयाबा** – वास्तविक पयाव असेच मूळांत असले पाहिजे. 'व' व 'बा' मोडींत सारखे भासतात. पयाब–म्हणजे पाय उतार, पायानें तरून जाण्यासारखा नदीचा उतार. **ताशेरा** – बंदुकीच्या गोळ्यांचा मार, फैर.

(२१) **कबिला** – कुटुंब, स्त्रिया वगैरे. **पाय सुटून** – धर सुटून, अवसान सुटून.

एक बरसाद जयपुराच्या मुलखांत छावणी करून बादबरसाद करणें तें करूं. याप्रमाणें ठरवून आगऱ्याहून कूच करून जयपुरच्या मुलखांत येऊन छावणी केली.

( २२ ) हें वर्तमान श्रीमंत भाऊसाहेब देशीं मोगलांवर स्वारी करून गेले होते तेथें कळलें. मग त्यांनीं त्या मोहिमेचा सामदाम करून हिंदुस्तानांत यावयाचा इरादा केला. कागदपत्र सरदारांस पाठवून मागोमाग श्रीमंतही कूच करून दरकूच बमय फौज आगऱ्यानजीक आले. येथें उभयतां सरदारांच्या भेटी होऊन ठराव झाला कीं, तूर्त बरसाद आणि यमुनेस फार पाणी, उतरल्यावर समजून घेऊं. याप्रमाणें मनसब्याची संचणी करून दरोबस्त फौज दिल्लीस आली. दिल्लींत ठाणें कायम केलें. ते वेळेस कुजपुराहून बातमी आली कीं, गिलच्यांची दहा हजार फौज यमुनेस पाणी फार म्हणून मुक्काम करून आहे. हें वर्तमान श्रीमंतांस कळतांच कूच करून कुजपुरास जाऊन गिलच्यांचे फौजेवर पडले. ते गाफल, तथापि तलवार खूप चालली. दहा हजार फौज लुटून तेथें गल्ला मुबलग म्हणून एक मास मुक्काम केला. हें वृत्त गिलच्यास समजल्यावर कूच करून नजीबखान सुद्धा यमुना उतरून दिल्लीच्या व कुंजपुऱ्याच्या मध्यें येऊन पडले. भाउसाहेबांस कळतांच कुंजपुऱ्याहून कूच करून पानिपतावर आले. तेथें सव्वातीन महिने राहून लढाया नित्य गिलच्यांच्या फौजेशीं करीत गेले. दाण्याचाऱ्याची बहुत अडचण पडली. सबब गोविंदपंत बुंदेले अंतरवेदीस रसद आणावयास गेले. त्यांणीं रसद भरून यमुनेच्या काठीं उतरले. मुक्काम होऊन गंगातीरीं स्नान संध्या स्वयपाक होत आहेत हें वर्तमान गिलच्यास समजले. वीस हजार घोडे राउत दौड करून बुंदेले याच्या फौजेवर जाऊन पडले. फौज व रसद लुटून गोविंद पंताचें स्नान-सध्या करितांना डोकें कापून नेलें. उंच उंच फडक्याचीं वेष्टनें गुडाळून एक्या फकीराबरोबर ज्याफत म्हणोन श्रीमंताकडे पाठविलीं. श्रीमताला अंदेशा प्राप्त झाला कीं याचा आमचा लढाईचा इरादा असता ज्याफतीचा अर्थ काय? तथापि हुजऱ्यास आज्ञा होऊन सोडून पाहिलें. तों डोकें निघालें! ओळखणारांनीं ओळखलें. सागितलें कीं, गोविंदपंत बुंदेले यांचें डोकें आहे. तेव्हा श्रीमतांस कळलें कीं, रसद मारिली गेली. पुढें दाण्याचाऱ्याचें अवघड पडलें. तेव्हां मल्हा-

---

(२१) **एक बरसात** – एक पावसाळा. **बादबरसात** – बरसातीनतर पावसाळा संपल्यावर.

(२२) **मोहिमेचा सामदाम करून** – तह करून मोहीम सपवून. **बमयफौज** – फौजेसह. **मनसब्याची संचणी करून** – मसलतीची उभारणी करून. **गाफल** – गाफील, बेसावध. **ज्याफत** – मेजवानी. **अंदेशा** – सशय. येथें अर्थ आश्चर्य.

रजी होळकर सुभेदार यांणीं मनसुब्यास बुद्धिवाद आणिला कीं, आपण गनीम, त्यांत विदेश, येथें लढाईशीं तोंड न देतां दिवसेंदिवस चारादाणा केला तरी भाकर विसाकोसांवर भाजावी, तिथून खाणें पंचवीस कोसांवर व्हावें, अशा परिश्रमानें हरीफ जेर करावे. या भावानें बोलत असतां ( तें भाऊसाहेबांच्या ) ध्यानास न येऊन तीन महिने खाई खोदून मुक्काम केला. यानें परिणाम काय व्हावयाचा ? पाहून सुभेदाराचा उक्तभाव समर्पक पडला यामुळें पोटांत राग होता तो एकीकडे ठेवून भाऊसाहेबांनी उत्तर केलें कीं " जाल्या गोष्टीस शब्द लावून फळ नाहीं. पुढें काय करावे ? " मग सुभेदार बोलले कीं, आता कूच होतच नाहीं, रसिदेचा मेळ जाहला पाहिजे त्यास त्याच जिल्ह्यात जबरदस्त रसद पोहोंचवावयाजोगा जाट आहे. त्याची दीलजमाई झाली असतां दाणाचाऱ्यास कमी पडणारा नाहीं. आपण आज्ञा कराल तर त्याजला आपल्या पाशीं आणितों त्याची खातरी करावी म्हणजे रसदेची काळजी रहाणार नाहीं. तवातोबरा चालल्यावर दुसरें सुचेल. या अडचणींत काहींच बनून येत नाहीं " तेव्हा श्रीमंतानीं आज्ञा केली कीं " जाटास आणावें. त्याची खातरी करूं. "

( २३ ) तेव्हां सुभेदारांनीं जाटास कागद लिहिला कीं, तुम्हीं फौजसुद्धा भेटीस यावयाचें करून रसद माफक फौजेनिशीं रसदेची तार बांधोन लष्करांत

---

(२२) **मनसुब्यास बुद्धिवाद आणला** – ठरलेला मनसुबा बदलण्याचा सल्ला दिला. **गनीम** – मराठे. **हरीफ** – शत्रू. 'हा विदेश असल्यामुळें आपण गनिमी काव्यानें लढावे, शत्रू भोंवतीं तलावे द्यावे, बिलगावे पुन्हा लांब पळून जावे, आतां इथें आहेत तर दुपारीं तिथें, असें करून शत्रूस भडावून सोडावे. त्याच्या भोंवतालचा मुलूख जाळून पोळून बेचिराख करावा. असें करून त्यास जेर करावे' असें मल्हाररावाचें म्हणणें. **खाई** – खदक, चर. **याने परिणाम काय व्हावयाचा पाहून** – अशा रीतीनें खदक खणून राहण्यानें आपलीच उपासमार होत आहे, शत्रूचा पराभव दूरच राहिला, हे पाहून म्ह. अनुभवास येऊन 'सुभेदाराचा उक्तभाव समर्पक पडला' असें भाऊसाहेबास मनोमन पटले. **उक्तभाव** – प्रकट केलेले विचार. **समर्पक पडला** – प्रत्ययास आला. **रसिद** – रसद, धान्यपुरवठा. **मेळ** – सपादन. **तवा तोबरा** – शिपायाला अन्न आणि घोड्याला दाणा. मराठी स्वारा बरोबर तवा तोबरा ही नेहमीं असावयाचीच. भाकरीसाठीं तवा व घोड्याला हरबरा देण्यासाठीं तोबरा.

(२३) **रसद माफक फौजेनिशी** - रसदेच्या संरक्षणास लागेल तितकी फौज ठेवून किंवा देऊन **तार बांधोन** – अखंडीतपणें रसदेचा पुरवठा होत राहील अशी व्यवस्था करून.

जिन्नस मण दीडमणाची धारण राहे असें करावें. आणि एक वेळ सरदारांच्या भेटीस यावें. हें सुभेदाराचें पत्र येतांच रसदेची तार लावून लष्करांत दीडमणाची धारण सुरू केली. मागाहून जाट साठ हजार फौजेनिशीं जातीनें भेटावयास आला. सुभेदार याच्या विद्यमानें भेटी जहाल्या. वस्त्रें—जवाहीर आदि शिष्टाचार यथोक्त होऊन जाट महिनाभर लष्करांत राहिला पुढें भाऊसाहेबांचे मनात पाप आलें कीं, जाटास लुटून घ्यावें. तेव्हा हें वर्तमान सुभेदारास (कळतां) अग्रसर होऊन बोलले कीं, आपले आज्ञेवरून मी वचन बेलभंडार देऊन आणिला. त्यास आणिल्या-सारिखें त्याणें चाकरीही केली. दीडमणाची धारण केली. महिना भरून चुकला. कोण्याही जिनसाची कमती पडू दिली नाहीं. असें असता आपले मनांत हें आलें. उत्तम आहे. आम्हीं आणलें तसें त्यास लष्करापासून पांच कोशावर पोंचवून देऊन मग आपण लुटणें तर लुटावें. पाहिजे तें करावें. अगर आम्हांस आज्ञा करावी, हुकूम बजावूं." असे बोलणें निग्रहाचे पडल्यावर श्रीमत भाऊसाहेब उगेच राहिले. सुभेदार डेऱ्यास येऊन जाटास बोलावून सागितलें कीं, "तुम्हास आम्हीं आणिलें. साप्रत श्रीमताचें मनात तुम्हाविषयी पाप आलें आहे, यास्तव आम्हीं तुम्हांस लष्करापासून पाच कोश पोंचवून देतो. पुढें तुम्ही सभाळून जावें. (नाहीं तर) आम्हींच लुटावयास येऊ." अस स्पष्ट सागून दिलें. जाटाचें उत्तर पडलें कीं, "पाच कोश श्रम आपण आम्हांकरिता कशास करिता? आम्हांस सुचविलें हेंच स्नेहपणाची शर्थ झाली." इतकें बोलून डेऱ्यास येऊन नौबद दिली. तयार होऊन चालले. गेले. श्रीमंतांनी सांगून पाठविलें कीं, "जाट कोणाचे हुकुमानें गेला?" सुभेदाराचें उत्तर गेलें, "काल दरबारीं बोलणे झालेंच होतें, त्यावरून तो उठून गेला. आता आज्ञा झाल्यास मागें धावणे करितो." तेव्हा भाऊसाहेबांनीं सागून पाठविलें कीं, "हे खेळ अवघे तुमचेच आहेत. इतःपर बोलावू तेव्हा दरबारास येत जावें. बोलावण्याखेरीज येण्याचें कारण नाहीं." यांचें उत्तर गेलें कीं, "आज्ञा शिर-सावंद्य. आम्हांस मनसुब्याचें कारण नाहीं. चाकर आहों. चाकरी सांगाल ती करून घरीं स्वस्थ बसूं"

(२४) यावर मास पक्ष असेंच चाललें, तों पुन्हा धान्याची अडचण पडोन तीन रुपये शेर धान्य भाव माल. जिन्नस दमडीभर नाहीं. तेव्हां लाचारी पडली. मनसुब्यास सोहलत राहिली नाहीं. आतां अन्नावांचून मरावें तेपेक्षां धारातीर्थीं

---

**(२३) महिना भरून चुकला** – एक महिना संपूर्ण झाला. **शर्थ** – परिसीमा. **धावणें करतो** – धावून जाऊन पाठलाग करून लुटतो.

**(२४) मनसुब्यास सोहलत राहिली नाहीं** – कोणाकडे बोलणें करून मदत

अनुसर व्हावें हें नेकसल्ला. भावी भवितव्यानुसार मनसुबा मनांत ठसून शिंदे-होळकर आदिकरून शहाण्णव कुळीचा मराठा बरोबर होता ( त्यापैकीं ) हा बुद्धिवाद कोणासही न पुसता जय अपजय परमेश्वर देईल त्यास, परतु दाण्याचाऱ्याचे कोचणीनें हबक खाऊन उठून जातील, मग समेटणें कठीण, असा आपल्या मनांत विचारांचा आगम बांधून दुसरे दिवशीं श्रीमंत भाऊसाहेब यांणीं फौजेस तमाम ताकीद करून समरांगणास जागा उभेतीची पाहून लढाईस आरंभ केला. लढाई निकराची. भाऊसाहेबाचा हत्ती पुढें, तेथून गोळीच्या टप्यावर विश्वासरावाचा हत्ती. ईश्वर कृत्यानुसार विश्वासरावास अचानक गोळी लागली. भवते स्वार होते ते कालवले. हें वृत्त भाऊसाहेबास समजतांच भाऊसाहेबानीं हत्ती बसविला आणि धावत आले. विश्वासराव गोळीचे जखमेनें कार्य होऊन गतुकाम. तथापि हिंमत धरून भाऊसाहेबांशीं बोललें कीं, "येथें जे ईश्वरास कर्तव्य तें केलेंच. परतु आपले आल्यानें लढाई बिघडेल ही गोष्ट चागली केली नाही. आपण तों प्रसग सपादावा." इतकीं अक्षरें हिम्मत बाधून बोलले तथापि भाऊसाहेब यांचा स्वभाव सडेतोड. ( पूर्वीं ) देशीं मोहीमसीर होण्याचे समयीं दादासाहेब याणीं स्वारीच्या देण्याचा तगादा केला हें भाऊसाहेबास बरदास्त न होता जाब दिल्हा कीं, "स्वाऱ्या शिकाऱ्या करून देंणें घरास आणावें ही चाल कोठील ?" तेव्हां दादासाहेबानीं उत्तर केलें कीं, "आम्ही चाकर हरामखोर, श्रीमंतांचें पायाशीं प्रतारणा करून कुणगे वेगळे ठेऊन देणें दाखवितों ! इतक्यावर स्वारी आपणच करावी." "उत्तम आहे. आम्हींच करू, परतु आम्हीं कारकून आम्हांस धनी पाहिजे, विश्वासराव यास

(२४) मिळवावी तर तसा कोणी मनुष्य दिसेना. **सोहलत** — सवड. **मनसुबा**— सल्ला मसलत. **नेक सल्ला** — उत्तम मार्ग. **हबक** — धास्ती, दाय. **समेटणें** — आवरणें. **विचारांचा आगम बाधून** — विचार ठरवून. **उभेतीची** — उमेतीची असें असावें उमेठ—उचवट जागा. उमेतीची — उमाळ्याची. **कालवले** — शिस्त सुटून सरमिसळ झालें. **गन्तुकाम** —मरणोन्मुख, परलोकचे प्रस्थान ठेवलेला. **येथें जे ईश्वरास कर्तव्य तें केलेंच इ०** — ईश्वरानें नेमले होतें त्याप्रमाणें माझा येथें गोळी लागून काळ होणार त्यास इलाज नाहीं. परंतु तुम्ही आपली जागा सोडून मजकडे धावत आल्यामुळें तिकडला धरबंध सुटेल व सेनापति दिसेनासा झाल्यामुळें लोक पळूं लागतील व लढाई बिघडेल. तरी तुम्ही आपल्या जागीं जाऊन उभे राहा व प्रसंग सपादा. म्हणजे लढाई जिंका. **बरदास्त** — सहन, मान्य, ग्राह्य. **देणें घरास आणणे** — कर्ज करून घरीं येणें. **हरामखोर** — गुन्हेगार, राजद्रोही. **कुणगा** — धनाचा साठा.

बरोबर द्यावे. " ( असे भाऊसाहेब बोलले ) तेव्हां नानासाहेबांनीं उत्तर केलें कीं, " मुलानें पाहिलें काय ? त्यानें येऊन तरी काय करावयाचें आहे? तुमचे तुम्ही असल्यावर पोर कशास नेता ? " ( पण ) भाऊसाहेबांचा आग्रह पडला. तेव्हां नानासाहेबांस रुकार देणें प्राप्त झालें. हें वर्तमान गोपिकाबाईस समजतांच तिनें आग्रह धरिला कीं, " माझें पोर मी जाऊं देणार नाहीं " तेव्हां नाना, भाऊ उभयतांचाही इलाज खुटला. मग भाऊसाहेब जातीनें गोपिकाबाईकडे जाऊन पदर पसरून, साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली कीं, ' विदेशास लेंकरांस कशास न्यावें हें खरेंच परंतु बाल सिंहाचें ! कोल्ह्याकुत्र्याचें नाहीं. तथापि विश्वासरावाच्या बालाग्रास धक्का लागावयाचा नाहीं मीच जातों परंतु आमचे पदरीं इतकें पुण्य नाहीं. नाना पुरुष भाग्यशाली. त्याच्या भाग्याचा प्रसर आहे ह्यास्तव विनंती मान्य होऊन विश्वासरायास बराबर द्यावें " तेव्हां गोपिकाबाईस संकोच पडून रुकार दिल्हा. अशा आग्रहानें आणिलें आणि येथें ईश्वरानें काय केलें ? आता तोंड (कसें) दाखवावें ? इतकें मनात आणोन घोड्यावर स्वार होऊन घोडे घातले. या उभयतांचें वृत्त वकिलाच्या चिठ्या शिंदे होळकर यांजकडे जातांच हवा पाहून उभयतां सरदारानीं घोडे घातले. जनकोजी शिंदे गारद झाले. मल्हारजी होळकर (यांनीं) ऐशीं स्वारानीं दक्षिणचा रस्ता धरला.

( २५ ) जाटाचे मुलखांत आल्यावर एक जाट, जाठाचा भाईबेटा, सुभेदार त्याचे गढीवरून चालले. तों जाट येऊन सुभेदाराच्या घोड्याच्या जेरबदास हात घातला. " श्रमले आले आहां, गढींत चालून भोजन करून जावें. " त्याशीं शिष्टाचार बोलता गोविंदराव बुळे जवळ होते त्यास डोळा घालून त्यानें ज्या हातानें जेरबद धरिला होता तो हात तोडून टाकिला आणि घोडे उचलिलें. जागां जागा स्नेहानें अथवा पापबुद्धीनें बहुत आडवे आले. समय पाहून कोणाचाही विश्वास न धरितां जुवामर्दीनें ग्वालेरीस आले. मागें फौजेचा भरा जाहाल्यावर जसा ज्याला रस्ता सांपडला तसा तो निघोन गेला. ज्याचें आयुष्य सबळ तोच पार पडला.

---

**(२४) मुलानें पाहिले काय ? – मुलाला काय अनुभव आहे ? तो लहान असल्यामुळें त्याला स्वाऱ्या शिकारीचा अनुभव नाहीं. बाल – छावा, मूल. बालाग्र – केसाचें टोंक. मीच जातो – मीच एकटा गेलो असतो. पदरीं इतकें पुण्य नाहीं – दौलतीच्या मालकाचा अधिकार मला नाहीं. संकोच – भीड. हवा – धुन्दी, गोंधळ. रागरग**

**(२५) भाईबेटा – पुतण्या, भाऊबंद. जुवामर्दी – धाडस, शौर्य. भरा – मोड, दाणादाण.**

बाकी बहुतेक मारले गेले. जाटापाशीं जो आला त्यानें सुभेदाराच्या स्नेहाची शर्थ ठेवून, हत्तीवाल्यास हत्ती, पालखीवाल्यास पालखी, घोडेवाल्यास घोडे, जोडेवाल्यास जोडे, राहील तोंपर्यंत यथेच्छ भक्षावयास, जाईल ते दिवशीं खर्चीस, माणूस पाहून भारबरदारी ( अशी ) सरबरा करून ग्वालेरीस पावते करून ( दिले ). ये प्रमाणें हत्तीनिसापासून भग्यापर्यंत सरबरा केली. त्यात रावजी महादेव फडणीस पारनेरकर निसबत होळकर हे मथुरेस आले. बहुत खराबींत. त्याचे मामाचे चिरंजीव राजाराम सदाशिव पानिपतावर राहिले. मथुरेस आल्यावर जाट जातीनें जाऊन भेटून बहुत प्रार्थना केली कीं, "लागेल त्याची आज्ञा करावी." त्यानीं उत्तर केलें कीं, "आपण कृपा करून आज्ञा करितां तेथें आमचा बधु पानिपतावर राहिला यास्तव चार कोस अवरस चवरस रण पडले आहे तें भाडयाचे गाडे लाऊन गगेंत टाकावें. त्यास जो पैका लागेल तो आम्ही देऊं." त्याणीं कबूल करून चारशें गाडया भाडयाच्या लावून सपूर्ण रण गगेंत टाकले चाळीस हजार रुपये भाडें लागलें. ते सावकाराची चिठ्ठी जाटास देऊन ( मग रावजी महादेवाचा ) जाटानें सन्मान करून ग्वालेरीस पावते केले.

( २६ ) सुभेदार ग्वालेरीस येऊन पचवीस हजार फौज जमा केली. तमाम नर्मदा तीर पावेतों मामलेदार येऊन भेटले. रागड्यांनीं हवा पाहून जे गढीबंद होते ते होते, ज्यास गढी नाहीं ते गढी बाधून बदमामलीस आले. जयपुरकर माधोसिंग याने वीस हजार फौज रायासिंग घोडचढे याजबरोबर देऊन नर्मदा-

---

(२५) **स्नेहाची शर्थ ठेवून** – स्नेहाची जाणीव ठेवून होळकरानें सुरजमल जाठास भाऊसाहेब पेशव्याचा बेत अगोदर कळवून त्यास सावध करून जीवानिशीं पूर्वी बाहेर काढून दिले होते ते उपकार स्मरून. **खर्चीस** – खर्चास. **भारबरदारी** – सामानवाहतुकीसाठीं बैल वगैरे. **सरबरा करणें** – पुरवठा करणें. **हत्तीनिस** – हत्तीनिशीन, हत्तीवर बसण्याचा मान असलेला मातबर माणूस. **पानिपतावर – राहिलें** – पानपतावर मेले. **रण पडले आहे** – रणांगणावर मुडदे पडले आहेत. **जाटास देऊन** – जाटास दिली व मग.

(२६) **हवा पाहून** – रागरग पाहून. **बदमामलीस येणें** – उलटणें, उद्धटपणास प्रवर्तणें. पानपतास झालेल्या मराठ्यांच्या मोडामुळें रांगडे संस्थानिक मराठ्यांवर उलटले. जे गढीबद होते म्हणजे ज्यांस कोटाचा आश्रय होता असे रांगडे संस्थानिक तर मराठ्यांस जोरा दाखवू लागावे यांत आश्चर्य नाहीं. पण आतापर्यंत जे सामान्य क्षुद्र भुमे होते तेहि पुड झाले. त्यांनीं किल्ले कोट बांधले व ते मराठ्यांना पूर्वीप्रमाणें दबेनासे झाले व त्यांनीं मराठ्यांना खंडण्या देण्याची चाळवाचाळव सुरू केली.

पर्यंत आपला अमलफैला करावा, या इरादावर रवाना केलें. हें वर्तमान सुभेदारास समजतांच बमय फौज कूच करून हडोतीचे मैदानात हाडे सामल करून (सामना) केला. लढाई भटवाटवाड्यावर मातबर जहाली. सुभेदाराच्या हातास गोळी लागली. इतक्यांत सुभेदार घोड्यावरून पालखींत येतांच फौज दामदस्त पळाली. तेव्हां बुंदी कोटेवाले हाडे यांनीं विचार केला कीं आपण घोडेवाल्यात सामल होऊं नये हा उत्तम पक्ष झाला. त्यास घोडेवाले निघोन देशास जातील परंतु आपली भूम जयपूरवाला खोदून टाकील. त्यापेक्षा सोक्षमोक्ष आजच व्हावा. असा निश्चय करून जाजमे हातरून जयपूरवाल्याशी लढाई घेतली. जयपूरवाल्याचें पाऊल मागें पडताच मल्हारजी होळकर ( यानीं ) हात गळ्यात बाधोन घोडे घातले. तो मारीत सागोन दरवाज्यास भाले लाविले. तेथेंच मुक्काम केला. जरबेखालीं पचवीस लक्ष रुपये घेतले. बुंदी कोटेवाले यास भेटून खातर तसलीम करून इंदुरास गेले. इंदुरीं मुक्काम करून महालवाल्याकडे माहालचा पैसा तीन सालीं जमला होता तो पैसा जमा करून माळव्यात तहद हडोतीपर्यंत ज्या ज्या रागड्यानीं मामलेदाराशीं बदमामली केली त्यान्या गढयाचा कट्टा केला. रबाब पूर्ववत् जमून इंदुरास आले.

---

(२६) **घोड्यावरून पालखींत येताच** – जखमी झाल्यामुळें सुभेदारास पालखींत रहावें लागले. **दामदस्त** – झाडून सर्व. **भूम** – मुलूख, जमीन. **जाजमे आंथरून लढाई घेणे** – धरल्या जागेवरून किंवा बैठकीवरून बिलकूल न हलण्याचा निश्चय करून लढणें. असाच वाक्प्रयोग हरिवंश बखरींत आलेला आहे फक्त तेथें जाजमाऐवजीं सतरजी असा शब्द आहे "सावनूरकर नबाब याजकडील पठाण किल्ल्याचे रेवणीवर सतरज्या हांतरून वर बसून तिरदाजी करीत–येथेंच मरू, पण जागा कधीं सोडणार नाहीं, असा आपला निश्चय शत्रूस कळावा म्हणून." हरिवंश बखर पृष्ठ ९. **हात गळ्यांत बांधून** – हाताला गोळीची जखम झाली होती तरी तो जखमी हात तसाच गळ्याशीं बांधून मल्हाररावानें लढाईच्या गर्दीत प्रवेश केला. **सागोन** – हें दरवाजाचें विशेष नांव दिसतें. **तहद** – पर्यंत. **तहद हडोतीपर्यंत** – वास्तविक पहिला 'तहद' किंवा शेवटचा 'पर्यंत' या पैकीं कोणता तरी एक शब्द अनावश्यक आहे. परंतु जुन्या भाषेंत एका अर्थी असे दोन्ही शब्द घालण्याची वहिवाट असे. उदा० 'विना' व 'वांचून' हे शब्द समानार्थक असता त्यांचा एकाच वाक्यांत उपयोग करीत. जसे "विना त्याचें परिपत्य केल्यावांचून मला समाधान नाहीं." दुसरें उदा० "अखबार पुरन्दर अज इस्तकबिल छ दहा मोहरम लगायत." वास्तविक 'अज' व 'इस्तकबिल' हे दोन्ही समानार्थक शब्द आहेत.

फौजेची दिलजमाई करून, तोंडानें मागितली नालबंदी देऊन चौमहिन्यांनीं बाज बरसात इंदुरीं येऊन हजर व्हावें ह्या बेतानें फौज रवाना करून माळवें प्रांतीचे बंदोबस्तास तुकोजी होळकर याजपाशीं पांच हजार फौज ठेऊन आपण देव-दर्शनास देशीं गेले.

(२७) तुकोजी होळकर फौज सुद्धां मेवाडांत गेले. आलीकडे मंदोसरांत वस्ती फार करून मेवात्याची. मेवात्याशीं व कोतवालाशीं कलह होऊन मेवाती यांनीं लढाई करून कोतवाल याचें डोकें गादीवर कापलें. हें वर्तमान सुभेदारास थालनेर मुक्कामीं समजताच हजार स्वारानिशीं धाऊन तिसरे दिशीं मंदोसरास आले. शहरांत शिरून मेवात्याचा कत्ल केला. मेवाती पाहिला त्या ठिकाणीं डोकें कापिलें. चौतऱ्यावर ज्या मेवात्यानें डोकें कापिलें होतें त्याचें डोकें चौत्र्यावरच कापिलें. मेवात्यास समजलें सुभेदार आला, आपला प्राण वांचणें कठीण. तेव्हां मेवात्यांत मुख्य होते ते कमाविसदार याचे विद्यमाने सुभेदारास शरण येऊन पन्नास हजार रुपये नजर दिल्हे. त्याजवर पाच चार मेवाती मुख्य होते त्याजला वस्त्रें देऊन, पन्नास हजार रुपये नजरेचे कमावीसदार याचे जमेस करून, आपण पुन्हा देशीं आले. श्रीमार्तंडाचें दर्शन घेऊन पुण्यास आले. पाणिपताचे लढाईचें वर्तमान पुण्यास समजून नानासाहेब हाय भाऊ ! हाय भाऊ ! ( करीत ) शिरोज भेलशापर्यंत गेले.

---

(२६) **तोंडानें मागितली इ०** – शिलेदारांनीं नालबंदीसाठीं वाटेल तेवढी रक्कम मागितली तरी ती होळकराने तात्काळ दिली. **नालबंदी** – नोकरींतील शिलेदारास त्याच्या ठरलेल्या पगारापैकीं कांहीं भाग आगाऊ तयारीसाठीं म्हणून देण्याची पद्धत असे, तिला नालबंदी म्हणत. या पैशातून शिलेदारानें आपल्या घोड्यांना नालबंदी करून तीं सज्ज ठेवावीं अशी अपेक्षा असे.

(२७) **गादीवर** – कचेरींत, भर कचेरींत. **चौतरा** – कोतवालाची कचेरी. **याचे जमेस करून** – यांच्या हवाली करून. **हाय भाऊ हाय भाऊ करीत** – नानासाहेब पेशव्याला भाऊसाहेबाविषयीं किती अपरंपार शोक झाला होता हे पाहणें असल्यास पुरन्दरे दप्तर भाग १ मधील अखेरचीं पत्रें पहावींत. "नानासाहेबांची तबीयत आजारीपणानें आधींच ढासळली होती, त्यांत हा जबर धक्का बसल्यामुळें तर तो खगत चालला. 'घोड्यावर अर्ध कोशहि बसवत नाहीं. ' इतक्या कनिष्ठ दर्जाला तबियत जाऊन पोंहोंचली. सर्व वेग विचारें करून त्यानें आवरलें पण भाऊसाहेबाचें दुःख कशानेंच परिहार होण्याजोगें नव्हतें. 'भाऊवांचून दुनिया दौलत व्यर्थ आहे, त्याचें हातचें पत्र पाहीन तेव्हा माझ्या बायकोस मला जीव येईल. आतां तों वेडेपणीं आहों. लेक अल्पायुषी होता. सूर्यमंडळ भेदून गेला. तें दुःख परमार्थ–शास्त्रपुराणें करून टाकिलें. परंतु चिरंजीव भाऊवांचून दुनिया व्यर्थ आहे. !!'

शिरोजेस नानासाहेबांचा काळ झाला. माधवराव साहेब पुण्यास होते त्यांची भेट घेऊन साहा महिने राहिले.

(२८) तों इकडे जाटाशीं व नजीबखानाशीं लढाई उत्पन्न होऊन नजीबखानानें सुरजमल्ल जाटाचें डोकें कापून ( टाकलें ) जाटाचे चिरंजीव नवलसिंग व जवाहीरसिंग यांची उमेद तीर्थरूपाचा सूड घ्यावा एतंनिमित्य सुभेदाराकडे वकील आला व नजीबखानाचाही भाईचारा त्याचा ( हि ) वकील आला. तेव्हां फौजबंदी माधवराव साहेबाचे आज्ञेकरून ( वरून ) पेंढारी फौज घेऊन जाटाचे उपकार पाणिपताचे स्वारीचे प्रसगीं याजमुळें जाटाकडे आले. जाटाची फौज घेऊन नजीबखानाशीं साडेतीन महिने लढाई जाहाली जाटाची फौज फितुरी. तन देईना. तेव्हां जाट कमजोर पडून जाटाचे मनाजोगा घाट न उतरता सुभेदारानीं जाटाचा व नजीबखानाचा तह ठरावून देऊन आपण अनुपशहरावर गेले.

(२९) तेथें सुजाउद्दवला होता, त्याजला फिरंग्यानीं लुटून घेतलें. यास्तव सुभेदारांशीं भेटोन लाख रुपये कुचाचे, पन्नास हजार मुक्कामाचे असें कबूल करून सुभेदारास घेऊन फिरंग्यावर गेला रुपये मुबलक फौजेस द्यावे हें सुभेदाराचे बुद्धीस येईना. तशांत कारभारांत विसाजी लाभाते याचें संमत फौजेस रुपये द्यावे हें पडेचना. लढाईचा मोसम लढाईस अग्रसर गंगोबा तात्या ( त्यास ) फौज घेऊन मुकाबल्यास फिरंग्याचें जाणें प्राप्त फौज बेदील स्वाधीन कांहीं नाहीं. ह्यामुळें गंगोबा तात्याही बेदील. लढाईचें तोड, चोहोंकडून दहा कोशाचें अंतरानें फेरानें फौज पळते, फिरंगीं मागें तेव्हा बेजार जाहले मग शखभट उपाध्ये होते त्यांजपाशीं तात्यानीं त्रासरूप होऊन गाऱ्हाणें सागितलें कीं, " फौज घेऊन पुढें मरणें

---

(२७) 'भाऊवांचून सकळ व्यर्थ' हें नानासाहेबाचे दु:खोद्गार कसल्याहि पाषाणहृदयास पाझर फोडतील. पुरदरे–दप्तरभाग १ प्रस्तावना पृष्ठ ६०. **शिरोजेस नानासाहेबांचा काळ झाला** – चूक. पुण्यास पर्वती येथें काळ झाला.

(२८) **तन देणे** – छाती देणें, हिय्या करणें. तन – छाती.

(२९) **लाख रुपये कुचाचे, पन्नास हजार मुक्कामाचे** – मुक्काम पडेल त्या दिवसासाठीं खर्चास पन्नास हजार व फौज कूच करून जाईल त्या दिवसाचे पन्नास हजार. **मोसम** – हगाम, प्रसग. **बेदिल** – पगार न मिळाल्यामुळें बिथरलेली. **दहा कोशांचे अंतरानें इ०** – फिरंग्यांनीं चोहोकडून मल्हाररावाच्या फौजेचा पाठलाग चालविला. होळकरांची फौज दहा वीस कोसांचें अन्तर आपणांत व इंग्रजांत ठेवून सारखी पळत होती. इंग्रज कांहीं पाठलाग सोडेनात, त्यामुळें होळकरी फौजहि धावतांना बेजार झाली. **शंखभट** – सखभट तर नसेल?

मला, लोकांस जखम अथवा पैसा देऊ म्हटल्यास स्वाधीन नाहीं, यास काय करावें ? तुम्ही यजमानास उपदेश करून दोन रोजमुरे देववावे. फिरंग्याचें पारिपत्य करण्याचा जिमा माझा." तेव्हां शंखभट यानीं कबूल करून सुभेदारास फजीत केलें कीं, "रुपये आपले बापाचें कीं काय ? ज्यांजवर रुपया येतो त्यांजला जखम लागली असतां हळद फटकू मिळणें कठीण तेव्हां फौजेची हामराई राहते कशी ? राखणारानें काय करावें ?" तेव्हां उद्यां लढाई करावी, दोन रोजमुरे अस्तमानीं द्यावे असें गंगोबा तात्यास समक्ष आणोन त्याची खातरी करून सागितलें. दुसरें दिवशीं तात्यांचे हमराईनें फौजही हमरा होऊन घोडे घातले. सात पलटणे कापून काढिलीं. बदुकीच्या मोळ्या बाधून चवदाशें गोऱ्याचे डोक्यावर देऊन आणिल्या. अस्तमानीं मुक्कामास आल्यावर रोजमुऱ्याचा ऐवज मागावयास गेले. सुभेदारांनीं रोष केला कीं, "रोजमुरा कशाचा द्यावा ? चार पलटणें अवशिष्ट राहिली आहेत त्याचें पारिपत्य होईल तेव्हा रोजमुरा मिळेल !" या बोलण्यानें तात्या व फौज फारच उदास जहाली उदासी व दिवसाचा श्रम ह्या गिरफदारीनें कोणी चौपत कोणी उदास. मागील चार घटिका रात्र राहता चार पलटणे लढाई झाली तेथून चौकोशांवर होतीं, त्याणीं उठावणी करून चार घटिका मागील रात्री येऊन पडले. फौज आपली तरबितर होऊन सुभेदार व बाळाबाई अल्हडवाल्यांचें कुटुब बराबर होतें (त्या) कुटुबासुद्धां काल्पीनजीक यमुनेचे घाटावर आले. तेथें पाणी अथाक, मागें फिरगी, तेव्हां श्रीमार्तंडाचें स्मरण करून श्रीयमुनेची पूजा करून हत्ती घातला. तों कंबरेइतकें पाणी. तमाम फौज उतरोन आली त्या ठिकाणी यमुनेस पायउतार कधींच जाहला नव्हता. येथें पायाब होऊन यमुनेनें मार्ग दिला ! तो मागाहून फिरंगी आला. त्याणेही गंगेत प्रवेश केला. तो पाणी अक्षोभ ! लाचार होऊन माघारा गेला. बहुत आश्चर्य झालें कीं, मल्हारजी होळकर मनुष्य नव्हे, काहीं ईश्वराचा अंश खरा. असे मानून टोपी काढून सलाम करून माघारा गेला. चाले चाले झांशीस आले.

( ३० ) तों इकडे दातिया, ओडसे, सेवडे व गोहदवाला जाट यानीं एकदिली

---

(२९) **ज्याजवर रुपया येतो** – ज्या सैनिकाच्या बळावर आपण विजय मिळवतो व खडण्या घेतो. **हळद फटकूं** – जखमांना लावण्यासाठीं हळद व जखम बांधण्यासाठीं चिंधीचें फटकूर. **हमराई** – जमाव, उपस्थिति. **हमराईनें** – येथें अर्थ हमीमुळें. **हमरा होउन** – विश्वासी होऊन. **गिरफदारी** – चिंता, काळजी, सशय. **तरबितर** – तारबितार, डावाडोल, उध्वस्त, विकीर्ण. **अथाक** – अथांग. **पायाब** – पायानें प्रवाह तरून जाण्यासारखा उतार. **अक्षोभ** – अथांग, अपरंपार. **चाले चाले** – कूच मुक्काम करीत.

करून हिमत बाहादर अनुपगीर गोसावी पातशाई चाकर याला आणून खर्च कबूल करून झांशी व ग्वालेर घ्यावी हा इरादा बांधोन झांशी घेतली. अशा संधीस सुभेदार येऊन दाखल झाले. तों रांगडे याणीं शेवडे, दतीया वगैरे येथील जमियत झाशींत भरून दिली. कारण सुभेदार झांशीस मोर्चे लावितील. जागा त्यांची. याजकरितां झांशीचे जमेतीनें बळकटी करून हिमतबहादर आंत ठेविला. हें पाहून सुभेदारांनींही कवाईत केली. झांशी सोडून शेवड्याकडे चाल केली. तेव्हां बुंदेले याणीं रातोरात झाशीची जमेत काढोन शेवडयाकडे आले. हें वर्तमान समजताच सुभेदारानीं रातोरात येऊन झाशीं घेरिली. मोर्चे लाविले. तोफा सरंजाम बराबर नव्हता. सडी स्वारी. तेव्हां रामपुऱ्याहून झाळादळ, सलाम, भवानी, मार्तंड चारीं तोफा आणून मोर्चे सुरुवात केले. तीन महिन्यात झाशी घेतली. श्रीमताचा झेंडा कायम करून हिंमतबहादर गोसावी याणें विचार केला कीं, सुभेदार आले येथें आपलें बुद्धिकौशल्य अथवा जुवामर्दी चालून यश येतें असें नाहीं. आपले जमेतीनिशीं निघोन गेला. सुभेदार झाशीचें ठाणें मुस्तकीम करून दतियासी लागले. तिसरे दिवशीं चार तोफा दराबीवर धरून मागें शिलेदार सरदार हुजरात वगैरे पायदळ देऊन हल्ला करून दतीया घेतला. राजा धरिला. आपला अमलाफैला करून मग राजाची दिलजमाई करून आपला नातु म्हणून त्याची स्थापना केली. गोडीगुलाबीनें त्याचें राज्य परत करून पंधरा लाख रुपये खंडणी घेतली. शेवडे ओडशे दतियाचे पेट्यातील, जरबेनें हात बाधोन हजर जाहले. त्यानें पाच पाच लाख खंडणी दिली. सुभेदार भाग्यशाली, प्रतापवान, जातीनें अपेश कोठें आलेंच नाहीं. परंतु समाप्तीचा वेळ आल्यासारखी बुद्धि उत्पन्न होऊन विसोबा लाबहाते याचे नादीं लागून फौजेस खर्चास न दिल्यामुळे फिरग्याचें आलें यश गमाऊन साठ कोश झाशीस आले! अव्वलीपासून जातीनें मनसुब्यास धक्का कोठेंही बसला नव्हता. मृत्युचिन्हाचें सूचक ( म्हणून ) फिरग्याची बदनक्षा घडून आली. तथापि बुंदेलखंडात आल्यावर श्रीमताचा रवाबा त्यानीं जथा चागला जमविला.

---

(३०) जमियत – सैन्य. कवाईत – युक्ति, डाव. मुस्तकीम – कायम, जबरदस्त. दराबीवर धरून – दराबी म्हणजे तोफेच्या खालीं जो स्टँड किंवा फडपैया असतो तो. दराबीवर धरून – नेम धरून ! पेट्यातील – ताब्यांतील. अव्वलीपासून – प्रथमपासून, सुरवातीपासून जातीने – स्वतः रचलेल्या व्यूहास, मसलतीस. फिरंग्यांची बदनक्षा घडून आली – फिरग्याच्याबाबत मल्हाररावास पराभवाची अपकीर्ति स्वीकारावी लागली म्हणजे इग्रजाकडून त्याचा पराभव झाला. हा डाग त्याला लागला. हें दुष्ट चिन्हच झालें. जणू कांहीं दैवाला या योगें मल्हारबाबाचा पुढील मृत्यूच सूचित करावयाचा होता.

(३१) तों इकडे देशी जनकोजी शिंदे पानिपतचे गर्दींत गारद जाहले, दत्तोजी शिंदे नजीबखाचें गर्दींत कामास आले. जयापा मारवाडांत राहिले राणोजी शिंदे याचे तिघे खासे पुत्र श्रीमताचे नौकरींत तवतुक जाहले. तेव्हा महादजी शिंदे विदूर पैकीं, शाहाणा दौलत आटोपून सरकार चाकरी करावयोजागा (असें) घ्यानास आणून माधवराव साहेब व दादासाहेब यानीं वस्त्रें देऊन सुभेदार बुंदेलखंडात एकटे, सबब दादासाहेब फौजबंदी करून माळव्यातून हडोती जयपूर या जिल्ह्यातून दाणाचारा करीत सुभेदारास येऊन भेटले. त्या संधीस गोहदवाल्यानें येऊन लबाडी करून दादासाहेब याची कही मारून नेली. हा रोष दादासाहेबाचे मनात येऊन गोहोद खोदून मोकळी करावी हा आग्रह सुभेदारानीं पाहून मनसुब्याचे साधक बाधक काहीं एक न सुचविता राजहट्टास अनुसर होऊन गोहोदेस मोर्चे लाविले. आठ महिने लढाई झाली त्यात महादजी शिंदे याचें (व) गोहदवाल्याचें सूत्र मिळोन, दाणा दारू याची कमती पडली होती ती शिंदे याच्या मोर्चांतून भरती जाहली. हें पत्तेवार श्रीमत दादासाहेबास समजताच शिंद्यावर इतराजी होऊन मेखसू घालून मारून टाकावा असे वर्ण दादासाहेबाचे तोंडातून निघता सुभेदारास समजल्यावर एकातीं दादासाहेबाची गाठ घालून या रोषाची सफाई करण्याविशीं यावत शक्य प्रयत्न केला. परतु त्याचे मनातील किलाफ दूर न होता, "सुभेदार आपण या कारभारात पडूं नये. अखेर गुलामाची जात आपले जातीवर गेली." (असें भाषण केलें) सुभेदारानीं उत्तर केलें कीं, "शिंदे उभे केले त्या दिवसापासून आज पावेतों त्याचे हातून पंचवीस कोटी रुपये खर्च होऊन त्यात चार कामें सुधारली असतील, दहा कामें बिघडलीं असतील. तीन पुरुष सरकार कामास आले. तेव्हा दौलतींतील माणूस गणनीय मरातब्यास आले ते नादान गोष्टीवर माणसाचा आब घ्यावा ही गोष्ट कोठील? माणूस करण्यास लाखों रुपये त्याचे हातून बिघडावे लागतात तेव्हा माणुसकी येती. पोरपण करू नको. दौलतीचीं कामें आहेत." या भावीं बहुत परिश्रम केला. परंतु उपतिष्ठला नाहीं. या घालमेलींत मालराव होळकर इदुरींहून सुभेदाराचे भेटीकरितां आले होते. महादजी

(३१) **तवतुक** – या शब्दाचा अर्थ सिद्ध किंवा रुजु असा आहे. पण येथें अर्थ कामास आले, मेले असा आहे. **विदुर** – दासीपुत्र. **दाणाचारा करीत** – धान्य वगैरे लुटीत. **कही** – सैन्याला दाणावैरण वगैरे मिळवून आणणारी लष्कराबरोबरची टोळी. **राजहट्ट** – स्त्रीहट्ट, बालहट्ट व राजहट्ट हे दुर्निवार असतात असें सुभाषित आहेच. **वर्ण** – शब्द, अक्षरें. **किलाफ** – संशय, अढी, राग. **गणनीय** – महत्वाचा. **मरातब** – पदवी. **नादान गोष्टीवर** – क्षुल्लक सबबीवर. **उपतिष्ठला नाहीं** – फळास आला नाहीं.

शिंद्यांचे सफाईविशीं कांहीं यत्न न चालल्यामुळें लाचार होऊन एके दिवशीं मागील दोन घटका रात्र राहता आपण व मालराव बाबा व महादाजी शिंदे त्रिवर्ग टाकग घोड्यावर बसून, एक एक माणूस असे, श्रीमंत दादासाहेब याचे डेऱ्यास आले. तों श्रीमंत तालीमखाना खेळून शौचास जावें त्या अवसरात पट पट घोड्यावरून उतरून सुभेदारांनीं आपले हात व उभयताचे हात रुमालानें बांधून जाऊन पायांवर पडले. तेव्हा कोणीही उठेनात. मग दादासाहेबानी सुभेदारास आपले हातें जबर-दस्तीनें उठवून बहुत ग्लानी लेंकुरपणाचे अन्वयें केली कीं, " आम्हा त्रिवर्गांस आपण रायाचे ठिकाणीं. त्यात आपण मजला लेंकुरासारखें मोजून या मरातब्यास आणिलें. तेव्हा हें कृत्य करणें आमचे अकल्याणाचें सूचक आहे. " मग सुभे-दारांनीं उत्तर केलें, " आम्ही सुरतसाभाळ्यापासून तुमचे घरीं लहानाचे मोठे जाहालों. माणसें आम्हास तुम्हीं केलें बाळाजीपत व बाजीराव व नाना तीन पुरुष गेले. आता आम्हास वाचणे हे असकत. चाकर तेव्हा चाकरीच्या कंबसीचे इलाज-मास चिंता नाहीं. धनी आहा बरदास्त कराल. परतु हरामखोरीचे इलाजमानें आमचे शिळास बट्टा आहे याचा विस्तार न करिता माझा जीव आहे तावत् या उभयता पोरास अबरू कायम ठेवून याचे हातून चाकरी घ्यावी आमचे परिश्रम करण्याची पराकाष्ठा जाहाली. आतां बसले ठिकाणीं आम्हास अन्नवस्त्र देणें तुम्हास प्राप्त आहे. आमचे डोळे झाकल्यावर या उभयताची तुमची धुणीपाणी असल्यास आमचे नाव राखतील, नाही तरि जे त्याचे प्रालब्धीं असेल ते होईल. " असें बोलून डोळ्यास पाणी आणिलें. मग दादासाहेबानीं कांहीं एक उत्तर न करिता त्रिवर्गांस तीन

---

(३१) **टाकण घोडा** – घोड्याची एक जात. याची इमारत लहान असते **लेंकुर-पणाचे अन्वये** – स्वतःकडे पोरपणा स्वीकारून. **हे कृत्य करणे** – रुमालानें हात बांधून पायावर डोकें ठेवणें **सुरतसाभाळ्यापासून** – सुरत–शरीर आम्हाला शरीर सांभाळता यावयास लागल्यापासून भावार्थ लहानपणापासून **असकत** – अशक्य. **इलाजम** – आरोप, दोष, ठपका. **कंबेसी** – कपेशी, कमी करणे, चुकारपणा करणे मल्हारराव म्हणतो, "आम्ही तुमचे चाकरच आहोंत, तेव्हा चाकरी बजावताना आमच्या हातून कदाचित कुचराई झाल्याचा आरोप आमच्यावर तुम्हास करता येईल. तसा केलात तरी चिंता नाहीं कारण तुम्ही धनी आहां. परतु हराम-खोरीचा, राज–द्रोहाचा, विश्वासघाताचा आरोप तुम्ही करतां तो मात्र आम्ही मान्य करणार नाहीं. कारण तो आमच्या शीलास कलक होईल असें आम्हीं समजतो." **याचा विस्तार न करतां** – या प्रकरणीं जास्त चिकित्सा न करतां. **उभयता-पोरांस** – मालजी होळकर व महादजी शिंदे. **धुणीपाणी** – ऋणानुबध.

पोशाख, कड्डीं, चौकडे, सिरपेंच व मोत्यांचे तुरे, तिघांस तीन हत्ती देऊन वाजत गाजत बिदा केला. नतर गोहदवाल्याचे जाबसालांत सुभेदार दरम्यान पडून तीस लक्ष रुपये खंडणी ठरावून गोहदवाल्या जाटास पायांवर आणून घातलें.

( ३२ ) तेथून कूच करून अलमपुरावर आलें. अलमपूरचे मुक्कामीं सुभेदाराचे कानास ठणका लागला. तत्रापि राजकारण हेंच कीं फिरंग्याचें पारपत्य करावें. दुसरें कुभेरीस खंडेराव होळकर कामास आले त्याचा मुबदला जाहला नाहीं तो करावा या दोन गोष्टी अंतःकरणी डांचत होत्या. त्या मनचे मनात राहून ईश्वर नेमितानुसार शके १६८७ भाद्रपद वद्य ११ प्रहर दिवस चढतां पंचत्व पावले दादासाहेब व महादजी शिंदे व मालराव बाबा जवळ होते आसन्न काळीं सुभेदारांनीं मालराव बाबांचें हात दादासाहेब व महादजी शिंदे याचे हातात देऊन शेवटीं तुकोजी होळकर यांचेही हातांत मालराव बाबा याचे हात दिले. ते समयीं तुकोजी होळकर यांनी उभे राहून विनती केली कीं, "मी चाकर मनुष्य, माझें हात बाबासाहेबांचे हातांत देऊन सर्वोपरी निर्वाहाची सोय करावी, तें न होता हें काय?" तेव्हा सुभेदार बोलले कीं, "माझें नाव व श्रीमंताची चाकरी तूंच करशील" असें बोलून समाप्ती झाली. नंतर उत्तरकार्य सुभेदाराचें त्याच ठिकाणीं जाहालें. दहावें दिवशीं पिंडास कावळा शिवेना तेव्हा दादासाहेबानीं मालराव बाबाकडून पाणी सोडविलें कीं, जाटाचे पारपत्य मी करीन पिंडास काकस्पर्श न होय. मग दादासाहेबानीं जातीनें उदक सोडले, तथापि काकस्पर्श जाहला नाहीं. मग महादजी शिंदे यांजकडून सोडविलें तथापि स्पर्श न होय. शेवटीं आणखी तुकोजी यांजकडून सोडविलें उदक सोडतांच स्पर्श जाहला. सर्वांस आश्चर्य जाहलें. नंतर त्रयोदशात कर्म होऊन त्या ठिकाणी छत्री बांधावयाचा मनसबा सिद्ध करून दतियेवाले वोडसे सेवडेवाले बरोबर होतेच, त्याजपासून तीस हजार रुपयाचें गाव घेऊन कारकून ठेवून, छत्री बाधावयास प्रारंभ केला. दादासाहेब यास बाजीराव, नाना, भाऊ गेले त्या समयीं इतकें दुःख वाटलें नाहीं ( इतकें ) सुभेदार मृत्यु पावल्यानें बहुतच श्रम वाटले आता वडील म्हणून विश्रांतीस जागा राहिली नाहीं !

---

(३१) **बिदा करणे** – निरोप देणे. **पायावर आणून घातले** – शरण आणले.

( ३२ ) **मुबदला** – सूड. **मुबदला जाहला नाहीं** – सूड घेतां आला नाहीं. **नेमित** – नेम, सकेत **पंचत्व पावले** – मरण पावले. **विश्रांतीस** – आश्रय घेण्यास, कुशींत शिरण्यास.

# अहिल्याबाई व तुकोजीराव होळकर

(३३) नतर गंगाधर तात्या यानीं दादासाहेबापाशीं आज्ञा मागितली कीं, "फौजेस पाच वर्षे जाहलीं. हिशेब घेऊन घर पहावें हा इरादा. त्यांत सुभेदार कैलासवासी जाहले. याजमुळें कोणकोणास हिशेबाचा भरंवसा येत नाहीं. यास्तव एक वेळ इंदुरास जाऊन फौजाची समजावीस करून आज्ञा जाहलियावर हजर होऊं." ऐशा भावीं आज्ञा मागोन इदुरास आले लोकाची समजाविसाची तोडजोड लाविली. हिशेब पैका पदरीं घालून पुढील नालबंदी देऊन बिदा केलें. हुकूम येईल तत्क्षणीं यावें अशी ताकीदहि केली. इदूर मुक्कामीं पागा सरजाम मात्र नजिक. सरजामी इतलाखी आपले जागीं गेले. तो दाहावे महिन्यात काहीं सरदारास आत्मकृत्य विकृतीमुळें मालराव होळकर याचा काळ जाहला. दोघी बायका सती गेल्या. बाईसाहेब शोकार्णवात. तेव्हा मनुष्यमात्र शोकात. अशा सधींत गगाधर यशवंत याचे बुद्धीस विपर्यास येऊन दादासाहेबाकडे प्रेष पाठविला कीं, ही दौलत बैतलमाल जाली. त्यात आपण सुभेदाराचे चिरजीव हे जवन्य. ते पक्षीं आपण दरमजल येऊन दौलत समेटावी. येथें शोकाने गालब होऊन मनुष्यमात्र गिरफदारींत

(३३) **घर पाहावे** – घरीं मुला माणसांत जावें. **हिशेबाचा भरवसा येत नाहीं** – शिलेदारांना वाटते कीं मल्हारराव होळकर मेल्यामुळें आतां आपणास ठरल्याप्रमाणें पगाराची रक्कम मिळेल की नाहीं कोणास ठाऊक? **समजाविस** – समजुत. शिलेदारांना मिळावयाच्या पगारांतील एका हप्त्याचें नाव नालबंदी, नेबाद, अर्जबाब, समजाविस हे ते हप्ते होत. **नालबंदी** – शिलेदार वगैरे लोकास आगाऊ खर्चास पैसा देतात तो. **सरंजामी** – ज्या सरदारांस लष्करी नोकरीकरतां सरजाम लाऊन दिलेला असतो तो सरजामी सरदार. **इतलाखी** – पगार देऊन ठेवलेला सैनिक किंवा शिलेदार तो इतलाखी. अशा पगारी शिपायांची फौज ती इतलाखी फौज. **सरदारांस आत्मकृत्यविकृतिमुळें इ०** – या वाक्यांतील सरदारास या शब्दाचा अर्थ व सगति लागत नाही. **आत्मकृत्य विकृतिमुळें** – आपणच केलेल्या उपद्व्यापामुळें फळ पावून. मालेराव होळकर हा वेडसर, व वृत्तीने दुष्ट होता म्हणतात. अहिल्याबाईनें मोठ्या भक्तीनें ब्राह्मणास जोडे वगैरे दान करावे. त्यांत यानें विंचू घालून ठेवावे व ते डसल्यानतर ब्राह्मण कळवळून ओरडू लागले म्हणजे यानें पोट धर धरून हसावे अशा त्याच्या सबधीं आख्यायिका आहेत. **बैतलमाल** – बैतनमाल, बेवारशी. **जघन्य** – सर्वप्रसिद्ध. **सुभेदारांचे चिरंजीव** – पेशवे हे मल्हाररावास वडलांसारखा मान देत असत. **समेटावी** – दाबावी, गिळकृत करावी. **शोकानें**-

आहे. आपलें येणें सत्वर जाहलें असतां समय आहे. या भावें प्रेष गेला.

( ३४ ) हें वर्तमान शिवाजी गोपाळ व राजाराम रणसोड निसबत रावजी महादेव फडणीस पारनेरकर यांजला समजताच बाईसाहेबांसी त्या दिवसांत बोलावें असें पुण्य कोणाचें नाहीं, परंतु हरकूबाई व उदाबाई वाघमारे सुभेदाराच्या कन्या ( यासी ) उभयतानीं गंगाधर तात्याचा बुद्धिवाद श्रवण करून " बाईसाहिबांपाशीं बोलोन या गोष्टीचा धरबंद आजपासून केला असतां सोईस पडेल. नाहीं तरी तुम्हांस घोड्याचे दाणे भरडावे लागतील आणि आम्हांस भीक मागावी लागेल." असें बोलले. तेव्हा उभयता बायानीं प्रश्न केले कीं, " धरबंदाची पैरवी कशी, हें आम्हास सांगावें. त्याप्रमाणें आम्हीं बोलू." तेव्हा यानीं उत्तर केलें कीं, " शोकाचें गाठोडें बाधून एकीकडे ठेवून हिम्मत धरावी. सरंजामी, इतलाखी यासी जासूद पाठवून जमा करावें. भोंसले, गायकवाड, दाभाडे यांजला साडणीस्वारांसमागमें रवानग्या व्हाव्या कीं, "कैलासवासी सुभेदार यानीं श्रीमंताचे दौलतीचा पाया खोदून, वीट आपले हातें टाकून, इमारत उभी केली. त्यास या प्रसगीं आम्हावरी ईश्वरी गजब, ते पक्षीं दौलत जगवून आम्हास हमराई करून सेवा—चाकरी घ्यावी तें एकीकडे राहोन, दौलतीविषयीं पापबुद्धि धरली आहे त्यास आमचें जसें असेल तसें आम्ही भोगू परंतु आज आम्हावरि, उद्या तुम्हावरि हीच गोष्ट आहे, याचा विचार करून फौज मदतीस पाठवावी." अशीं पत्रें तमाम लहान मोठे सरदारांस पाठवून गादीची मालकी, उत्तमपक्ष नथ्याबा फणसे यासी अधिकार खरा परतु लेंकरूं; बासडा खाद्यावरी टाकील असा पाहिजे, यास्तव सुभेदार यानीं अवसान—काळीं मालरावबाबाचे हात तुकोजी होळकर याचे हातात दिला, जाटाचे पारपत्याविषयीं तुकोजी होळकरांनीं पाणी सोडताच पिंडास काकस्पर्श जाहला, ते पक्षीं त्याजला आणोन गादीवर बसवावें म्हणजे कोणतेही अवघड पडणार नाहीं. या गोष्टी आज

(३३) **गालब होणे** – शोकाखालीं खचून जाणें. गालब याचा अर्थ वरचढ होणें असा आहे. **गिरफदारी** – चिन्ता, काळजी. **समय** – संधी. **प्रेष** – पत्र.

( ३४ ) **धरबंद** – धरबध, उपाय, प्रतिकाराची योजना **पैरवी** – योजना, उपक्रम. **रवानगी** – पत्राची रवानगी. **गजब** – गहजब **हमराइ करून** – बरोबर घेऊन, सांगाती घेऊन. **बासडा** – भाला. फौज सभाळील व स्वाऱ्या शिकाऱ्या करील असाच प्रौढ अनुभवी शूर माणूस होळकराच्या सरदारीवर पाहिजे असा भावार्थ. **या गोष्टी आज विषतुल्य** – तुकोजी होळकराचे व अहिल्याबाईचे बिलकूल पटत नसे. यामुळें तुकोजीलाच आणून सरदारी आपणहून त्याच्यावर सोपविणें, हे विषासारखे कडू वाटावयाचेंच.

विषतुल्य ( वाटतील ) परंतु परिणामी अमृतोपम होतील. या समयीं बुद्धीचें दार्ढ्य करून तुकोजी होळकरांस पाचारण ( करावें ) व पत्राच्या रवानग्या आज जाहल्या पाहिजेत. उद्यां म्हणाल, 'कोणी मेल्यानें आम्हास सुचविलें नाहीं.' यास्तव विनंती केली आहे." तेव्हां तेच समयीं हरकूबाई व उदाबाई दोघी बाई-साहेबांकडे जाऊन सांगितल्या अन्वयें स्पष्ट बोलिल्या, "ब्राम्हण हरामखोरीस आला आहे. सावध झाल्यातच प्रात. न जाहाल्यास तुम्हां आम्हांस पुढें दाणे भर-डावे लागतील सावध व्हावें ही नेकसल्ला" तेव्हा बाईसाहेब बोलली, 'उभयतांस बोलावून आणावें.' त्यावरून शिऊबा बाजी व राजाराम आत्याजी बोलावून नेऊन हरकूबाई उदाबाई बोलिली त्या गोष्टीची ओळख न देता, ग्लानी गिरफदारी कांहीं एक न दाखविता, धनीपणाचे जरबेने भाषणें केलीं. "मेल्या ब्राम्हणानें हरामखोरी आरभली आहे परतु मी बायको असे मानू नका. खाद्यावर बासडा टाकून उभी राहीन, तेव्हां श्रीमताचे दौलतीस अवघड पडेल ! आमचे वडिलानीं भाडभवई करून दौलत मिळवली नाहीं, तर तरवारीचे अनुमाने शरीर खर्च घातले आहे आम्ही सिलेदार वडिलाचे चाकरीप्रमाणें चाकरी घेतल्यास हजर आहोंत. धुणीपाणी सरली असल्यास मोंगलाईची चाकरी करू. अथवा फिरग्याची करू. अगर पाहिजे तें करू (पण) ब्राह्मण म्हणतील दौलतीचा अभिलाष करू तर हे होणार नाहीं" हे बोलणें चौघांनीं ऐकावें असे तऱ्हेनें बोलून खुणा कानांत सांगितल्या कीं, भोंसले, गायकवाड, दाभाडे, वगैरे मराठेमडळ यांजला गुप्त पत्रें लिहून साडणीस्वार बिदा करावे व सांडणीची डाक बसवून तुकोजी

(३४) **बुद्धीचे दार्ढ्य करून** – मनाचा दृढनिश्चय करून **ब्राह्मण** – गगोबा तात्या चद्रचूड दिवाण. **प्रान्त** – शेवट, सुटका, सोडवणूक. **नेक सल्ला** – हितकारक विचार. **ग्लानी गिरफदारी** – शोक, चिन्ता इत्यादि. **भाडभवई**– भांडभवई, नाचेपणा, खुषमस्करीपणा **भाड** – पशुपक्षादिकाच्या आवाजाची नक्कल करणारी, खुषमस्करी करणारी एक जात **भवई** – नटाचा व नर्तकाचा धदा करणारी गुजराथेंतील एक जात. **तरवारीचे अनुमाने** – तरवारीच्या पराक्रमानें. **शरीर खर्च घातले आहे** – जिवाकडे न पाहता कष्ट, मेहनत केली आहे. **धुणीपाणी** – ऋणानुबध. **ब्राह्मण म्हणतील** – पेशवे म्हणतील. **डाक बसविणे** – पूर्वी हल्ली सारखी टपालाची व्यवस्था नव्हती. पेशवे सरकार, सरदार लोक किंवा सावकार लोक आपआपले जासूदजथे ठेवून पत्रें नेण्याआणण्याची स्वतःपुरती व्यवस्था करीत. मधल्या निरनिराळ्या टप्प्यावर घोडी किंवा जासूद ठेवून पत्रें जलदीनें नियोजित स्थळीं पोहचण्याची जी रिलेसारखी व्यवस्था केलेली असते तिला डाक बसवणें म्हणतात.

होळकर यांस सहावे दिवशी मजपाशीं आणावें. हीं दोन्हीं कामें आज करा. मंत्रभेद न होण्याविशीं फार जपावें. इतकीं अक्षरें श्रवण करून उभयतां बाहेर आले. अंतःकरणीं (कीं) पेरल्या पदार्थास फळें सत्वर आलीं. सबब हमराई बदरून सरदारास कागदाच्या रवानग्या स्वाराबरोबर होऊन, सांडेच्या डाकेचा बेत करून उदेपुरास तुकोजी होळकर यास पत्रें गेलीं कीं, फौज जेथील तेथें मुस्तकीम ठेवून तुम्हीं जेवीत असल्यास पाणी प्यावयास आम्हापाशीं यावें.

(३५) अशा गुप्त रवानग्या करून स्वस्थ बसले. ईश्वरास कर्तव्य. तुकोजी होळकर सहावे रोजीं तृतीय प्रहरीं येऊन दाखल जहाले. तेंच क्षणीं अभ्यगस्नान घालून मुहूर्त अथवा कोणास विचारणें कांहीं एक न करिता, वस्त्रें देऊन गारडा खेंडीस डेरे उभे करून तुकोजी होळकर यास डेरेदाखल केले. त्याच दिवशीं हजार स्वार हुजरात व पंधराशे सरंजामापैकीं व पाचशें बाणाची कैची व सातशें जबुऱ्याचे उंट इतकी जमियत प्रहर रात्रीचे आत दाखल केली. तों भोंसल्याकडील फौज हुसगाबाद रेवा दक्षण तीरीं दाखल होऊन छावणी केली होती तेथून सांडणी-स्वार आला. गायकवाडकडील वीस हजार फौज आली. मोहनचे राज्याचे काकडावर आली. वरफड सरदाराचे जाब आले कीं "मल्हारजी होळकराचा उपकार नाहीं असे कोण आहे? प्रसगास आपले जवळच समजावें." अशीं हमराईचीं उत्तरें माधवराव साहेब श्रीमत याजलाहि पत्रें गेलीं होतीं त्याचीं उत्तरें आलीं कीं "तुमचें दौलतीविषयीं जो पापबुद्धि ठेवील त्याचें पारपत्य बेलाशक करावें. तुम्हाकडील मुखत्यार दोघे हुजूर पाठवावें." याप्रमाणें उत्तरें आलीं. तेव्हा दाभाडे गायकवाड याचे खर्चाची सरबरा करून नाक्यावर सोय केली. तों गगावर यशवंत व दादासाहेब एकसंधान करून दादासाहेब पन्नास हजार फौजेनिशीं उज्जनीस आले. अकपातावर येऊन मुक्काम केला. हें वर्तमान तुकोजी होळकर यास समजताच मातोश्री बाईसाहेबाचे पायांवर डोय ठेवून, रातोरात दत्ताचे आखाड्यावर पडले. तों दुसरे दिवशीं दादासाहेबांकडील

---

(३४) **मंत्रभेद** – मसलतीची परिस्फुटता. **बदरून** – ही मोडी वाचनाची चूक दिसते. 'बदस्तुर' असा मूळ शब्द असावा. 'बदस्तुर' याचा अर्थ दस्तुराप्रमाणें किंवा नियमाप्रमाणें, चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें. **कागदाचा** – पत्राच्या. **मुस्तकीम** – जय्यत, तयार, कायम.

(३५) **हमराईची** – स्नेहाची, अगत्यवादाची **सरबरा** – सोय, तरतूद. **नाक्यावर सोय केली** – आघाडीस तोंडावर ठेवले. **अंकपात** – या नांवाचा एक घाट उज्जनीस आहे. **दत्ताचा आखाडा** – या नांवाचेंहि स्थळ उज्जनींत आहे.

फौजेची बिनी क्षिप्रेंत आली. हें तुकोजी होळकर यांनीं पाहून सांडणीस्वार पाठविला कीं, "क्षिप्रा उतरला असतां तुमची आमची तरवार चालेल. याचा विचार करून पाऊल टाकणें." मग बिनीवाल्यांनीं श्रीमताकडे सांडणीस्वार पाठवून आपण तसेंच उभे राहिले. दादासाहेबास विचार पडला कीं, दुसऱ्याचें घर घेऊं जातां ( तो ) प्राण जाय तोंपर्यंत कस्त करण्यास चुकणार नाहीं. आपले मालक देशीं, त्यांचेंहि संमत नाहीं. याचे घरावर उपप्लव, तेव्हा त्यानीं उत्तरें पत्रें लिहून उत्तरें आणलींच असतील. आशादुराशा धरून आगळिक केल्यास साधल्यास लौकीक नाहीं, स्वार्थ मात्र न साधल्यास अर्थ नाहीं. व मल्हारजी होळकर याचा ऋणानुबंधाचा अवसाफ होऊन खुद्दवक्तावर मनात पाप आणून बदनक्षा केला हीं अक्षरें कपाळीं लागून पतहि रहाणार नाहीं. त्यास पोक्त विचार करून तुकोजी होळकर याजकडेस कारकून पाठविला कीं, "मालरावबाबा वारले यास्तव आम्ही मातंगपोशीस येत असता तुमचे बुद्धीस विपर्यास येऊन वाकडी गोष्ट सागावयाचें कारण काय ?" तेव्हा यानीं उत्तर केलें कीं, "मातगपोशीविशीं कृपा केली ते पक्षीं फौजेचे कारण काय ? आपण पालखीत बसून एकटें यावें. ही फौज घरदार दौलत आपले वेगळे काय आहे ?" असें उत्तर कारकुनाबरोबर पाठविलें. तेव्हा होळकराचे मनांत संशय आला हा दूर व्हावा याकरिता तेच समयीं पालखींत बसून दहा पाच सरदार शागीर्दपेशा इतक्यानिशीं येऊन तुकोजी होळकर याजपाशीं दाखल जहाले. तुकोजी होळकर पायउतारा पुढें जाऊन पायावर डोई ठेविली. उभताही श्रमी जहाले. तसेंच कूच करून इंदुरास आले. ते स्वार शागीर्दपेशा जिकडील तिकडे लावून

(३५) फौजेची बिनी – आघाडीची टोळी. कस्त – श्रम, कष्ट मेहनत. उपप्लव – संकट, अरिष्ट. त्यानीं – यानीं, म्ह. होळकरानी. आशादुराशा – लोभ. आगळिक केल्यास साधल्यास लौकिक नाहीं, स्वार्थ मात्र न साधल्यास अर्थ नाहीं – आम्ही आगळिक करून चढाई केली, आणि ती यशस्वी झाली तरी लौकिक होणार नाहीं, म्हणजे लोक बरे केले म्हणणार नाहींत. मात्र स्वार्थ साधण्याकरितां ही गोष्ट केली असा दोष देतील. बरें, आमचें काम यशस्वी न झालें तर लौकिक मिळणार नाहींच, पण अर्थ म्हणजे पैसाहि मिळण्याची आशा नाहीं. अवसाफ – महाराष्ट्र शब्दकोशांत या शब्दाचा अर्थ स्तुति, प्रशसा, देणग्या असा दिला आहे येथें तो जुळत नाहीं. येथें 'समास' असा अर्थ दिसतो. खुद्द वख्तावर – ऐन प्रसंगीं. बदनक्षा – दुर्लौकिक. मातंगपोशी – मातमपोशी, दुखवट्या. पायउतारा – चालत; आदर दाखविण्याकरितां. श्रमी – दुःखी, कष्टी. दोघांनींहि मालेरावाच्या संबधीं गोष्टी करून हळहळ व्यक्त केली. शागीर्द – शिष्य, नोकर.

दोघे शागीर्द व स्नानसंध्येचा सरंजामसुद्धां बाईसाहेबांचे बंगल्यापाशीं डेरा देऊन राहिले. ते महिनाभर होते पाच चार बैठकींत सेव्य सेवकत्व प्रकरणीं बोलणीं बाईसाहेबापाशीं जहालीं. अहिल्याबाई बायको माणूस खरीच, परंतु शूद्र होत्साती स्नानसंध्या, शिष्टसांप्रदाय ब्राह्मणासारखी. ज्ञातिसंबंध नाहीं. दुसरें, मल्हारजी होळकर संपूर्ण पृथ्वीस काळ, (पण) त्याचा विश्वास बाईसाहेबाचे ठिकाणीं. सांगेल तितकें पाणी पियावयाचें हा ऋणानुबध. खडेराव होळकर सुभेदारांचे चिरंजीव कुंभेरीस कामास आले ते समयीं बाईसाहेबाचा आग्रह सहगमनाचा विशेष पडला. तेव्हां मल्हारजी होळकर सुभेदार यानीं पोटात डोकी घातली, बोलले कीं, "बाई, मला उन्हाळा करित्येस कीं काय? तूं माझे पाठीवर आहेस तर अहल्या मेली, खंडू आहे, हा मला भरंवसा." तेव्हा सहगमन महकूब जहालें. नीट जहालें. कारण सुभेदार यांनीं पैसा उत्पन्न करून मागें टाकावा त्याची व्यवस्था व चार माणसाचें संरक्षण बाईनें करावें असा ओघ चालत आला. येणें करून बाईसाहेबाचे तेजापुढें दादासाहेबाचें वर्चस्व काहीं एक दिसण्यात आलें नाहीं. महिनाभर राहून तुकोजी होळकर यास वस्त्रें देऊन आपले फौजेंत उज्जनीस जाऊन सत्वासचे घाटें उतरून देशीं गेले.

( ३६ ) मग भोंसल्याकडील व गायकवाडाकडील फौज आली होती त्यांतील खासे खासे सरदार नावाचीं माणसे हजार पधांशें हरदु तर्फेची बोलावून मेजवानी केली. बनातीचे तागे फाडून बसावयास घालून, एक ताट, पाच पाच वाट्या ठेऊन मेजवानी केली. तुम्ही उपकार केल्यानें आमचा सर्वोपरी बचाव झाला. या भावीं मोठेपण त्यास देऊन मनुष्य पाहून कठी, चौकडे, शिरपेंच, वस्त्रें जशी ज्याची योग्यता तशी त्यास देऊन गौरव केला. घरोब्याचे वृद्धीचें बोलणें करून बिदा केले. राजे-रजवाडे यानीं गृहकृत्याचे समारोपाचें वर्चस्व श्रवण करून बायको

---

(३५) **ज्ञाति संबंध नाहीं** – ज्ञाति म्हणजे जात. होळकराची जात धनगराची. असे असून अहल्याबाईचें वागणें सर्व ब्राह्मणासारखे. **सहगमन** – सती जाणें. **पोटांत डोकी घातली** – लहान मूल जसें आईच्या कमरेला मिठी मारते, व तिच्या अंगावर डोकें टेकतें, तसे मल्हारराव होळकरानें केले. **उन्हाळा करणें** – सर्वनाश करणें. **महकुब** – तहकुब. **नीट जहाले** – झालें तें ठीकच झालें. **ओघ** – पहिल्यापासून व्यवस्था, क्रम.

( ३६ ) **हरदुतर्फेची** – दोहोबाजूकडील. **गृहकृत्याचे समारोपाचे** – गृहकृत्याच्या समारोपाचे; घरांतील खेकटीं व्यवस्थित निकालांत काढण्याचें अहिल्याबाईचें वर्चस्व म्हणजे कौशल्य, वजन, ऐकून किंवा पाहून राजेरजवाडे यांनीं तिचा स्तुतिवाद केला.

होय्साती दौलतीचा बदोबस्त केला. जरबेचा जलुष पाहून घरोब्याची वृद्धि असावी यास्तव टिका वस्त्रें जोतपूर, जयपूर, उदेपूर, बुंदी आदिकरून सर्वांनीं पाठविलीं त्याचाही गौरव करून बिदा केले.

( ३७ ) या राजकारणापासून गंगाधर यशवंत राजकारणातून निघून (त्याचे) आचरणानुसार स्वरूपास हीनता आली. देवदर्शनास जातों म्हणून आज्ञा घेऊन तेहि देशीं आले. बाईसाहेबानींही चाकर नाहींत अशा भावीं बिदा केले नाहींत. शुष्क विचार दौलतीचे देशीं श्रीमताशीं बोलण्याविषयीं आज्ञा करून रवानगी केली. दादासाहेब ग्वाल्हेर प्रातीं होते. तेथें सुभेदाराचा काळ झाल्यावर माधवरावसाहेबाचे व दादासाहेबाचे मनओळखीस प्रारंभ झाला. हें राजकारण झालियावर दादासाहेब देशीं गेले. स्वारीचे कर्ज व फौजेचे समजाविशीबाबद ऐवज मागावयाचा तगादा लाविला. माधवरावसाहेब यानीं उत्तर केले कीं, " मागे आपण स्वारी करून घरीं कर्ज आणित होता तेव्हा कैलासवासी नाना, भाऊ आपल्यास वडील होते ते साभाळीत होते. आता आम्हास दौलतीस वडील आपण. सावकाराचें देणें व लोकाचें देणें ह्याचा धरबध आपल्यास कर्तव्य तसा करावा. शिल्लक-साखळी असल्यास आमचे स्वाधीन केली तरी साभाळून ठेवू." या बोलण्यावर तराह खाऊन

(३६) जलुष – माहात्म्य, प्रभाव. घरोब्याची – अहिल्याबाईशीं घरोब्याची. **टिका वस्त्रे** – रजपुत राजांत राज्यारोहणाचे वेळीं टीका म्हणजे तिलक लावून वस्त्रें सन्मानार्थ देण्याची प्रथा असते. जोधपूर, जयपूरकर सस्थानिक यांनीं आपल्याला होळकराचा पाठिंबा जरूर असणें आवश्यक आहे, असें जाणून त्यानीं त्यास वस्त्रें पाठविलीं.

(३७) **या राजकारणापासून** – होळकराची जहागिर गिळकृत करण्याच्या कारस्थानापासून. **राजकारणातून निघून** – गगाधर यशवन्ताला अहिल्याबाई दिवाण म्हणून सल्ला विचारीनाशी झाली. **स्वरूपास हीनता आली** – लौकिकास कमीपणा आला. **चाकर नाहींत अशा भावीं** – अहिल्याबाईनें राज्यकारभारांत गगाधर यशवन्ताचा सल्ला घेण्याचें अजिबात सोडले होते तरी त्याला तसें स्पष्ट सांगितलें नाहीं. कारण तो पेशव्यांच्या समतीनें नेमलेला दिवाण होता. म्हणून त्याला काढून टाकणें शक्य नव्हते. तो जेव्हा पुण्यास जाण्याकरतां अहिल्याबाईची परवानगी मागूं लागला तेव्हां तिनेंहि त्याला शुष्क म्हणजे गैर महत्त्वाच्या कांहीं गोष्टींचा खुलासा पेशव्याकडून करून घेण्याचें क्षुद्र काम सांगितलें. **दौलतीचे** – होळकरांच्या सस्थानासंबधीं. **मनओळख** – खरी अन्तरगाची ओळख, वैर. **धरबंद** – आवराआवर, निर्वाह, व्यवस्था. **शिल्लक साखळी** – शिल्लक. **तराह** – तऱ्हा. **तऱ्हा खाणें** – बिथरणें.

दादासाहेब कूच करून गंगापूर नजिक नाशिक त्रिंबक येथें मुक्काम घालून फौजबंदी आरंभली. इतक्यांत तुकोजी होळकर वस्त्रे घ्यावयाकरिता पुण्यास आले. श्रीमतानीं वस्त्रें देऊन नजरेचा ऐवज गगाधर तात्या याचे विद्यमानें ठरला तो त्यांनी देऊन तुकोजी होळकर व गगाधरपत तात्या वस्त्रें घेऊन वाफगांवास आले. तेथें आल्यावर माधवरावसाहेबाचा हुजऱ्या येऊन तुकोजी होळकर यास सडे बोलावून नेलें. कारण एकाती माधवरावसाहेब व तुकोजी होळकर बसून रायानीं तुकोजी बावास प्रश्न केला, "तुमचे कारभारी गगाधर यशवत त्याचा आचार तुमचेही अनुभवी आहेच पुढें तुम्हास चादवडास जाणें. गगापुरावर दादासाहेब ( आहेत ) तेव्हा रगात रग मिळावयाचा इरादा किंवा सरकार लक्षानुसार चालावयाचें, यातील मनोधर्म वास्तविक बोलावे." तेव्हा सुभेदारानीं उत्तर केले कीं, "आमची क्रिया कैलासवासी बाजीरावसाहेब व कैलासवासी सुभेदार या उभयताचे वचनप्रमाण झालें आहे. तेच आम्हीं अनादी जाणतो जो त्याचे गादीवर तो आमचा मार्तंड दुसऱ्याशीं आम्हास कारण नाहीं. हे खचित स्वामींनीं मनात ठेवावे. बाकी आमचा ब्राह्मणाशीं मेळ पडतच नाहीं. बाईसाहेबापर्यंत जाऊ तावत् ब्राम्हणाशीं आम्हास बिघडतां येत नाहीं. मागाहून आपली आज्ञा लिहिल्यात आली होती त्याप्रमाणें कोणी बोलावयास आपल्याकडे येईल आम्ही फौजसुद्धा चादवडास जाऊं. तेथें दादासाहेबानीं आमचा मेळ घातला तर घालोत. कारण कारभाऱ्याचा त्याचा मेळ. तेव्हा ही गोष्ट अर्थात् प्राप्त होईल परतु सेवकाचें अतःकरण स्वामीचरणींचेंच भृग मोजावे." अशा भावीं माधवरावसाहेबाची दिलजमाई करून तुकोजीबावा गगाधर तात्यास घेऊन वाफगावास जाऊन फौजेसुद्धा कूच करून चादवडास आले. हे वर्तमान दादासाहेबास समजताच तेही चादवडास आले. चादवड मुक्कामीं दादासाहेब व सुभेदार व गगोबा तात्या याच्या बैठकी होऊन बोलणीं जाहलीं. यातील खुषबो श्रीमत माधवरावसाहेब ( यान्या ) समजण्यात चौपट आली. तेव्हां

---

(३७) रायानीं – माधवरावांनीं, रावांनीं. **रंगात रंग मिळविणे** – सामील होणें. **वास्तविक** – खरे असेल तें. **मार्तंड** – खंडोबा, होळकराचें कुलदैवत. **ब्राह्मणाशीं** – गगोबा तात्याशी. **सेवकांचें अंतःकरण स्वामी चरणींचेच भृंग मोजावे** – आमचें अन्तःकरण मनःपूर्वक तुमचेकडेच राहील असे खचित समजावें. जसे भुंगे हे कमळाच्या ठिकाणीं लीन होतात तशी माझी निष्ठा तुमच्याच पायाशीं राहील. **मोजावे** – गणावे, समजावे. **खुषबो** – सुगंध. येथें अर्थ वाटाघाटींत घाटलेल्या कारस्थानाचा वास. **चौपट** – माधवरावा विरुद्ध चाललेल्या कारस्थानांत होळकराचें अंग थोडें असतां पेशव्याच्या बातमीदारांनीं तें भलतेच अधीक म्ह. चौपट असल्या-

कस्पमा सिद्ध झाली कीं, तुकोजी होळकर आम्हांशीं बोलणें दाक्षिण्यार्थ बोलले, येथील ( बोलणें ) येथेंच ठेऊन कारभाऱ्याचें नादीं लागून रंगांत रंग मिळविला, किंवा बोलण्यावर शाबूत आहेत, यातील परीक्षा पहावयास विश्वासुक शागीर्द घोड्याच्या डाकेनें चांदवडास रवाना केला. त्यास आज्ञा केली कीं, 'तूं भिक्षु-कीच्या वेशानें जाऊन पारनेरकर रावजी महादेव यांचे घरीं उतरून तेथें जो मुखत्यार असेल त्यांसी एकांती भेटून, ही चिठ्ठी तुकोजी होळकर यास प्रविष्ट करून, उत्तर घेऊन येणें' अशी आज्ञा होऊन शागीर्दाची रवानगी केली. तो चादवडास पारनेरकराचे घरीं उतरून तेथें मुनीम महीपतराव गिरमाजी होते त्यांस वेगळें गाठून श्रीमताचें हातची चिठ्ठी ( त्यास ) दिल्ही आणि बोलला कीं, " या समयीं ही चिठ्ठी सुभेदारास दाखवून उत्तर मजला प्राप्त होऊन सूर्योदयात्प्राक् माझें निघणें येथून होईल असें करावे. येथील व्यवहार पहाता गगाधर तात्याच्या नकळत सुभेदाराशीं वेगळे वाटेनें कोणी भाषण करील ऐसें प्राप्त नाहीं. तथापि ही अडचण तशीच, यास्तव सुभेदार भोजनास बसले, सहा घटिका रात्र झाली होती, त्यासमयीं जाऊन हुजरे वगैरे अवघ्यास दूर करून चिठी वाचून दाखविली. त्यात सार हेंच कीं, " तुम्ही कारभाऱ्याचे नादीं लागून रगांत रग मिळविला. आम्हांस सल्ला काय सागता ? " तेव्हा सुभेदारांनी श्रवण करून उत्तर द्यावयास सांगितलें कीं, " जे समक्ष विनती केली तीच निःसीम मोजून पत्र पावताच नाशिका-

(३७) सारखें पेशव्यास समजाविले. दाक्षिण्यार्थ — मुख–शोभेकरतां, आदर दर्शविण्यापुरते. घोड्याची डाक — जुन्या ऐतिहासिक काळीं राजे लोक कोठून महत्त्वाची बातमी आणावयाची असता तेथपर्यंत जासूदाचें, घोड्यांचें किंवा सांडणीचें टप्पे ठेवीत. म्हणजे मूळ ठिकाणापासून बातमी विलब न होता लौकर येऊन पोंहोचे. येथें अर्थ असा. पुणें ते चान्दवडापर्यंत पेशव्यानें दहा दहा पधरा पधरा मैलावर घोडीं सज्ज ठेवलीं. पेशव्याचा निरोप घेऊन निघालेला खास शागीर्द वाटेंत घोडीं तयार असल्यामुळें एकसारखा दौडत अगदीं थोड्या वेळात चांदवडाला जाऊन पोचला. मुखत्यार — सर्वाधिकारी, मुख्याधिकारी. सूर्योदयात्प्राक् — सूर्यो-दयाच्या आंत. प्राप्त — हिम्मत. दिवाण गंगाधरतात्याच्या अपरोक्ष तुकोजी होळकराशीं कांहीं खलबत करण्याची कोणाची हिम्मत नव्हती इतका गगाधरपंताचा कडक कारभार व कैद होती. तथापि ही अडचण तशीच — पत्र खुद्द पेशव्याचें तेव्हां तें त्यानें सांगितल्याप्रमाणें काय वाटेल ते करून सुभेदारास पोचतें करणें आवश्यकच होतें. आम्हास सल्ला काय सांगता — आता आम्ही काय करावे असें तुमचें म्हणणें ? जे — जी. निःसीम मोजून — पूर्ण खरी अशी मानून.

वर मुक्काम येऊन करावा. आम्ही व साहेब कूच करून घोडपेच्या सुमारें जाऊं लागलों म्हणजे आपण बेलाशक कूच करून आम्हांवर यावें. आपले फौजेच्या धुळोरा कोशा अर्धकोशाच्या आंत पाहिला म्हणजे घोडे घालून (दादासाहेबांच्या फौजेस) लुटून घेतों. यात तथा नाहीं." याप्रमाणें उत्तर देऊन शागीर्द बिदा केला तो ठिकाणसीर पोहोचतांच श्रीमंत बमय फौज नाशिकास आले. तों दादासाहेब दबाव पडून, धोडप जवळ करावी असा विचार करून, दादासाहेब व तुकोजी होळकर कूच करून चालले धोडप तीन कोश राहिली. त्या संधीस माधवरावसाहिबाचीही स्वारी दाखल जाली. स्वारांचा धुळोरा पाहून तुकोजी होळकर सुभेदार हत्तीवर होते ते घोडयावर बसून, आपले फौजेशीं पूर्वसंकेत होताच, त्याप्रमाणें घोडे घालून दादासाहेबास लुटून घेतलें. तो श्रीमंत येऊनही दाखल जाहलें. श्रीमंत माधवरावसाहेब याचा व तुकोजी होळकर याचा रामराम जाला. माधवरावसाहेबाची मर्जी बहुत प्रसन्न जाली. त्या संधींत दादासाहेब सवड फावून किल्लयावर गेले. ते समयीं सुभेदारानीं विनती केली, "घोडे सोडून पायउतारा होऊन किल्लयावर जाऊन धरून आणितो ! हुकूम जाला पाहिजे." श्रीमंतांनीं आज्ञा केली, "आता कोठें जातात ? धरून घेऊ. हकनाक माणसें जाया करू नये."

(३८) तों इकडे गंगाधरपंत तात्या याजला आपलें आचरण स्मरून, त्यांनीं काषाय वस्त्रें परिधान करून, दोघे खिजमतगार मात्र बरोबर घेऊन, अणकाईचे किल्लयास गेले. किल्लयाचे दरवाज्यापाशीं जाताच दोघे खिजमतगार बरोबर होते त्यानीं दरवाणकरास सांगितलें कीं, "हा गंगाधरपंत तात्या, सरकारचा हरामखोर, तुमचे जिमेस आहे !" तेव्हा तात्यानीं सरोष खिजमतगाराकडे पाहिलें. तेव्हा

---

(३७) म्हणजे जो संकेत केला होता, तोच कायम आहे असें समजून. **साहेब** – दादासाहेब पेशवे. **धुळोरा** – धुराळा. **तथा** – बाकी, कुचराई. **ठिकाणसीर** – नेमलेल्या जागीं. **बमय फौज** – फौजेसुद्धां. **दबाव** – भीति. **धोडप** – धोडपचा किल्ला. **हकनाक** – नाहक, विनाकारण.

(३८) **याजला आपले आचरण स्मरून** – याला आपल्या दुराचरणाचा पश्चात्ताप झाला व आतां आपलें पारिपत्य मोठेंच होणार असे समजून ते टाळण्यासाठीं त्यानें सन्यास घेतला. सन्याशाला कोणी शिक्षा करीत नाहीं ही समजूत. **त्यानीं** – ते. **काषाय** – भगवी, कावेनें रंगवलेली. **अणकाई** – हा किल्ला खानदेशांत आहे. **दरवाणकरास** – दरवाजकरास असे पाहिजे. मोडी वाचनाची चूक. मोडींत 'न' व 'ज' हीं अक्षरें सारखी दिसतात. **सरकारचा हरामखोर** – सरकारचा गुन्हेगार, राजद्रोही. **जिमेस** – ताब्यांत. मूळ शब्द जिम्मा.

हुजरे यांनीं उत्तर केलें कीं, " रागें रागें काय पाहातोस ? तुझे मागें आठ महिने खराब आहों. श्रीमंतांनीं आम्हांस उभयतांस पाठविलें होतें, रोजची अकबार पोंचवीत होतों. आज उघडे होऊन तुजला किल्लेदाराचे जिमेस करून हुजूर जातों. पुढें तुमचे प्रालब्धी असेल तें होईल." असें निष्ठुर भाषण करून उभयताही श्रीमंत माधवरावसाहेबांजवळ जाऊन मुजरा केला. तो लष्करात मशारनिल्हे पळाले म्हणून हाकाहाक पडली. हुजरे आल्यावर त्यानीं सागितलें कीं, अणकाईस किल्लेदाराचें जिमेस करून आलों. तेसमयीं साडणीस्वार पाठवून, घेऊन येऊन पादभूषणादिक अलकार देऊन पुण्यास प्रविष्ट केले.

( ३९ ) श्रीमंत व होळकर यानीं किल्ल्याखालीं मुक्काम केला. दुसरे दिवशीं किल्लेदारास ताकीद गेली कीं, " साहेब पोहोचाऊन देणें " माधवरावसाहेब यांचे जरबेचा जलुष मोठा. दादासाहेबानीं किल्लेदारास भुलथापी बहुत दिल्ह्या. आशा दुराशाही दाखविली. परतु माधवरावसाहेबाचे जरबेपुढे काहीं एक बनून न येता दादासाहेबास स्वाधीन करताच बनले. हस्तगत झाल्यावर तुकोजी होळकर सुभेदार यास पुनः वस्त्रें–अलकार देऊन इदुरास रवाना केले.

( ४० ) इंदुरीं आल्यावर बाईसाहेब याची भेट घेऊन ( नंतर ) कारभारी कोणी नेमून द्यावायास्तव पूर्वीं आज्ञाही आली होती (कीं) दोघे गृहस्थ पाठवावे त्याजवरून खाजगीकडील कारकून नारो गणेश, (व) दौलतीपैकीं शिवाजी गोपाळ निजबत, रावजी महादेव फडणीस या उभयताची रवानगी पुण्यास केली. उभयता पुण्यास दाखल होऊन श्रीमंताची भेट घेऊन ज्या कारणास्तव बोलाविलें होतें त्या विषयाचें प्रत्यक्ष निदर्शनास आलें. तेव्हा बाईसाहेबाचे व तुकोजीबावा सुभेदार याचें स्तुतिस्तोत्र श्रीमंतानीं स्वमुखें बहुत केलें. मग उभयतानीं श्रीमती आज्ञापित

---

(३८) **तुझें मागे आठ महिने खराब आहों** – गेले आठ महिने तुझ्या सारखे पाळतीवर अष्टौप्रहर राहात आलों आहों व त्यामुळें फार त्रास सोसला आहे. **अकबार** – अखबार, बातमी. **उघडे होऊन** – प्रकट होऊन. **हाकाहाक** – बोंबाबोंब. **पादभूषणादिक अलंकार** – बेड्या.

(३९) **जरबेचा जलुष** – जरब, कदर, दबाव. **करताच बनले** – याचा अर्थ लागत नाहीं. मूळात काय अक्षरें असावीत त्याचा तर्क करता येत नाहीं. **द्यावायास्तव** – द्यावयास्तव. **निजबत** – तर्फेचा, कडील. **श्रीमन्ती आज्ञापित** – अहिल्याबाईनें सागितल्याप्रमाणें. **शिवबा बाजी** – म्ह. शिवाजी गोपाळ. **नमूद सिद्ध होणें** – गोष्ट अमलांत येणें. **वस्त्रे दिलीं** – होळकरांच्या दिवाणगिरीची.

भाव कारभाऱ्या प्रकरणीं विनंती केली कीं, " बाईसाहेबांचे सुभेदाराचें सांगणें कीं आम्हांस कारभारी नेमून द्यावा. " तेव्हां श्रीमंतांनीं आज्ञा केली, " येथून कोणी नेमून दिल्यास तुमचा व त्यांचा मनोधर्म मिळावयास वर्षभर पाहिजे. यास्तव तुमचे दौलतीपैकीं खातरजमेच्या माणसाची योजना करा. त्यासच आम्ही आपले म्हणोन वस्त्रें देऊ. " उत्तम आहे, म्हणून बिऱ्हाडास आले. नारोपंत नाना व शिवबा बाजी बसले. उभयतांचा स्नेह अकृत्रिम. बाजी नानासी बोलिले कीं, माझे मनांत आलें कीं, " त्वां दिवाणगिरी करावी. " तेव्हा नानांनीं उत्तर केलें कीं, " मी खाजगीचे कारकुनाचा कारकून. त्यात बायकाकडील. भाकरी मोजाऱ्या इतकी आमची बुद्धि. दौलतीचे ओझें आम्हासारिख्यान्या माथां ठेवू म्हणतां ( तेव्हां ) थट्टा करिता कीं काय ? " बाजी बोलिले कीं " तुम्हांस काय ? मी मातोश्रीसाहेबांस लिहून आज्ञा आणवितों " असे बोलून ते समयीं कागद लिहिले. श्रीमंतांचे बोलण्याचा आशय व आपले ठायीं प्रसन्नतेचा गौरव, व कारभाऱ्याविषयीं आज्ञा केली तो अभिप्राय दर्शवून मनुष्य-योजनेचा विचार नारो गणेशाचें नाव लिहून पाठविलें. ' ध्यानास येऊन आज्ञा आली म्हणजे नमूद सिद्ध होईल. ' अशाभावीं पत्राची रवानगी करून बारावे दिवशीं उत्तर आलें. त्यात रुक्याचा अभिप्राय पाहून श्रीमंतास विनंती केली कीं, " मातोश्रीसाहेबानीं नारो गणेश याची योजना करून पाठविली. " श्रीमंताचेही ध्यानास येऊन दुसरे दिवशीं मुहूर्त पाहून ( त्यास ) वस्त्रें दिल्हीं.

( ४१ ) गंगाधर यशवंत याचें पारपत्य स्वहस्तें करून कैदेंत ठेविलें. तथापि

(४०) पारिपत्य स्वहस्ते करून – माधवराव पेशव्यानें गंगाधरपंतास किती निष्ठुर शिक्षा केली त्या संबंधीं हे पत्र पाहा. ५–८–१७६८ " श्रीमार्तंड. पुरवणी श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामीस, विज्ञापना. राजकी वर्तमान राजश्री गंगाधर येशवंत याजकडे तीस लक्ष रुपये घ्यावेसे करार आणि एक वर्ष पुण्यात कुटुंबासुद्धा राहावें ऐसे झाले होते, त्यास त्याजकडून तिसा लक्षा रुपयाचा निकाल होऊन न ये यास्तव श्रीमंतानीं अधिक वद्य १ प्रतिपदेस समक्ष दिवाणखान्यांत दोन प्रहर दिवसा बोलाविलें. तात्याबराबर बाजी विठल मेहुणे व सखभट व जिरजीव दादा व आपणासह आले. श्रीमंतांनीं रुपयेचे विचारले. रुपयाचा जाबसाल येथास्थित न जाला. त्याजवरोन श्रीमंत बहू कोपायमान होऊन चौघाचे मुसके बांधले, पायांत आलकार घालून चौघास छेड्याचा मार विशेष दिला. बाजी विठल यांस तीनसे छडी मोजून मारली, रघत वोकले, त्याप्रा। सखभटास व दाजीस मारिले. तात्यास बारा छेड्या येशा मारिल्या कीं रघताचे चिलकांड्या उडाल्या, उपरांतिक चालीस पनास आणखी मारिल्या, कांहीं

श्रीमंतांचें घरची कैद व इतर ठिकाणची कृपा बराबर होणार नाही. स्नानसंध्या, नित्य भोजनाची टापटीप, वस्त्रपात्रादि कांहीं एक कमी नाही. कोणाकडे त्यांनीं जाऊं नये व त्यांजकडे कोणी येऊं नये इतकी मात्र अटक. असा बंदोबस्त ठेवून घरावर चवकी पहारा मोजदाद करावयास पाठविला. तेथें प्रथम कागद-पत्रांचें रुमाल हातीं लागले. त्यांत दर्याफ्ती करितां शाण्णव लक्ष बत्तीस हजार फक्त धर्मादाय निवडून श्रीमंतांस लिहिलें. तें श्रीमंतांनीं ध्यानास आणून कारकून जप्ती बोलावून घेतली. कारण ज्याकडून कंपेश कोट रुपये धर्म, तेथें मागें काय असावयाचें आहे ? ह्या संधींत पिशुनांनीं जप्तीचे घालमेलींत राहूरकर भिवाजी रणसोड व रावजी महादेव पारनेरकर या उभयतांचा व गंगाधरपतांचा मेळ, याजकरितां उभयतांचे घरावर जप्ती करावयाच्या यादी करून श्रीमंतापुढें टाकिल्या. पाहून श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, "रावजी महादेव पारनेरकर याची दौलत कोणास डोळे असल्यास श्रीत्रिंबकेश्वरी जाऊन पहावी. कारकुनाचा कद किती ? भिवाजी रणसोड फक्त शिपाई मनसुभा वगैरे कारभार जाणत नाहीं." असें बोलून दोन्ही यादी आपले हातें फाडून टाकिल्या. तदुपर गंगाधरपंताचा पुन्हा उदय झाला नाहीं. दादाजी गगाधर,

(४०) रुपयाचे कांहीं न बोलत. मग पितापुत्राचे नाका कानांस चाप लाविले ते समई माहा आकांत जाला. येसी बहुतप्रकारे विटबना करोन थोरल्या चौकात दरवाज्यापाशी गाड्याचे हवाल आहेत. सर्वत्र जन तमासा पाहात आहे. अद्याप रुपयाचा निकाल जाला नाही. कळावें." [ पेशवे दप्तर भाग १९ पृष्ठ ९७. ]

**श्रीमन्ताचे घरची कैद व इतर ठिकाणची कृपा बराबर होणार नाहीं** – इतर ठिकाणीं कोठेंहि चैन मिळणार नाहीं अशी चैन व सुख सोय पेशव्यांच्या कैदेंत असता गगाधरपंताची चालू होती. भावार्थ गगाधरपतास कैद केलेले होते तरी तो मातबर राजकीय कैदी म्हणून नजर कैदेखेरीज त्यावर बधन घालण्यांत आले नव्हते. **मोजदाद करावयास** – गगाधरपतांच्या मिळकतींतून दडाची रक्कम वसूल होते कीं नाहीं याची पाहणी करण्यासाठीं माणसें पाठविली. **दर्याप्ती** – समजणूक, आकलन. **दर्याप्ती करणें** – समजून घेणें. **दर्याप्ती करितां** – शोधाअन्तीं. **फक्त** – सर्व ! गंगाधरपताच्या मिळकतीचे हिशेब पाहता त्यानें बहुतेक सर्व इस्टेट धर्मादाय करून टाकल्याचें आढळून आलें. **कारकून जप्ती बोलावून घेतली** – जप्ती करितां पाठविलेला कारकून परत बोलाविला. **कंपेष** – कमी अधिक, अंदाजाने, सुमारें. **पिशुन** – चहाडखोर, दुष्ट लोक. **कद** – लायकी. **कारकुनाचा कद किती** – रावजी महादेव साधा कारकून. त्याची मिळकत ती कितीशी असावयाची !

त्यांचे चिरंजीव, त्यांजवर श्रीमंत माधवराव साहेबांची पूर्ण कृपा. बराय मसलत साठ हजारांची अहागिरी देऊन जवळ बाळगिले.

( ४२ ) इकडे नारो गणेशास वस्त्रें देऊन, हिंदुस्थानांत सुभा रवाना करावा हें राजकारण सिद्ध करून रामचंद्र गणेश यांची योजना केली. शिंदे नवे सरदार, कारभारी वडिलांचे हातचे, त्यांचें यांचें न बने. सबब उज्जनीस रावोबा पागे यांची व महादजी शिंदे यांची लढाई होऊन राघोबा पाग्याचें डोकें कापिलें. येणें करून जरब पडून बाजी नरसिंह व राघो मल्हार आदिकरून सर्व रूजू जहाले. दौलतीचा बदोबस्त करून पुण्यास आले. श्रीमताची भेट घेऊन यांचीही योजना रामचंद्र गणेश यांजबराबर केली. व होळकराकडील कारभारी याजला ताकीद केली कीं, "तुम्ही इंदुरास जाऊन फौजेची तयारी करून सरकारी सरंजाम येईल त्याजला सामल होऊन त्रिवर्ग एक विचारें मनसब्याचीं पैरवी करीत जावी." अशी आज्ञा जाली.

( ४३ ) तो दादो मल्हार वाघोलकर याचा व नारोपत नानाचा स्नेह फार. त्यानीं नारोपंत नानास बुद्धिवाद केला कीं, "होळकराची दिवाणगिरी आपण केली ही गोष्ट फारच मोठी केली. परतु शिवबा बाजी याचे हाताखालीं तुम्ही व तुमचे यजमान वगैरे आहा, आज पावेतों 'अरे नारोबा' असें बाजी म्हणतात, तेव्हां कारभार साराच हे करितील. मलईचे मालक तुम्ही. फौजेचे लोकाचा मार खावा इतकेंच मात्र तुम्हांपाशीं राहिल्याचा विचार काय केला ?" तेव्हा नारो गणेश यांनीं उत्तर केले कीं, "आपण कल्पना घेतली ही खरी, परतु याचा धरबंद कसा करावा ? याची शक्कल सागा." तेव्हा दादो मल्हार बोलिले, "बाजीचें रहाणें हुजूर व्हावें, तुम्हीं स्वारी करावी, असें जाहल्या खेरीज तुमचा प्रात नाहीं. मग

(४१) तदुपर – त्यानंतर.

( ४२ ) सुभा – सुभेदार. **वडिलांचे हातचे** – वडिलांपासूनचे, जुने, वृद्ध. **मनसब्याची पैरवी** – विचार–अचार, बाटाघाट.

( ४३ ) राहिल्याचा – 'राहील याचा' दादो मल्हार म्हणाला, "तुम्ही नांवाचेच कारभारी होणार. खरा कारभार शिवबा बाजी करील व शेवटीं फौजेच्या लोकांचा पगार वेळच्या वेळीं पोचला नाहीं म्हणजे ते लोक कारभाराचा दरक तुमच्याकडे म्हणून तुमच्या दाराशीं धरणीपारणी करतील आणि अखेर तुम्हास मारझाण करून तुमची अब्रूहि घेतील. अधिकार तुमचेपाशीं कांहींच राहणार नाहीं. फक्त शिपायांचा मार खाण्याची जबाबदारी मात्र पत्करली असे होईल. मलई – दंगा, धिंगामस्ती, बखेडा. शक्कल – उपाय, विचार. प्रांत – शेवट, निभाव.

मान्मा बोलिले कीं, हें घडतें कसें ? मग दादो मल्हार बोलिले कीं, " लाख रुपये खर्च करावा, बाजीचें रहाणें श्रीमतांशीं बोलून पुणें मुक्कामीं करितों. " नारोपंत नानांनीं कबूल केलें मग दादो मल्हार श्रीमंतांशीं बोलिले. श्रीमंतांचेही ध्यानास आलें. परंतु बाजीशीं ही गोष्ट बोलण्याचा संकोच पडतो. कारण कीं, पारनेरकराचे लक्ष श्रीमंताचे चरणीं निःसीम, त्यात आमचे लेकुरपणात दादासाहेबाचे दौलतींत आक्रमण ( झालें असता ) आम्हास देयाघेयाची अडचण पडू लागली, तेव्हा महादाजीपंत गुरुजी याजकडून रावजी महादेव हुजूर होते त्याशीं बोलून या प्रसंगीं सुभेदारास लिहून आमचे खर्चाची मदत लाख पन्नास हजाराची करवावी ( असें केलें ) तेव्हा रावजी महादेव यानीं थोरले सुभेदारास वर्तमान लिहून एका महिन्यात पांच लक्ष रुपयांच्या हुड्या आणून नजर केल्या. व विष्णु महादेव याचे दुकानावर सदर परवानगी पाठविली. याप्रमाणें सरकार लक्षास जपून, अशा माणसास स्वार्थपर होऊन, हिरमोड ( त्याच्या ) उमेदीचा करावा ही गोष्ट कशी ?" तेव्हा दादो मल्हार यानीं विनंती केली हें ( न ? ) जाल्यास होळकराचे दौलतींत कलह उत्पन्न होऊन सरकारकामात व नक्षास पदोपदीं बाध पडेल. ही गोष्ट श्रीमंताचे गळीं उतरून एक दिवशीं बाजीस भोजनास बोलावून बाजी स्वयपाक करितात, श्रीमंत जवळ बसून साहित्य देतात, त्यात बाजीस श्रीमंतानीं विचारिलें कीं, " बाजी आम्हास लाख रुपये मिळून तुम्हीं आम्हापाशीं रहावें असें जाल्यास कसे ? " तेव्हां बाजीनीं विनती केली कीं, " सुवर्ण आणि सौगंध्य ! सरकारचा अर्थ होऊन पादसेवा घडते, या उपर लाभ तो कोणता ? असे होत असल्यास स्वामींनीं मनांत कांहीं एक अंदेशा न आणितां ही गोष्ट अगत्य करावी. अंतःकरणापासून विनंती करितो, स्वामींचे चरण साक्ष आहेत " तेव्हा श्रीमंत निःसंशय होऊन या गोष्टीस रुकार दिला. भोजन होऊन घरास आले. नारो गणेश याजला या गोष्टीचा इतल्ला दिल्हाच नाहीं. मग जेव्हां नमूद सिद्ध झाला तेव्हा बाजीस एकांतीं घेऊन ( नारो गणेशानीं ) सफाईच्या गोष्टी विशेष बोलून, " आपण कोणीही कारकून द्यावा अथवा बटीकही दिल्ही तरी दौलतीचा ओघ तिचे टाकाखालून काढीन."

( ४३ ) **नक्ष** – लौकिक, कीर्ति, दबदबा. **सुवर्ण आणि सौगंध्य** – सुवर्णाला सुवासहि यावा अशी अधिकच उत्तम गोष्ट. **सरकारचा अर्थ होऊन** – तुम्हास पैसा मिळून तुमचा स्वार्थ साधतो आणि मला तुमचे जवळ राहावे लागून अनायासे तुमची चाकरी मजकडून घडते, अशा दोन्ही गोष्टी साधतात. **इतल्ला** – दखल. **नमूद सिद्ध झाला** – योजनेप्रमाणें बनाव तयार झाला. **दवलतीचा ओघ तिचे टाकाखालून काढीन** – बटकीकडूनहि कारभार करवून दाखवीन.

असें बोलून पायांवर हात ठेविला. बाजीनीं बहुत खातरी केली कीं, " नाना, आपण दौलतीचें ओझें उचललें तेव्हां आपल्याला अनकूल प्रतिकूल पाहून त्याचा बदोबस्त केला असता यांत वाकडे तें काय ? आम्हीं तुमचे बरोबर असतों अथवा हुजूर राहिलों तथापि नीट वाकडें याचा प्रश्न सुभेदार अथवा श्रीमत आपल्यास करितील ते पक्षीं आपण केलें हें उचितच. आमचें ऐश्वर्य मिळून श्रीमतापाशीं धन्या जवळ आपल्या सारिखे मुरब्बी त्याचे निकट आमची गरीबी कायम राहून, वैगुण्याचा दोष न येता त्रिवर्गांचे मनात आमची गरीबी वागली म्हणजे लक्ष या गोष्टीस मिळोन मुस्तकीम होऊन लोभ ठेवावा. श्रीमताचे पाया-पाशीं राहिलों असता आपल्यास अनकूल तेच घडेल. वाया जाणार नाहीं. " असे भावीं बोलणें होऊन नारो गणेश याजला श्रीमताची आज्ञा देऊन बिदा केलें.

( ४४ ) इंदुरीं आल्यावर श्रीमती व सुभेदार याची भेट घेऊन, झालें वर्तमान श्रवणारूढ करून शेवटीं ही गोष्ट सागितली. ऐकोन घेऊन ( बाईसाहेबांच्या ) चित्ताचा विक्षेप बहुत जाहला. " अद्यापीहि हिंगली न वाफेली इतकियातच न पुसता कारभार करूं लागले उत्तम आहे. ज्या समयीं आम्हावर वक्त कैलास-वासी वडिलानीं माणसे करून ठेवलीं होतीं त्यानीं तर खटलीं पाहिलीं. तुम्हीं

---

(४३) **आमचे ऐश्वर्य लोभ ठेवावा** – या वाक्याची कर्ता, कर्म, क्रियापद अशी फोड करणें कठीण आहे. भावार्थ असा कीं, आम्ही श्रीमतापाशी राहिलो म्हणजे आम्हाला मिळावयाचें तें ऐश्वर्य मिळून चुकेल, तुम्ही धन्याजवळ म्हणजे तुकोजी होळकराजवळ राहिलात म्हणजे त्यांचा कारभार उत्तम चालेल व तुमचेहि उर्जित व्हावयाचें तें होईल. आणि आमची गरीबी म्हणजे सचोटी किंवा एकनिष्ठता होळकरांच्या दौलतीशीं कशी कायम आहे ते होळकरांस तुम्ही समजवाल. एकन्दरीत पेशवे, तुकोजी होळकर व तुम्ही अशा तिघानाहि माझी एकनिष्ठता कळेल. **मुरब्बी** – कर्ते, मुत्सद्दी, हुशार. **वैगुण्य** – अपमान, दुर्लौकिक. **मुस्तकीम** – बळकट, पक्का.

(४४) **हिंगली न वाफेली** – कशास कांहीं ठिकाण नाहीं अशी स्थिति. **वख्त** – कठीण प्रसग. **माणसे करून ठेवली होतीं** – विश्वासाचे नोकर सग्रह करून राखले होते. **खटलीं पाहिलीं** – 'खटलीं पाडलीं' असें पाहिजे. खटलीं उपस्थित केलीं. भानगडी उपस्थित केल्या. अहिल्याबाईचा भावार्थ असा कीं, " नवरा खडेराव होळकर वारला. पाठोपाठ सासरा मल्हारराव होळकर तोहि वारला. आम्हावर सकट कोसळलें. कर्ता पुरुष माणूस नाहीं म्हणून होळकरी दौलतीवरती जप्त होण्याचें सकट उभें राहिलें. त्यावेळीं गगाधर यशवत चन्द्रचूडासारखा पुरातन विश्वासू म्हणून गणला गेलेला माणूस दिवाण त्यानेंच राघोबाशीं सगनमत करून भानगडी निर्माण केल्या !"

आमचे ममतेंतील खासगींचे कारकून. परंतु गुणदोष तुम्हांस समजले असतां आपले बचावास्तव मनचे मनांत ठेवून राहिला. ते समयीं शिवबा बाजी व राजाराम यांनीं जीव झोकून बुद्धिवाद सांगितला. त्याजवर हा दिवस ईश्वरें दाखवून तुम्हांस संस्थान प्राप्त आलें. या गोष्टी तुम्हांस ठाऊक असतां मनोभंगास आमचे आज्ञेचाही आक्षेप घेण्याचाहि संकोच पडला नाहीं. याजवरून पुढें तुमचे हातून दौलतींतील माणसें ओळखून आपसात किलाफ न वाढविता दौलतीचा जलूष राखाल यांतील निदर्शन या करण्यातच ध्यानास आलें." अशा भावीं दोष पदरीं घालून मनांत मशारनिल्हेविशीं किलाफाचें बीजारोपण जहालें. पुढें हिंदुस्थानांत फौजा जाव्या सबब रावसाहेब यानीं रामचंद्र गणेश सुभे व विसाजीपंत बिनीवाले कारभारी नेमून देऊन फौजा रवाना केल्या. आणखी शिंदे होळकर याजला तैनातीस रहावयाविशीं आज्ञापत्रें दिलीं. इंदूर उज्जनीचे मैदानात फौज आल्यावर उभयता सरदारानीं सामल व्हावें. त्यात महादजी शिंदे सामल होऊन श्रीमंतांकडील सरदार व शिंदे दरकूच करून पुढें गेले. तुकोजी होळकर इंदूर मुक्कामीं असतां बाईसाहेबाचे मनात विकल्प मोठा आला कारण दौलत ईश्वरइच्छेनें आपले हातें दुसऱ्याचे घरात घातली, तथापि कारभारी माझा कारकून केला कीं पांच विस्वे तरी त्याचें मन मजकडे ओढेल. म्हणून हा बेत केला. त्यानें वस्त्रें घेताच चाचणुक दाखविली. तेव्हा दौलतीचा आमचा संबध अर्थात राहिला नाहीं. इतःपर सर्व ईश्वरानें सोडविलेंच आहे. तत्पक्षीं महेश्वर नर्मदातटाक पुण्य क्षेत्र आहे तेथें स्नान संध्या करून सार्थकाचा विचार करावा (हा) अमुचा मनोधर्म. दौलत तुमचे

(४४) **गुणदोष** – गंगाधर यशवन्ताच्या कारस्थानाची बातमी **जीव झोकून** – जीवावर उदार होऊन, प्राणांतार्चे पारिपत्य मिळण्याचा धोका होता, तोहि पत्करून. **तुम्हास संस्थान प्राप्त झाले** – तुम्हांस तुकोजीची म्हणजे होळकरी दौलतीची दिवाणगिरी मिळाली **मनोभंगास** – आमचा मनोभंग करण्यास. मनोभंग म्हणजे अपमान, अवज्ञा. **संकोच पडला नाहीं** – अपेक्षा किंवा जरूरी वाटली नाहीं. अहिल्याबाईचा भावार्थ असा "तुकोजीची दिवाणगिरी स्वीकारताना शोभेकरतां कां होईना पण आमची म्हणजे माझी आज्ञा म्हणजे परवानगी घेण्याचा लौकिक उपचार तुम्ही करावा तोहि तुम्ही केला नाहीं त्यामुळें तुम्ही माझ्या मनोभंगास म्हणजे अपमानास कारण झाला." **जलुष** – आब, जरब. **किलाफ** – किलमिष, वाकुडपणा. **सुभे** – सुभेदार, मुख्य सरसेनापति. **तैनातीस** – मदतीस. **विस्वा** – टक्याचा विसावा हिस्सा. **पांचविस्वे** – कांहीं टक्यांनीं, थोडासा. **चांचणूक** – चुणूक. **सार्थकाचा** – देह सार्थकाचा.

स्वाधीनच केली आहे. वडिलांचा लौकीक संरक्षण (करून) यजमान (व) श्रीमंत यांच्या लोभाचा ओघ शुष्क न पडे यास जपावें. आमचा परामर्ष कराल न कराल याचें चेष्टित दिसतच आहे." हीं अक्षरें तुकोजी होळकर सुभेदार यांनीं श्रवण करून आपले गालांत मारून कंपित होऊन बळकट बाईसाहेबांचे पाय धरिले. उत्तर केलें कीं "महाराज कैलासवासी सुभेदार असता भाऊबदकी एकीकडे ठेवून गुलामखाजादानांत या वृत्तीनें हुकूम बजावीत आलों. त्याचें कूर्मदृष्टीचें हें फळ ! तथापि सुभेदारहि हरएक विषयीं आपले भरंसियावर निश्चित होते. प्रसंगीं सुभेदारांचे आशीर्वादाचा अनुषंग पाहून मजला माणूस केलें. तेव्हां माझे सुभेदार व मातुश्री प्रत्यक्ष आपणच आहांत. दौलत प्रकरणीं राजकारण व श्रीमंतांचें लक्ष संपादणें यांतील राखणें जोखणें कारभारी यान्या विचारें करणें प्राप्त. परतु आपले चरणाशीं प्रतरणेचा विचार साक्षात् आपला मार्तंड येऊन बोलला असतांहि पायाशीं अंतर होणार नाहीं, (मग) प्राण जावो कीं राहो. ही गोष्ट महाराजानीं खचित मनात वागवून कूर्मदृष्टी ठेवावी. यांत दौलतीचें व माझें कल्याण." या भावीं बहुत खात्री केली. मग मातुश्री साहिबांचे मनात वागून उत्तर केलें कीं, "बोलण्यांत अर्थ नाहीं, दिसण्यात येईल ते खरें. बोलण्याप्रमाणें चालणें जाहलें असता ईश्वर

(४४) चेष्टीत – वर्तणूक आपले गालात मारून – आपल्या थोबाडींत मारून घेऊन. गुलामखाजादा – गुलाम खानजादा. गुलाम – दास. खानजादा – खानाजाद–दासीपुत्र. या वृत्तीनें – जणू कांहीं आपण गुलाम आहोत, खानाजाद आहो, आपणास काहीं हक नाहींत, फक्त धन्याची नोकरी हुकुमाप्रमाणें बजावणें हेंच आपलें इतिकर्तव्य अशा भावनेनें वागलो. त्याचें कूर्मदृष्टीचें हे फळ – "मल्हारराव होळकर मजवर कृपा करीत आले. परतु आता तुम्ही मला धिक्कारून बोलता !" कूर्मदृष्टी – कासव आपल्या पिलाला अगावर पाजीत नाहीं. अंगावर न पिताच कासवाचें पिलू मोठें होतें यावरून अशी समज रूढ आहे कीं, कासव आपल्या पिलाकडे सारखे वात्सल्य दृष्टीनें बघतें, आणि तेवढ्यानेंच त्या पिलाचें पोषण होतें. प्रसंगीं – सकट पडले तेव्हा, दौलत जप्त होण्याचा प्रसग उभा राहिला तेव्हां. अनुषग – सगती, ससर्ग, सख्य, निकट समागम, सबंध. माणूस केलें – भाग्यास आणले, पदवीप्रत पोहचविले. प्रसगीं सुभेदाराचे...माणूस केलें – तुम्हीच सुभेदाराची मजवर फार कृपा होती हे पाहून मला होळकरांची सरदारी बहाल करविलीत. सुभेदार – मल्हारराव होळकर. श्रीमताचें लक्ष संपादणें – पेशव्याची मर्जी, कृपा राखणें. राखणें जोखणें – कामगिरी, कारवाई. मनांत वागून – मनांत येऊन.

उपेक्षा करीत नाहीं " असें बोलणें मातुश्रीचें महेश्वरीं होऊन देशींचे महाल व माळव्यांतील महाल दरोबस्त यांची देखरेख मातुश्री साहेबांकडे ठेवून कारभारास नारो गणेश याचे भाचे मुकुंदराव हरी यांची योजना होऊन, मगारनिल्हेचें अल्प वय तेव्हां तोडजोडीचें माणूस कृष्णाजी मल्हार पारनेरकर, बुळे याचे सरदारीचे दिवाण, यांजकडे सोंप केली.

( ४५ ) नतर मातुश्रीसाहेबाची आज्ञा घेऊन हिंदुस्थानांत रवाना जाहले. अगोदर रामचंद्र गणेश व शिंदे आले होते. यांनीं सुभेदार यांचे इतल्याशिवाय बादशहा उठवून बसविला होता. खंडणी घेतली होती. हें राजकारण करून जाबताखान रोहिला फत्तरगडवाला याचे राजकारणास्तव दिल्ली सोडून अतरवेद उतरले होते. सुभेदार यानीं मागाहून येऊन पुनः बादशहाचें उत्थापन करून चार रुपये आणखी घेऊन स्थापना केली. ही गोष्ट शिंदे व रामचद्र गणेश यांजला वैषम्य वाटून शिंदे रुसून पचवीस कोस माघारे आले. मग पांडुरग शकर व पाडुरंग रणसोड पारनेरकर यांजकडील सरदारी तुकोजीबावाकडे होती त्या वेळेचे दिवाण फडणीस, यांजला पाठवून समजाऊन आणिलें. नंतर त्रिवर्ग सरदार एकत्र होऊन जाबताखान रोहिला याचे राजकारणास लागले. तेथें सुभेदाराकडील कारभारी यांनीं जाब केला कीं, " जाबताखानाचा व कैलासवासी सुभेदारांचा भाऊपणा, त्याजला आम्हीं पत्र लिहून वकील आणवितों. जाबसाल करार ठरण्यांत आल्यास उत्तमच. न आल्यास पारपत्य करूं." असें बोलून पत्रें रवाना केली. तेथून बक्षी पन्नास हजार फौजेनिशीं जाबसालास आला. त्यांशीं तुकोजी होळकर याचा करार कीं, "तुमचे आमचे बोलण्यात तह ठरला असतां नीटच आहे. न ठरल्यास आम्ही ताबेदार, माफक हुकूम नोकरी बजावणें प्राप्त, याबाबद तुमचा आमचा करार भागीर्थीपार तुम्हास तुमचे मुलखात करून देऊन आम्हीच तुम्हास लुटून घेऊं. हें बोलणें तुम्हांस कबूल आसल्यास यावें." तेव्हां तो यवन चढावर, त्याचे खातरेंत ही फौज नाहीं. पन्नास हजार फौजेनिशीं बक्षी पाठवितों, तसेंच काम पडल्यास बक्षी त्यासी पुरा पाडील, असा स्तोम बाळगून वकील बक्षीचा पाठविला. त्याची फौज गंगापार राहून पांचशें स्वारांनिशीं इकडे बोलावयास आला. तो

(४४) **तोडजोडीचें माणूस** – तोडजोड करण्यास लायक असा अनुभवी माणूस. **सोंप केली** – सोपविलें.

( ४५ ) **इतल्याशिवाय** – अनुज्ञेशिवाय, अनुमतीशिवाय. **माफक हुकूम**– हुकमाप्रमाणें, हुकूममाफक. **चढ** – गर्व. **त्यासी पुरी पाडील** – त्यांस पुरून उरेल. **स्तोम** – गर्व.

होळकरांचें फौजेशेजारीं उतरला. पांच चार दिवस बोलणें जाहलें. परंतु शिंदे व रामचंद्र गणेश यांचे मनात पाप कीं, बादशाईचे इतिकर्तव्यतेस बाध पडून आपलें करणें व्यर्थ केलें. तेव्हां या जाबसालांत होळकरास फिकें पाडावें, अशा संधानावर त्यांची दृष्टी. तेव्हा बोलण्याचालण्यात रस न पडता वकिलास लुटून घ्यावें असें मनांत पाप आणिलें. हें वृत्त सुभेदारांस समजताच यांजकडील कारभारी यांनीं सारे दरबार ( मध्यें ) जाब केला कीं, " आमचे वचनावर वकील आला आहे. जाब ठेवणें अथवा बिघाड करणें हें तुम्हीं श्रीमंतांचें मुखत्यार तेव्हां तुमचे तुम्हाकडे. परंतु वकिलास कोणीही लुटलें नाहीं. तुम्ही अशाच विचारास प्रवर्तक जाल्यास आम्ही ताबेदार, परंतु आम्हांकडून वकिलास आणविलें. ते पक्षीं आम्हीं वकिलास गंगापार त्याचें फौजेंत दाखल करून मग हुकूम कराल तर आम्हीच लुटून घेऊं." तेव्हा रामचद्र गणेश यानीं उत्तर केलें कीं, " उत्तम आहे. तुम्ही वकिलास गगेपार त्याचे फौजेंत प्रविष्ट करून तुम्ही लुटून घ्यावें. " याप्रमाणें उत्तर केल्यावर कारभारी डेऱ्यास येऊन सुभेदारास वर्तमान सागितले. सुभेदारानीं वकिलास बोलावून वर्तमान जाहीर केलें. त्यांनींही उत्तर केलें कीं, आम्हास गगेपार आमचे फौजेंत पावतें करावें. नंतर आम्हीं खुदाचे हीबसात नाहीं. मग ते समयीं त्यांची तयारी करून आपली पाच हजार फौज बरोबर देऊन गंगेपार उतरून दिले. दुसरे दिवशीं सुभेदार जातीनिशीं तयार होऊन गंगापार उतरले. बक्षीशीं तिसरें दिवशीं गांठ घालून लढाई फार मातबर झाली बक्षीचें डोकें कापून आणून फौज बरबाद केली. शिंदे, रामचद्र गणेश यानीं कुमक केली नाहीं. बक्षी बुडविला हें वर्तमान जाबतेखानास समजल्यावर साठ हजार फौज व तीनशें तोफा घेऊन सुभेदाराचे मुकाबल्यास आला. गाठ घालून लढाई सुरू झाली. तीनशें तोफ एक समय दीन चालती केली. त्याच्या तोफा, य चे जबुरे, परस्परें मार चालला. त्याचे

(४५) **बादशाईचे इतिकर्तव्यतेस बाध पडून** – बादशहाबाबत आपण ठरवलेल्या योजनेस किंवा कारस्थानास बाधा पडून. **फिकें पाडणें** – फशी पाडणें, गोता देणे, महत्त्वशून्य करणें. **रस पडणे** – एकवाक्यता होणें. **सारे दरबार** – सेर दरबार असे पाहिजे. **सेर दरबार** – शेर दरबार, भरदरबार. **जाब ठेवणे**– तहाचीं बोलणीं चालू ठेवणें. **करू** – करून. **हीबसात** – ' हीसाबात ' असें मुळांत असावें. **हीसाबात** – हिशोबांत. हिसाबांत नाहीं म्हणजे चिंता नाहीं. पर्वा नाहीं. **बरबाद** – नष्ट. **दीन चालती केली** – दीन दीन अशी रणगर्जना करीत. **दीन** – ही मुसलमानी युद्धगर्जना आहे. दणक्यानें चालू केली असाहि अर्थ होऊं शकेल. **जबुरा** – लहान तोफ.

फौजेचा मार लागूं न होतां जंबुऱ्याचें मारानें रोहिल्यांची फौज फिरून दिली. असें चिन्ह सुभेदारांनीं पहातांच घोडे घालावें असा मनसुबा करून पेंढारी मागें घालून मुकाबला. .. . .. .... .... .... . . ....

. .. . . .... .... .. . .... ... .... . . . ....

( ४६ ) मुकाबल्यास तुकोजी होळकर सुभेदार यानीं हल्ला केला. मागाहून पेंढारी याची लाडगेतोड बरीच झाली. दुतर्फा शह पाडून रोहिले कुल बरबाद केले. हें वर्तमान शिंदे, रामचद्र गणेश यास समजताच, कूच करून, गंगा उतरून सुभेदारास सामील झाले. त्रिवर्ग एकत्र होऊन पथरगडास येऊन मोर्चे लाऊन किल्ल्यावर हल्ला केला. बायकापोरें धरून दरोबस्त लुटलीं. मलकाजमानीचे अन्वयें पेंढारी यानीं बायकास उपद्रव केले. दौलत बहुत निघाली. पुनः माघारी फिरले. दिल्लीवरून जाटावर यावयाचा हेत. या मसलतीस अग्रेसर तुकोजीराव होळकर. शिंदे व विसाजीपंत याचे सकोचार्थ सामील खरे, परतु मनातील धर्म, कोणेही मसलतींत होळकरास तोंडघशीं पाडून आपलें वर्चस्व होऊन, श्रीमंत माधवरावसाहेब यास समजावें हा इरादा. गंगापारीहून पथरगडचे मसलतीचा समारोप करून, दिल्ली डावी सोडून, अरण्यातून शेखावटींत आले. तेथोन पुढें जाटावर चाल करावी येविषयीं आग्रह. निकड होळकराची. उभयतां बाह्यात्कारें सामेल. झुकवीत झुकवीत हिंडोन बयाणामध्यें मुक्काम केला. तेथोन भरतपूर १२ कोस, दीग १८ कोस. सुभेदाराच्या बोलण्यास रुकार मात्र, परंतु कूच करण्यास अनेक पर्याय दाखवूं लागले. तेव्हा एके दिवशीं रात्रीं सुभेदार रात्रौ भोजन करून गादीवर हुक्का ओढीत होते. चित्तात बहुत उदासी आली कीं, जटाचा रुवाब भारी. हे मोकाबल्यास आले जाणून जाट नवलसिंग ८०,००० स्वार, १२०० तोफा चालू,

(४५) फिरून दिली – फिरून टाकली. मार सहन न होऊन रोहिल्यांच्या फौजेनें पाठ दिली. पळू लागले.

(४६) कुल – झाडून सर्व. बरबाद – नष्ट. मलकाजमानीचें अन्वयें इ० – मलकाजमानी जवळ पुष्कळ पैका असावा अशा समजुतीनें पेंढाऱ्यांनीं बायकांसहि द्रव्याकरितां फार छळले. अपेक्षेप्रमाणें दौलत म्हणजे पैका खूपच मिळाला. हेत – हेतू, इरादा. याचे संकोचार्थ – यांच्या भिडेमुळें. यांचे – तुकोजी होळकराचे. निकड – आग्रह, ईर्षा. पर्याय – सबबी, अडचणी. रुवाब – रुबाब, जोरा, करचष्मा, सैन्यसामान. समरूचीं पलटणें – बेगम समरूचीं पलटणें. मनांतील धर्म – अंतस्थ हेतू. उदासी – उदासीनता किंवा खिन्नता. चालू – शोभेच्या नव्हेत तर प्रत्यक्ष लढाईंत उत्तम काम देतील अशा, तरतुदीत राखलेल्या.

लाख पायदळ, शिवाय समरूची पलटणें ४, या सरंजामानिशीं दीग पाठीमागें १ कोस टाकून, पुढें यांचे फौजेवर रुख दिला. सोबत्याचे मनांतील धर्म उघडाच दिसतो. आपले जातीचा अजमास पाहतां, पंधरा हजार इतलाखी शिलेदार, पांच हजार सरंजामी व पांच हजार पागा व पंचवीस हजार पेंढारी एकोण पन्नास हजारांची जड. ईश्वर मार्तंड प्रांत कसा लावील असी मनांत व्यावृत्ती. तितक्यांत कांहीं डोळाही लागला. इतक्यांत साक्षात् मार्तंड, निळा घोडा, पाढरा पोशाख, खांद्यावर भाला, गळ्यांत गाठाळा, पाठीं भडार ( असा ) समोर येऊन बोलला कीं, " धनगरा ऊठ. आठ अक्षरीं मत्राचा जप कां करतोस ? मी पुढें चाललों. तू मागें कूच करून जलद ये." इतकीं अक्षेरें श्रवण करून जागे होतात, ( तोंच ) स्वार गेला असा भास झाला. तों इतक्यात नगारखान्याचा जमादार येऊन विनति केली कीं, " चौघडा अखेर होऊन दोन घटका झाल्या, मी माणसासुद्धा सामसूम निजलों. पहारेवाला बसला होता. तीन डके नौबतीवर गैबी झाले. कानावर घालावयास आलों. " हें श्रवण करून शरीरात हिंमत येऊन, उपाध्यायास बोलावून नौबदीची पूजा करून, कोणास न पुसता कूच केला. दीडा प्रहराचे आंत जाटाचा यांचा मुकाबला चौ कोसांचा राहिला यानीं मुक्काम जमवून, गोविंदराव बुळे यांचें पथक छबिन्यास उभें करून, सुभेदार स्थळ करून भोजन करून, पलंगावर आंग टाकिलें, तो छबिन्यातून साडणीस्वार आला कीं, जाट येऊन पोंचला. आमची व त्याची

---

(४६) **रुख** – रोख. **सोबती** – शिंदे. **मनातील धर्म** – अन्तस्थ हेतु. **जातीचे** – जमावाचे, सैन्याचें. **अंगठाण** – मोजमाप, अदमास **इतलाखी शिलेदार** – पगारी शिलेदार. **जड** – जमाव. **प्रात** – शेवट. **व्यावृत्ति** – चिंता. **गाठाळा** – खंडोबाच्या भक्ताच्या गळ्यातील रुप्याची हांसळी किंवा कडें असतें त्यास गाठा किंवा गाठाळा म्हणतात. **पाठीं भंडार** – पाठीवर किंवा खाकेत. भडार म्हणजे हळद भरलेली पिशवी. **आठ अक्षरी मंत्र** – " कसें करू काय करू " हा. **चौघडा अखेर होणे** – तळावरून सैन्याचें कूच व्हावयाचे असे त्यावेळीं तीनदा नगारा वाजवून इशारा देण्यांत येण्याची पद्धति होती. तिसऱ्या म्हणजे अखेरच्या नगाऱ्यानतर तळावर कोणीहि राहाता कामा नये अशी मराठी लष्कराची शिस्त असे. **तीन डंके नौबदीवर गैबी झाले** – तीनदा नौबत वाजली. मात्र नौबती किंवा ते वाजविणारे कोणीच दिसले नाहींत ! **गैबी** – गुप्त. **मुकाबला** – मुफासला असावे. फासला,-अन्तर. **मुक्काम जमविणें** – लष्कराच्या तळाची आखणी करणें, व्यूह रचना ठरविणें. **छबिना** – लष्कराच्या तळापुढें शत्रूच्या बातमीसाठीं फिरती ठेवलेली रखवालीची टोळी. **स्थळ करणें** – मुक्काम करणें.

गोळागोळी होती. तों सुभेदारांनीं नारो गणेश यांजला सांगून पाठविलें कीं, फौज तयार करून मुकाबल्यास जाणें. हुकूम येतांच नानांनीं फौजेस ताकीद करून घोड्यावर बसून ढालेपाशीं गेले. फौजही कट्टी होती. मानाजी फाकडे व भगवंतराव कदम, खंडोजी भोयटे व यशवतराव चव्हाण, दोन महिने अगोदर तलब चुकऊन घेऊन, शिंद्याचे जवळ चाकरीस राहिले होते. हे कूच करून पुढें आले तेव्हां तेही यांचेबरोबर कूच करून आले ४०० स्वारांचें पथक. धनगर उद्यां म्हणेल, पैका खाऊन समयास . दाखविली. याकरिता विना बोलावण्यावांचून सामील झाले. शिलेदार घेऊन नाना पुढें चालले. तो छबिन्यातून साडणीस्वार दुसरा आला कीं, स्वारी लवकर यावी. आमचे पाय टिकत नाहींत. तेव्हा सुभेदार उठून, शौचाहून जाऊन येऊन, हत्तींवर बसून ढालेपाशीं गेले. रखमाबाईसाहेब बरोबर होतीं. त्यानीं विनोदाने भाषण केलें कीं, "मी शेणगोळा करून ठेवितें." सुभेदार स्वार होऊन पुढें झाले भिवाजी रणसोड राहूरकर पागनीस हे पाच चार हजार हुजुरात तयार करून हत्तीपाशीं आले. सुभेदारानीं हत्ती बसवून आपल्या भंडारींतील भडार भिवाजीपंत नाना याच्या कपाळीं लाविला, आणि बोलले कीं, "झाल्या गोष्टीची उजळणी आज करून दाखवावी" हें उत्तर न करितां पुढें चालले. सुभेदारांच्या बोलण्यातील तात्पर्य, नारो गणेशाशीं व राहूरकराशीं काहीं चुरसाचुरस झाली होती. त्याप्रसगीं भगवतराव कदम व मानाजी फाकडे यांनीं राहूरकराचा पक्ष करून वर्चस्व ठेविलें. असले किरकोळ किस्त्याचा बयाण फार होतो. श्रवण करणार चित्त पुरवून पुसल्यास सागावयास येतील त्या दिवसापासून उभयता सरदार व राहूरकर याचा संकेत होता कीं, जाटाचे लढाईचे प्रसगीं

---

(४६) होती – होत आहे. ढाल – सैन्यातील मुख्य झेंड्याचे निशाण. कट्टी – निवडक. तलब चुकवून घेणे – पगाराची बाकी पदरात पाडून घेणें. समयास ** दाखविली – ऐन वेळीं दगा केला. कुचराई केली. पाय टिकत नाहींत – आमच्यानें शत्रू थोपविला जात नाहीं. शेणगोळा करून ठेवते – अनिष्ट निरसनार्थ एक तोडगा ! भंडारी – भडार ठेवण्याची पोतडी. उजळणी करून दाखविणें – उत्तीर्णता करून दाखविणे, बोलल्याप्रमाणें करून दाखविणें, सूड घेणें. चुरसाचुरस – चुरस, स्पर्धा, बोलाचाली. पक्ष करणें – पक्ष धरणें, बाजू घेणें. किस्त – भानगड. बयाण – विस्तार. असले किरकोळ किस्त्यांचा बयाण फार होतो. श्रवण करणार चित्त पुरवून पुसल्यास सांगावयास येतील – असल्या बारिक गोष्टी तपशीलवार सांगणे तर फार बयाण म्हणजे विस्तार होईल. परतु श्रोत्यांनाच जिज्ञासा असल्यास त्याही सांगता येतील.

दोन्ही गोषावर तुम्हीं उभयतांनीं असावें. मध्यवर्ती हुजरांत. हुजरातीचें निशाण उठलें म्हणजे तुम्हीं बेलाशक उठावें. त्यावर उभयतां सरदार गोषावर होतेच. हुजरात जाऊन मधीं उभी राहिली. जाटाकडील तोफखान्याचा मार अनिवार' फौज थिजून गेली. तेव्हां नारो गणेश यांनीं सांडणीस्वारासमागमें चिठी भिवबा नानाकडे पाठविली कीं, " दिवस चार घटका राहिला. या समयीं व्यर्थ मार खाऊन घोडें माणूस जाया करावें, हें ठीक नाहीं. या वेळेस टाळा द्यावा. सकाळीं पाहून घेऊ. " तेव्हा नानानीं उत्तर केलें, जबानी सागितलें कीं, " आम्हास फार दिवस वाचावयाचे नाहीं. आपण यजमानापाशीं उभे राहून तमाशा पाहावा. " असें सागून पाठवून सांडणीस्वारानें तोंड फिरवताच हुजरातीचें निशाण उठले. हें कदम फाकडे यानीं पाहून, हजार हजार स्वाराचे सरदार त्यानींही घोड्याच्या अनिनी उचलल्या. ते समयी, गोलंदाज तोफ भरूं लागले नाहींत, तो बासडे सही केले. तोफा मागें टाकून पायदळ कडब्यासह कापलें गेलें. हुजरात व कदम फांकडे याचें हत्यार लागू झाल्यावर तमाम फौज उठली. पायदळाचें बींबूड करून स्वारात शिरलें. तों रागडे स्वार घोडयाचें वेठण कमी, यामुळें बाजूनें पेंढारी व समोर फौज. जाटांची स्वार सरजाम जमू न शकता प्रायशः मारले फार गेले. काहीं जीव घेऊन पळालेही असतील. याप्रमाणें जाटाची ताराबळ करून, जाट जातीनें विवस्त्र होऊन, गोपीनाथ घुले मथुरेकर महाराष्ट्र भिक्षुक उभयता घोडयाचे रथात होते. ते पेंढाऱ्यानीं विवस्त्र करून, खास जाट हा हें त्यास न समजल्यामुळें

(४६) गोषा – बाजू ? टोंक ? उठणे – हल्ला करून जाणें. फौज थिजून गेली – फौज म्हणजे घोडदळ. तोफांच्या मारामुळें घोडदळास पुढे घुसणें अशक्य झालें. टाळा देणे – आग काढून घेणें, पळून जाणें. जबानी – तोंडानें, लेखी नव्हे. नारो गणेशाने भिवबा नानाकडे लेखी चिठी पाठविली होती परतु त्याने लेखी उत्तर न देतां जबानीनेंच कळविलें. तमाशा – पराक्रम. हुजरातीचे निशाण उठले – हुजरात पथकानें चालून घेतलें. अनीन उचलणे – घोडयांनीं दवडावे म्हणून त्याना लगामाचा इशारा करणें. तों बासडे सही केले – गोलदाजांना तोफा भरू देण्याचा अवकाश न देतां त्यांस शिलेदारानी आपल्या भाल्यांनीं ठार केले. बासडा – भाला. सही करणें – जिंकणें, काबीज करणे. कडब्यासह – कडब्यासारखें. बींबूड – निकाल, नष्टाश, सपूर्ण कत्तल. रांगडे स्वार घोडयाचें वेठण कमी – रागडे स्वारांजवळ घोडयावर बसण्याचें कौशल्य किंवा कसब मराठे शिलेदारासारखे नव्हते. वेठण – कसब, कौशल्य. घोडयावरील मांड. जाटांची स्वार – मूळ पाठ ' जाटांचा ' असा असला पाहिजे.

झेंडी उडत डिगेंत शिरले. लढाई फत्ते झाली. ४ पलटणें समरूचीं ते लढाईचे अवलपासून तुटून किल्ला बांधून होती. त्यावर कोणी जाटाचा माणूस गेलाही नाहीं. पेंढारी याचे स्वार गेले आले, त्याजवर गोळा टाकून जवळ फिरकूं न दिले. किल्ला बांधून शाबुतीनें आपले ठिकाणास गेले. बाकी सरंजाम तरबितर करून, चारी प्रहर रात्र बेटांत उभे राहून सूर्योदयीं मुक्कामास आले. लढाई लागली हें वर्तमान विसाजीपंत व शिंदे यांस कळताच, येऊन सामील झाले. होळकराची फौज मरीमान्यांत. शिंद्यांनीं लूट मनस्वी केली. श्रीमंताकडील विसाजीपंताचे फौजेपैकीं जंबुऱ्याचा मार काहीं उपयोगी पडला. एवंच दोन्ही फौजेनीं लूट केली. लडाई होळकरानीं मारली. दुसरे दिवशीं सुभेदार तुकोजी होळकर यांनीं शिंदे, विसाजीपंत व आपले फौजेंत रूरयात न ठेविता, तिन्ही लष्करची लूट जबरदस्तीनें एकत्र करून बरहुकूम हिस्सा वादून दिली.

( ४७ ) इकडे देशीं माधवरावसाहेब याजला राजयक्ष्म्याचा उपद्रव होऊन त्याचा काल झाला. हें वर्तमान समजताच, फौज माघारा फिरोन, जाटापासून चार हजार रुपये घेऊन पूर्वस्नेह कायम करून सुभेदार इंदुरास आले. शिंदे उज्जयनीस, विसाजी कृष्ण देशीं गेले. शिंदे-होळकर यानीं फौजेची समजावीस करण्यास आरंभ केला. राडा बहुत पडला गंगाधर तात्याची हतोटी थोडक्यात माणसाची समजूत ठेऊन माणूस हमराहा ठेवावे. हें करणें नारो गणेश याजपाशीं कमी. याकरितां राडा पडोन राणोजी शिंदे चोंडीकर, बाईसाहेबाचे भाचे, पाचशें स्वारांचें पथक शूरत्वानें व

---

(४६) **शेंडी उडत डिगेत शिरले** – निशाण पुढें धावत असता त्याच्या काठीची पताका मागें फडकत राहते. जाट व गोपीनाथ बुले हे जीव घेऊन पळून जात असता त्याच्या शेंडया वाऱ्यावर मागें उडलेल्या दिसत होत्या. **ते** – तीं, तीं चार पलटणें. **अवलपासून** – प्रारभापासून. **तुटून** – अलग अशी. **किल्ला बांधणे** – आवळून शिस्तीनें गोल बांधून उभे राहणें. **फरकूं देणे** – फिरकू देणें. **फरकूं न दिलें** – फिरकूं दिलें नाहीं. **शाबुतीनें** – शाबूत राहून, नुकसानी होऊ न देता. **तरबितर** – तारबितार. **तरबितर करून** – उध्वस्त करून किंवा दाणादाण करून. **मरीमान्यांत** – जीवावरच्या सकटात. भावार्थ होळकरांच्या फौजेनें एकटीनें जीव धोक्यात घालून लढाई केली. शिंद्यांच्या फौजेनें लढाईनतर लूट तेवढी केली. **जंबुरा** – उटावरील तोफ. **रूरयात** – भीडभाड, सकोच. **बरहुकूमहिस्सा** – ठरलेल्या हिश्शाप्रमाणें, हिश्शाबरहुकूम.

(४७) **राजयक्ष्मा** – क्षय. **राडा** – भानगड, तटा, बखेडा, त्रास. **हमराहा** – सतुष्ट, स्नेहांकित.

काहीं मातुश्रीसाहेबाचे हिमायतीनें, नारोपंत नानाची अपेक्षा फार करून तोंडाचा मागितला रुपया घेऊन, सुभेदारास रामराम करून, बाईसाहेब इंदुरास समजाविशीचे बंदोबस्ताकरितां आली होती, त्याजलाही रामराम करावयास गेले. तों बाईसाहेबांनीं सांगून पाठविलें कीं, "असा मळईखोर आहेस, तर मला तोंड दाखवूं नको." तेव्हा राणूजी शिंदे यांनीं विनती सागून पाठविली कीं, "धनगराचेच घरावर ईश्वर सुवर्णाचा पाऊस पाडतो, आणि इतर सरदार मेले असें नाहीं. तुझे आशीर्वादेंकरून चाकरी मिळवितों कीं, तें पहावें. ध्यानास येईल." असें बोलून, जबाब देऊन, नागपूर प्रात वऱ्हाड भोंसल्याचे घरीं चाकरीस राहिले. सदतीस वर्षें चाकरी केली. इकडे कोणाचें तोंड पाहिलें नाहीं. पाच चार वर्षांनीं काळ होईल तेव्हा बाईसाहेबानीं पत्रे पाठऊन बोलावून आणिलें. निंबहेडा महालपैकीं निमे जागा राणीपुरा जहागीर देऊन जहागीरदार केले.

( ४८ ) इकडे माधवरावसाहेबाचा काळ झाल्यावर नारायणराव गादीवर बसले. दादासाहेब कैदेंत होते सखारामबापू व मोरोबा फडणीस, थोडेबहुत आनंदीबाई याचा विचार एक होऊन, नारायणराव यांचा आठवे महिन्यात प्राण घेतला. हें वर्तमान समजताच शिंदे, होळकर काहीं फौज पागा सरजाम घेऊन पुण्यास दाखल जाले. दादासाहेब यानीं कर्मांतर करून साताऱ्यास जाऊन राजाचीं वस्त्रें घेतलीं. तो नारायणरावसाहेब याचे कुटुंब पुरंदरास, दो महिन्याचा गर्भ असें कारभाऱ्यास समजल्यावर, अग्रेसर बाळाजीपत नाना फडणीस, बराय मसलत बाह्यात्कारें सखारामबापू, मोरोबादादा यास घेऊन मसलत केली कीं, साहेबास पुण्याला येऊ न देता विनती करावी कीं, राजाचे शिरपाव झाले, ते पक्षीं जेजुरी, पंढरी देवदर्शन करून मग यावें. त्यांचेही मनास येऊन पुण्याकडे न येता जेजुरीस गेले. फौजेंत मुखत्यार त्रिंबकरावमामा पेठे व लिहिण्याचें कामावर हरिपंततात्या. फौजेंत

(४७) **हिमायत** – वशिला, पुष्टीबळ, पाठिंबा. **तोंडाचा मागितला रुपया घेऊन** – तोंडाला येईल तो आकडा सागून आणि तेवढा जबरदस्तीनें घेऊन. **मळईखोर** – दगेखोर. **मळई** – मलई, दगा. **धनगर** – होळकर. **मिळवितो कीं** – मिळवितो कीं नाहीं तें. **काळ होईल** – काळ होईल असें वाटलें तेव्हां, मरणकाळ जवळ आला असें वाटू लागलें तेव्हां.

(४८) **कर्मांतर** – क्रियाकर्मांतर. **राजाचीं वस्त्रे घेतलीं** – राजाकडून, छत्रपतीकडून पेशवेपदाचीं वस्त्रें घेतलीं. **बराय मसलत** – मसलतीसाठीं, मसलतीकरता. **साहेबास** – रघुनाथराव पेशवे यास. **शिरपाव** – शिरोभूषण, पेशवाईचा दरक दिल्याबद्दल. **राजाचे** – छत्रपतींचे.

हुकूम उभयतांचा. जातीचा सरंजाम साहेबांचा हजार बाराशें. जेजुरीहून पंढरीस आले. पंढरीस आल्यावर दादासाहेबांस फितूर समजला. मग आपल्या सरंजामानिशीं सावध राहूं लागले. एके दिवशीं देवदर्शनास मामा व दादासाहेब बरोबर गेले. तेथें मार्गांत हुकमें चुरसाचुरस होऊन तरवार चालविली. त्रिंबकरावमामा कामास आले. साहेब आपले सरजामानिशीं वेगळे पडून, सरकार फौजेंत हरिपंततात्यांनीं बंदोबस्त करून, पुणें मुक्कामीं नानास पत्रें लिहिलीं कीं, "येथें आपसांत तरवार चालून त्रिंबकरावमामा कामास आले. श्रीमंत आपल्या सरंजामानिशीं वेगळे राहिले. आम्हीं सरकारी फौजेचा बंदोबस्त करून मुकाबला करून आहोंत. खर्चाची मदत लवकर करावी." ऐसीं पत्रें रवाना केलीं. जो जो ही मसलत उघडीं होत चालली, तो तो बापू, मोरोबा फडणीस हे मनसब्यातून गाळीत चालले. हरिपंततात्याचे पत्र आल्यावर बापूस चिठी नानांनीं लिहिली कीं, पंढरपुरीं प्रसंग असा गुजरला. पुढें कैसें करावें ? तो अभिप्राय प्राय. ध्यानास आणून उत्तर सागून पाठविले फौजेचा बदोबस्त हरिपंततात्यांनी केला आहे. खर्चाची मदत तुम्ही करावी. हें श्रवण करून नाना प्रसन्न झाले कीं, भूतभविष्यवेत्ते हीं माणसें खरीं. मग हरिपंततात्याचे खर्चाची मदत केली. यावर हरिपंततात्या दादाचे मागें लागले. दादासाहेबाचा विचार महेश्वरास जाऊन होळकरास आपलेंसें करावें. अशा बेतानें कसरावदेवर आले तों बाईसाहेबानीं कृष्णाजी मुरार याजबरोबर फौज देऊन दादासाहेबाचे मुकाबल्यास पाठविलें. "या प्रसगीं आपलें येणें अप्रशस्त. आपण धनी. आपल्यास प्रतिकूल कोण आहे ? पण प्राप्त प्रसंगाची हवा पाहिली असता, आम्ही मारले जाऊं यास्तव आपणास नर्मदा उतरणेस सल्ला नाहीं." तेव्हा अलीमोहनचे राज्यातून महीचे सुमारें गेलें

(४९) इकडे शिंदे, होळकर पुणें मुक्कामीं आल्यावर येथें फळी होतीच. शिंदे व नाना फडणीस यांचा मेळ पडून, होळकर, सखारामबापू व मोरोबादादा यांचा मेळ पहिल्यापासून होताच. तशात तोतया भाऊसाहेब उभा राहून, डोंगर-

(४८) हुकमें — हुकूम देण्याचा अधिकार कोणाचा या मुद्यावरून. चुरसाचुरस — बोलाचाली. मुकाबला करून आहोंत — दादासाहेबांच्या फौजेवर नजर ठेऊन आहों. मसलत उघडी होत चालली — बारभाईच्या मसलतीची परिस्फुटता होऊ लागली. मनसब्यांतून गाळीत चालले — मसलतींतून अंग काढून घेऊं लागले. बाईसाहेबांनीं — अहिल्याबाईनें. हवा — रागरंग. आपणास नर्मदा उतरणें सल्ला नाहीं — आपण नर्मदा उतरणें योग्य होणार नाहीं.

(४९) फळी — पक्ष, पक्षभेद, आपसांतील फूट.

कठाडीचे किल्ले दरोबस्त घेऊन सिंहगडास येऊं लागला. तेव्हां शिंदे होळकर यांस आज्ञा झाली कीं, तुम्हीं यासी धरून आणावें. हुकूम होतांच शिंदे कूच करून गेले. होळकरास जाण्यास अनुषगावरोधेकरून अवकाश लागला. तितक्यांत शिंद्यांनीं धरून आणिला. त्याचें पारपत्य केलें. किल्ले, जागा घेतल्या होत्या, त्या खालीं करून घेतल्या. रामचंद्र नाईक परांजपे तोतया याचा पक्ष धरून खरे असें म्हणत होते, ते सरकारचोर झाले. यामुळें ते आपले ठिकाणीं साशंकित यास्तव सरकारआस, मातबर माणूस याचा आब्र घेतला असतां सरकार उपयोग ( नाहीं ) व लौकिक तादृश. दौलतींतील माणूस मात्र जाया होईल, असें जागून पुरंदरास कोणास पाठऊन त्याची दिलजमाई करून किल्याखालीं आणून पूर्ववत् व्यवसाय करून असावें असें केलें. शिंदे व नाना फडणिसाचा पेट्या एक. यांनीं मसलत करून बापू व मोरोबा व नारो गणेश, होळकराचे कारभारी, तिघांस जरब द्यावी असा व्यूह सिद्ध केला हें वर्तमान इकडे समजल्यावर मोरोबा फडणीस, नारो गणेश उभयताची मसलत होऊन बापूस इतल्ला केला. बापूनीं या मनसब्यास दूषणें लाविलीं कीं, " श्रीमताचे राज्यात फळी बांधून, धनी माथ्यावर नसतां अपस्वार्थाकरितां बखेडा करावा ही नेकसल्ला नाहीं. असेंच करणें असतें तर कंपेष वर्खाचा आरसा होता. यात यावे तर दिल्लीपावतर पुणेंपावतर वंश केला असता. परतु हे कृत्य करून हरामखोरीच्या मरातब्यास येऊन आपलें इहपरत्र

---

(४९) **अनुषंगावरोधेकरून** – अनुषग–सोबत. होळकराच्या परिवारांतील लोकांनीं त्यास अवरोध म्ह. अडथळा आणला यामुळें. भावार्थ सैनिकांनीं पगाराकरतां दगा केल्यामुळें. **खरे असे म्हणत होते** – तोतया हा खरे भाऊसाहेबच होत, असें रामचद्र नाईक पराजपे म्हणत होता. **सरकारचोर** – सरकारचे चोर, सरकारचे गुन्हेगार. **आब घेणें** – अब्रू घेणें. **लौकिक तादृष** – तूर्त लौकिक मात्र होईल. **दौलतींतील माणूस** – घरदाज, सरकार कामास उपयोगी पडण्यासारखा मातब्बर वजनदार माणूस. **पेट्या एक** – एक पेट्या, गट्टी. **इतल्ला करणे** – विचारणें, पुसणें. **या मनसब्यास दूषणे लाविली** – हा मनसबा म्हणजे मसलत योग्य नाहीं असा दोष दिला. **अपस्वार्थाकरतां** – स्वतःच्या स्वार्थाकरितां. **कंपेश वर्खाचा आरसा होता** – वर्ख म्हणजे सोनें किंवा इतर धातूचा अत्यंत पातळ पापुद्रा. सोनेरी किंवा रुपेरी मुलाम्याचाहि कागद करतात. तो अर्थातच खरा सोन्यारुप्याचा नसतो तो अत्यत चकचकीत असतो व त्यांत प्रतिबिंबहि दिसते. तथापि काचेवर लावलेल्या पाऱ्याच्या आरशांत जसें स्वरूप स्थिर व स्पष्ट दिसतें तसें त्यांत दिसू शकत नाहीं. म्हणून खऱ्या आरशाची त्याला योग्यता नाहीं. येथें अस्सल व

कीं बुडवावें ? सांप्रत आपल्यास कैद करून प्राण घेतील. यांत आपली क्रिया राहून परत्र साधन घडेल. वांचणें किती दिवस ? कोणीही अग्रेसर होऊन श्रीमंतांचे दौलतीची पैरवी बांधावी ही नेकसल्ला." असा भावी इतल्ला करून योजिला घाट मोडून टाकिला. पुढें मोरोबा फडणीस याला कैद करून नगरचे किल्ल्यावर पाठविलें. सखारामबापू यांजला कैद करून कोंकणकठाडीचे किल्ल्यावर ठेविलें. जातेसमयीं आक्षेप घेतला कीं, नानांशीं आम्ही दोन गोष्टी बोलूं, मग जाऊं. तेव्हां नानांस गाठ घालणें प्राप्त आलें. गांठ घालून बोलणें झालें कीं, "तुम्हीं हें कृत्य केलें फार चांगलें. उगाच प्राकृत संसार करण्यांत चार हुकूम असल्यास पुरी पडत नाहीं. तेव्हां ही तर दौलत. त्यांत धनी नाहीं. चार हुकूम म्हणजे दौलतीचा नाश आहे. परंतु या दौलतीचे रफीक पूर्वीपासून होळकराचे घर सांप्रत तुम्हीं सिंदीबन वाढविलें आहे. यापासूनच तुम्हास अपाय होईल. हें खचित मनांत वागवून फार जपावें. बाकी तुम्हीं विचक्षण, रजाचा गज करून दौलत नमुदास आणाल, हा मज भरंवसा. सांगितल्या गोष्टीस फार जपावें." इतकें सांगून पालखींत बसून किल्ल्यावर गेले. पुढें नारो गणेश यासी कैद करून पुरंदरावर ठेविलें, आणि होळकराची दिवाणगिरी दादाजी गंगाधर यास सांगितली. या गोष्टीस समत कांहीं बाईसाहेबांचेंही खरें. परंतु तुकोजी होळकर सुभेदार याचा व दादाजी गंगाधर याचा मेळ न पडता सुभेदारांनीं दुखणें काढलें कचेरी झालीच नाहीं. इकडे नारो गणेश यांनीं शिंद्याचें साधन करून लाख रुपये देऊन सुटका केली. नानास

(४९) नक्कल या अर्थी आरसा व वर्खं हे शब्द वापरले आहेत. सखारामबापूचें म्हणणें असें कीं राघोबा हा पेशवाईचा खरा धनी नाहीं. त्याची बाजू उचलणें म्हणजे वर्खाला आरशाची प्रतिष्ठा देणें होईल. कंपेष – या शब्दाचा अर्थ येथें सहज, विनासायास असा आहे. नेकसल्ला – योग्य विचार. मरातब – मान, पदवी. दौलतीची पैरवी बांधावी – दौलत सांवरावी. असाभावी – अशा भावीं. आक्षेप घेतला – आग्रह धरला. प्राकृत संसार – छोटासा संसार. भावार्थ छोट्यासऱ्या संसारांतहि एकमुखी सत्ता असली तरच तो सुरळीत चालतो.' चार हुकूम देणारे असून कसें भागेल ? मग ही तर पेशव्यांची दौलत म्हणजे साऱ्या हिंदुस्थानचा संसार. तेव्हां तेथें चार जण हुकूम करणारे अग्रेसर असतील तर दौलत बुडावयास वेळ लागणार नाहीं. रफीक – स्नेही. सिंदीबन – बापूनीं केलेली ही कोटी. शिंदीचें म्हणजे ताडीचें झाड निषिद्ध आहे. शिन्दे हे शिन्दीच्या झाडासारखेच निषिद्ध व त्याज्य होत. पण तुम्ही तर शिंदे घराण्यावर भलताच लोभ दाखवीत आहात. असा बापूनीं नानास इशारा दिला आहे. नमुदास आणणें – सुस्थिर करणें.

समजाविलें कीं, तुकोजी होळकर याचें मनोधारण तोडून आपला अर्थ तो काय? नारो गणेश कंपेष करतील याचा जिमा आमचा. ऐसी खात्री करून, नारो गणेश यांजला सोडवून आणून पुनः दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. दादाजीचा कारभार सहा महिने राहिला. सहा महिने सुभेदार यानीं कचेरी व स्मश्रू सोडून पलंग धरला होता. नारो गणेश कचेरींत आल्यावर स्मश्रू व स्नान करून शिरे दरबार झाला. त्या समयीं शिंदे यांनीं १५ लाख रुपये नजर कबूल करून विनंति करून घेतली. तेव्हा कोणीं कोणीं सुभेदारासही सूचना केली आपणही विनंति करून घ्यावी. त्यांनीं उत्तर केलें कीं, " रुपये द्या, विनंति करून घ्या. यात विशेष तें काय आहे? आम्हास श्रीमंत धनी आणि ब्राह्मण यांचा आशीर्वादच चांगला." विनतीची खटपट केली नाहीं.

(५०) इकडे हरिपततात्यास मसलत तोलेना. सबब शिंदे, होळकर याजला मदतीस पाठविलें. शिंदे व नाना फडणीस याचा भीतरपेठा मेळ काहीं कारणांगभूत शिंद्याचे जाण्यास दिनावधी लागली. होळकर दरकूच पोंहचून कोंडाईबारी गुजराथचा काकड तेथे हरिपततात्या, होळकर मिळोन दादासाहेबांशी लढाई मातबर झाली मानाजी फाकडे वगैरे पांच चार सरदार जखमी पाडाव करून होळकरानीं आणिले. तसाच पाठलाग केला. दादासाहेब भडोचेस दाखल झाले. तेथें काहीं उपद्रव करावा, (तर) इंग्रजाशीं वैर करून आज शहास गुंतून (पडावें पण तसें) पडावयाचें कारण नाहीं. ऐसी मसलत हरिपततात्यानीं करून माघारीं फिरलें. सुभेदार इंदुरास गेले. हरिपंततात्या, फौज खानदेशात पुणें मार्गाकडे रवाना करून, सडे, अहिल्याबाई पुण्यवान् व कारस्थानी दोन्हीं अगें एकसारखीं, तेव्हा दर्शन घेऊन जावे या भावीं, महेश्वरास आले. बाईसाहेबाची भेट झाली. शिष्टाचार आदरसत्कार बहुत उत्तम झाला. तात्याचे मनात बाईसाहेबासारखें मनुष्य, याचें आपले काही प्रामाण्य असावें असें मनात येऊन, कृष्णाजी मुरार याशीं बोलण्याचा व्यूह काढला. त्यानीं स्पष्ट उत्तर दिलें कीं, " अशा गोष्टी बाईसाहेबाशीं आम्हीं कोणीही बोलाव्या, इतकें कोणाचेंही पुण्य नाहीं. येथें त्यांचे

(४९) **कंपेष** – कमीअधिक. येथें अर्थ आवाडाव किंवा घालमेल. **शिरेदरबार** – खुला दरबार, भरदरबार. **विनंती करून घेणे** – नजरेचा पैका भरून पेशव्याची समतिदर्शक पत्रें आणविणें.

(५०) **तोलेना** – सभाळवेना. **भीतरपेठा** – अतस्थ, गुप्तपणें. **मेळ** – दोस्ती, एकमत. **तसाच** – त्याचवेळीं, वेळ न गमावता. **सुभेदार** – तुकोजी होळकर. **प्रामाण्य** – सख्य, शपथ, करार.

मुखावाटें आज्ञा होईल तितका व्यवहार करून आहों. अगोदर पुत्रशोक. त्यांत राज्य दुसऱ्याचे स्वाधीन केलें. त्यात मनस्वी किलाफ. मातुश्रीच्या स्वभावांत पीळ. सूर्योदयापासून पुनः सूर्योदयापर्यंत सदाचरणाच्या घटका नेमलेल्या. त्यांत अवकाश करून हाक मारली असता जाऊन प्रश्न करतील, तितकी विनंति करावी. अधिक बोललें असतां मर्जी कोणे कलास जाईल ही भीती. उदास म्हणोन गवताची पेंडी अथवा पावशेर तेल आज्ञेशिवाय कोणास प्राप्त होईल, इतकी मुखत्यारी कोणाकडे नाहीं. हा विषय आपण समक्ष बोलले असता, रुकार अथवा अन्य विचार उत्तरात काय निष्पन्न होईल तो खरा." हें त्याचे गळीं उतरून, तिसरे दिवशीं रात्रौ फराळास बोलाविलें होतें. पाचशें खाशाचा बेत त्याचा समारंभ उत्तम प्रकारचा सिद्ध होऊन, हरिपंततात्या मंडळीसह आले. मंडळी कचेरींत बसवून जातीनें आंगरखा पागोटें काढून बाईसाहेबाचे स्नानसंध्येचे बंगल्यात आले तों मातुश्रीसाहेबांची स्नानसंध्या संपून देवघरातून बाहेर आली. तात्यांस पाहिल्यावर गालीचा मखमली बसावयास टाकून, हरिपंततात्यांनीं दादाजीस हांक मारली. त्यास बोलण्याचा ओघ दादाजीकडून अगोदर समजलाच होता दादाजी आल्यावर बंदी करून, तात्यांनीं बोलण्याचा व्यूह काढला. तेव्हा मातुश्रीसाहेबानीं उत्तर केलें कीं, "आपलें बोलणें मुत्सद्दी काव्याचें. आमचा विषय पाहता गैरसमजुतीबद्दल आमच्या उपमा अन्यत्रास देतात. ते आम्हीं प्रत्यक्ष, त्यात बायका माणसें. आमची समजूत ती काय? आम्हास जें बोलणें तें उघडें बोलावें. त्याचें उत्तर करूं." तेव्हा तात्यांनीं काहीं स्पष्टही बोलून दाखविलें. त्याचें उत्तर "तात्या, ईश्वरइच्छेकडून

(५०) **राज्य दुसऱ्याचें स्वाधीन केलें** – तुकोजीकडे तिनें सरदारीचा सर्व अधिकार सोंपविला होता त्यास अनुलक्षून. **किलाफ** – भानगडी, तटे **सदाचरणाच्या** – जप, देवपूजा, कथापुराण, व्रतवैकल्य इत्यादिकाच्या. **अवकाश करून** – सवड काढून. **विनंति करणें** – नम्रतेनें उत्तर देणें. किंवा जबाब देणें. **उदास म्हणोन** – अहिल्या बाईसाहेब लौकिक व्यवहारास उदास आहेत म्हणजे तिकडे लक्ष देत नाहींत म्हणावे तर त्यांच्या हुकुमाशिवाय गवताची पेंढीहि कोणास देतां येणार नाहीं! **हा विषय** – बारभाईशीं करून घ्यावयाच्या दोस्तीसंबंधींच्या प्रामाण्याचा म्हणजे शपथ क्रियेचा विषय. **बंदी करून** – राबता बंद करून, जवळचे लोक बाहेर काढून देऊन. **आपले बोलणें मुत्सद्दी काव्याचें** – आपण जो विचार सांगितला तो अनुभविक, राजकारणी मुत्सद्यांनींच विवरण्याचा आहे. मी मूर्ख, अज्ञान. माझी उपमा लोकांना देतात. ती मी, या विषयांत काय निर्णय देऊं? फिरून त्यांत मी बाईमाणूस पडलें. बायकांना तें ज्ञान किती?

मजवर सर्वोपरी गहजब. अशांत म्यां दौलत दुसऱ्याचे स्वाधीन करून राहिलें. आयुष्य तें परत्रेचे विचारांत काढावें, अशा भावी नर्मदातीरीं क्षेत्र पाहून दिवस लोटतें. तथापि आमचा हा विचार कैलासवासी मल्हारजी होळकर यांनें श्रीमंतांचे गादीशीं केला. त्यांत अवघे आम्हीं बांधलों आहों. जागजागां असें विचार घडू लागले असतां, आमचे बुद्धीनें बेल म्हणजे भाजीपाला त्याचें साधन असें आहे ! आपण श्रीमतांचे दौलतीचे खैरख्वाह आहां. आपण वेगळें बोलणें बोलतां हेंच अप्रशस्त." अशा भावीं सडेतोड उत्तरे केली. यात हरिपंततात्यांचे मनांत वैषम्य तर आलेंच, परतु तात्यांची साधकता विशेष, यामुळे तो बोलण्याचा सबध सोडून अन्यत्र गोष्टी बोलण्यांत, पोटांत कळ निघाली म्हणोन पाव घटका तेथेंच निद्रा करून बोलले कीं, "उपद्रव विशेष होत चालला. आज्ञा होईल तरी मी डेऱ्यास जाईन." "बहुत उतम आहे" असे बोलून त्यांस बिदा केले. ते मडळीसह गोटांत गेले पाचशें पात्राचा समारभ. पात्रे वाढून सिद्धता झाली होती. मडळी गेल्यावर आपले पदरची मडळी मुत्सद्दी, भिक्षुक, पागे वगैरे बोलावून फराळास घातले. त्यांजकडेही दहीपोहे, लोणचीं, पापड, वडे ऐशा बहग्या भरून शागिर्दा-हातीं पाठवून दिल्या. त्याजवर तिसरे दिवशीं कृष्णाजी मुरार यांसी समाचारास पाठविलें. ते जाऊन बोलणीं झाली. कृष्णाजी मुरार यांनीं विनति केली कीं, "ये विषयींचे मनोधर्म सुचविलेच होते. मालरावबाबा कैलासवासी झाल्यापासून

---

**(५०) परत्रेचे विचारात आयुष्य काढणे** – मृत्यूनतर परलोकांत चागली जागा मिळावी अशा हेतूनें, राहिलेल्या आयुष्यांत पुण्यकृत्यें आचरीत असावीं इतकेंच आतां कर्तव्य राहिलें. **हा विचार** – पेशव्याशीं एकनिष्ठ राहण्याचा. **जागजागा असे विचार इत्यादी** – आम्ही म्हणजे होळकराचें घराणें, पेशव्याशी म्हणजे धन्याशीं एकनिष्ठतेनें बाधलेले असता तुम्ही आम्हास एकनिष्ठतेविषयीं आणप्रमाण करावयास सांगतां आश्चर्य वाटतें. मनाची एकनिष्ठता ती खरी. नाही तर शिवावरील बेल उचलून देण्याचें नाटक केलें तरी तें खरें नव्हे बेल म्हणजे काय ! झाडाचा पाला ! **साधन** – सोडवणूक, गुता उकलण्याची रीत किंवा मार्ग किंवा उपाय. **खैरख्वाह** – हितचिंतक. **पोटांत कळ निघाली म्हणून** – हरिपत तात्यांना पोटशूळाची कायमची व्यथा होती. यावेळीं विषय बदलण्यास ती त्यांना उपयोगी पडली ! **साधकता** – समेटून घेण्याची हातोटी. **बिदा करणें** – निरोप देणें. **त्यांज-कडेसाहि** – हरिपताकडेहि. **बहंगी** – पिशवी, करडी. **स्वभाव कोणाचेही हातीं नाहीं** – कोणाचेंच ऐकत नाहींत.

स्वभाव कोणाचेही हातीं नाहीं. पुण्यवान् धैर्यवान् यामुळें दिवस भ्रमानें निघतात. त्यांत आपलें येणें या ठिकाणीं कशास ? तो योग झाला असतां त्यांत मज ओळखीचें कारण काय ? आपलेसारखें मिष्टास व दुसऱ्याचें मनोधारण हें श्रीमंतांचे राज्यांत धुंडाळल्यानें मिळावयाचें नाहींत. ते पक्षीं रंगाऱ्या मोटा बाधून कूच करावें हे नेकसल्ला." तेव्हा तात्यानीं उत्तर केलें, "आपण बोलता तसेंच घडेल." दादाजी प्रकृति पुसून आले. दुसरे दिवशीं हरिपंततात्या वाडयात आले एकांतीं बाईसाहेबांशीं कित्येक प्रकारचीं बोलणीं होऊन बिदा मागितली. वस्त्रें, अलंकार देऊन बिदा केले. ते पुण्यास आले महादजी शिंदे गुजराथेंत न जाता मागें राहिले होते, ते मागून उज्जनीस आले. तुकोजी होळकर गुजारथची स्वारी करून खानदेशात होते. त्याजकडे महेश्वराकडे जाणें वाकडे. कारण सहा महिने दिवाणगिरी दादाजी गगाधर याणीं केली. ते बाईसाहेबांचे इतल्लयाने जावें. पुन. नारो गणेश याची मुक्तता व कारभार सुरू झाला. याचा इतल्ला सगळा मातुश्री बाईसाहेबांस नाहीं. यामुळें बाईसाहेबांचे अत.करणीं संशयाचे पर्वत. तेव्हा महेश्वरीं जाऊन सफाई होणें इतकें पुण्य कोणाचेंही नाहीं. तथापि शमरुडाचे घाटें परभारें इंदुरास आले. मग महादजी शिंदे यांस इदुरास बोलावून त्याशीं बोलणें केलें कीं, "तुम्ही आमचे बंधू, ते पक्षीं मातुश्रीसाहेबाकडे जाऊन, आपसातील सफाई करावी." तेव्हां पाटीलबावांनीं उत्तर केलें कीं, "श्रीमत, मोंगल, भोंसले, या प्रकरणीं अधिकउणें जाब असल्यास त्यातील व्यवस्था आपले मनोगतानुरूप घडून येईल. पण बाईसाहेबापाशीं जाऊन यश यावें असें मनोत्साहास वाटत नाहीं. परतु घरचें काम, ते पक्षीं जातों. घडेल तें खरें" असें बोलोन एक पालखी व चौघे खिजमतगार व दोन घोडे कोतवाल इतक्यानिशीं महेश्वरास आले. बाईसाहेबांस समजताच मुकुदराव हरी दिवाण यास सामोरे पाठवून बहुत समारंभानें किल्लयावर

---

(५०) **पुण्यवान्, ध्यैर्यवान् यामुळें दिवस भ्रमाने निघतात** – अहिल्याबाई पुण्यवान् आहे, धैर्यवान् आहे यामुळेंच केवळ तिच्या दबदब्यामुळें होळकराच्या दौलतीकडे कोणी पापदृष्टीनें पाहू शकत नाहीं. **भ्रमाने** – जोरावर. **रगाऱ्या मोटा बांधणें** – स्नेहाचा किंवा ऐक्याचा वरकरणी देखावा राखणें **बिदा मागणें** – जाण्यासाठीं परवानगी मागणें. **त्याजकडे महेश्वराकडे जाणे वाकडे** – अहिल्याबाईचें व तुकोजी होळकराचें पूर्ण वैमनस्य असल्यामुळें त्याला आपण होऊन महेश्वरास अहिल्याबाईकडे जाणें प्रशस्त वाटत नव्हतें. **इतल्ला** – दखल, माहितगारी, समति, अनुज्ञा. **सगळा** – बिलकूल. **पुण्य** – सुदैव, भाग्य **कोतवाल** – स्वारीच्या घोड्याखेरीज जादा बरोबर बाळगलेले.

आणोन वाडयांतच राहावयाची सोय केली. दुसरे दिवसापासून संपूर्ण कारभार, द्यावें, देणें, सुद्धां सोपला. जामदारखानेवाल्यास लाख रुपये पावेतों परवानगी कीं, पाटिलबावांनीं लाख रुपये कोणास देवविले असतां द्यावे. आमचे परवानगीचा आक्षेप घेऊं नये. असा बंदोबस्त करून, त्रिकाल भोजन मुतपाकांत, त्यात दोन प्रहरीं पंक्तीस, प्रातःकाल सायंकाळ मावशीबाईस आणून नाना प्रकारचीं खाणीं त्यांनीं व ब्राह्मणाचे पदार्थ करवून आपण जवळ बसून भोजनास घालावें. हा क्रम तीन महिने एकरूप चालला. पाटिलबावा बहुत प्रसन्न करून, अशा मावलीचे पोटीं जन्म घ्यावा अशा भावी बोलण्यात, परतु ज्या कामाकरितां आले त्या बोलण्याचा प्रारंभ केला असता पाटिलबाबाची रूरयात कांहीं एक न ठेविता, कायम करून समेटाचे पर्यवसानास येऊ दिलें नाहीं. शेवटीं पाटिलबावाही दिक होऊन बोलले कीं, "बाईसाहेब आपण इतकी अगवणाचीं बोलणीं बोलतां परंतु आम्हीं पुरुष आहोंत. आपले ढंगावर आलों असता आपण काय कराल?" याचें उत्तर, "जसें तुम्हीं आपल्या बाया सुपारीच्या खाडासारख्या तोंडात टाकून गिळून गेला, तोच बोध तुकोजी होळकरास करून उभयता फौजबदीनें येण्याचें करावें. इंदुरीहून तुमचें कूच, त्याच दिवशीं हत्तीचे पायात अडीं घालून तुमची खात्री करीन, तरच मल्हारजी होळकराची सून तुमचे मनात गुबार होता तो तुम्हीं बाहेर

(१०) द्यावे देणे – कुलमुखत्यारी. 'द्यावे' असा शेरा दिवाणाने लिहावयाचा व 'देणें' असा शेरा मालकानें लिहावयाचा, असे हे दोन्ही अधिकार महादजीकडे सुपूर्त केले. परवानगी – तोंडी आज्ञा किंवा हुकूम. एकरूप – एकसारखा, कमीअधिक न होता. खाणीं त्याची – मांसादिक पदार्थ. अहिल्याबाईकडे ते सर्व वर्ज होते. दिक – खिन्न. रूरयात – भीडभाड. अंगवणाची – ईर्षेची, जोऱ्याची. आपले ढगावर आलो असता – आपल्याप्रमाणेच आम्हीही जोरा धरला तर. तुम्ही आपल्या बाया सुपारीच्या खांडासारख्या इत्यादि – हा महादजीला टोमणा आहे. दत्ताजी व जयाप्पा यांच्या बायकांचें आणि महादजी शिंद्याचें सरदारीकरितां पूर्वी भांडण लागलें होतें. व त्यांत शेवटीं पेशव्यांना पडावें लागलें. त्या प्रसगास अनुलक्षून अहिल्याबाई महादजी शिंद्यास म्हणते कीं, तुम्ही आपल्या घरच्या खऱ्या अधिकारी बायांचा निकाल लावलात तोच सल्ला तुकोजीस द्या व दोघे एक होऊन माझा निकाल लावा म्हणजे झाले! अडी – मोडी वाचनाची चूक. 'अदू' असें पाहिजे. अदू म्हणजे लढाईचे वेळीं हत्ती जाग्यावरून पळूं नये म्हणून त्याच्या पायांत जो साखळदंड घालतात तो. गुबार – मनांतील गुप्त दुष्ट हेतु, कपट.

काढला. या गोष्टीस चुकाल तर तुम्हांस मार्तंडाची शपथ. " मग पाटिलबावांनीं हंसल्यावर गोष्ट नेऊन मातुश्रीचें शांतवन केलें. तार ध्यानास आणिला. यश यावें ऐसें पाऊल दिसण्यांत येईना. सबब आज्ञा घेऊन इंदुरास आले. झालें वर्तमान सांगितलें. नारो गणेश यानीं पाटिलबावांशीं वेगळे वाटें बोललें की, उभयतां सरदारांचें संमत घडेल तर आठा दिवसांत बदोबस्त करितों. हें बोलणें पाच विश्वे महादजीबावांसही रुचलें. मग सुभेदार यांचें मानस महादजीबावानीं पाहिलें. तेथें सुभेदारांचें उत्तर एकच पडलें कीं, " बाईसाहेबाचे पायापाशीं हरामखोरी मजकडून एकरूप व्हावयाची नाहीं. कदाचित् ढग दोषें करून तिचे मनात मजविषयींही पाप आल्यास मी हात बाधून रुबरु जाईन मग ती प्राण घेवो वा कैदेंत ठेवो. तें मजला कबूल आहे. परतु हरामखोरी माझे प्राणात प्राण आहे तोपर्यंत होणार नाही. याकरितां दौलत उद्यां जात असेल तर आज जावो. मी जोडा सभाळून उभा राहीन, परतु माझे वस्तू ही गोष्ट सुतराम होणार नाहीं. " असा खंबीर सुभेदाराचा पाहून पाटिलबुवा नारो गणेशांशीं बोलोन उज्जनीस गेले. नतर सुभेदार कूच करून आल्या वाटेनें पुण्यास गेले.

( ५१ ) नाना फडणिसाचे मनात पूर्वदंश होताच. यामुळें वाफगावीं राहणें पडून सरदारी गळाठयांत आली. तों इकडे दादासाहेब यांनीं अंग्रेजांशीं बोलणें केलें कीं, " आमची दौलत चोरापोरी लुटली जात आहे, ते पक्षीं सहा आणे घेऊन आमची मदत करून आम्हास राज्यावर बसवावें. " ही गोष्ट अंग्रेजांचे मनात भरून पाच पलटणें व पापडसाहेब व इस्टुर फांकडा दोघेही बरोबर देऊन बोरघाटाखालीं आलें. तेव्हा पुण्यात हलकल्लोळ होऊन, पुणें जाळून बाहेर पडावें असा विचार झाला. मग सुभेदार पुण्यास बोलावून मसलतीचा प्रश्न केला कीं, " साहेबांनीं अरिष्ट आणिलें, ते पक्षीं आपणही पुणें जाळून मोंगलास सामील करून यांचे मागें लागावें असा बेत केला आहे. " तेव्हा सुभेदारानीं उत्तर केलें कीं, " धनीपणाची मुखत्यारी आपणाकडे. आम्ही ताबेदार. सांगाल तैसें करूं. परंतु

---

(५०) **तार** – रागरग. **वेगळे वाटे** – गुप्तपणे, एकांतात. **पाच विश्वे** – पांच टक्के, म्हणजे काहींसें. **ढंग दोषेकरून** – अभिमानामुळें किंवा गर्वामुळें. **माझे वस्तु** – माझ्या हातून, माझेकडून. **खंबीर** – खमीर, निश्चय.

(५१) **गळाठ्यांत येणें** – खालावणें, ओढघस्त स्थिति येणें. **सहा आणे** – रुपयांत सहा आणे हिस्सा. **इस्टुर फांकडा** – कॅ. स्टुअर्ट. 'फाकडा' ही मराठ्यांनीं कॅ. स्टुअर्टला त्याच्या शौर्याबद्दल खूष होऊन दिलेली पदवी. **साहेबांनीं** – ( १ ) रघुनाथरावदादानीं. ( २ ) इग्रजांनीं.

आमचे मनास वाटतें कीं, आपण एक लक्ष धरून गर्भवासी श्रीमंतांची आज्ञा या क्रमावर दौलत नमुदास आणिली, ते पक्षीं मुर्गीस बिसमिल्ला तो कशास ? आपली फौज जमा करून बोरघाट धरावा. घाट चढून वरती होतील तेव्हां घडणें तें घडो. आपले हाते आज आपलें घर जाळावें असें तुम्हांस संकट तें काय ? " ही गोष्ट नाना फडणीस यानीं श्रवण करून बहुत संतोषातें पावले. मनांत विचार केला कीं, सरदार गळाठ्यांत असून समयास मसलतीचीं पैरवी उत्तम प्रकारची सागितली. तेच समयीं सुभेदारास फौज ठेवावयाची आज्ञा होऊन, वरकड सरंजामी जमा करून कांहीं इतलाखीचाही भरणा केला. तमाम फौज सुभेदाराचे हुकमात चालावी ऐसी ताकीद होऊन बमय फौज सुभेदार घाटाचे तोंडीं आले. तों फिरंग्यानीं एक पलटण ५०० माणूस, जय्यत चार तोफा, घाटावर चढवून लढाईचा मुकाबला घातला. त्या पलटणानें घाटावरून चौ तोफानें असा मार दिला कीं, पाच स्वार एके ठिकाणीं उभे राहूं दिले नाहींत. अशी दररोज लढाई चार महिने सतत झाली. ऐशीं हजार फौजेचा मेळ असता उमष खाऊ दिला नाहीं यामुळे नानाही फार दिक् झाले मग श्रीमतांनीं स्वदस्तुर चिटी सुभेदारास लिहिली कीं, " आपण जातीनें ऐशी हजार फौज असतां, एका पलटणाचें पारपत्य न होता फौज हवा खाऊन राहिली. तेंव्हा आम्हास जातीनें येणें लागेल कीं काय ? आपलें उत्तर आलें म्हणजे तसाच बेत करावयास येईल ? " असी चिठी घेऊन साडणीस्वार सुभेदार घोड्यावर होते तेथें आला. चार घटका दिवस होता. गाशा टाकून चिठीचें वृत्त श्रवण करितात, इतक्यात पाच माणसें एकत्र पाहून तोफेचा गोळा आला चार महिने श्रमाची दगदग आणि चिठीच्या मजकुराच्या फासण्या, येणेंकरून चित्त विमनस्क होऊन डेन्यास आले. नतर काशीराव होळकर, बापू

(५१) **या क्रमावर** – या रीतीनें. **दौलत नमुदास आणिली** – दौलत सुप्रतिष्ठित केली. **मुर्गीस बिसमिल्ला तो कशास ?** – कोंबडी कापायला मुसलमान आणावयाची यातायात कशास पाहिजे ? किंवा कोंबडीची हत्या करायला धर्मान्तर करून मुसलमान होण्याचें दिव्य कशाला ? भावार्थ, क्षुद्र, गोष्टीच्या परिहारास भलतीच मोठी तयारी कशाला करता ? **बिसमिल्ला** – मुसलमानी मुलाणा किंवा मुसलमानी धर्म. **सरंजामी** – सरजामी सरदार. सैन्याच्या नोकरीकरतां ज्यांना सरंजाम लाऊन दिलेला होता असे सरदार. **उमष** – उमस, विसावा, श्वास घेण्याइतकी फुरसत, निश्वास टाकण्याइतकी फुरसत. **हवा खाऊन राहणें** – भयभीत होऊन राहणें, जरब खाऊन राहणें. **गाशा** – घोड्याच्या खोगिरावर घालावयाचें पातळ गादीसारखें आच्छादन. **फासण्या** – टोचण्या.

होळकर, भिकाजी होळकर, मल्हारराव होळकर चौघे पुत्र. त्यांत मल्हारराव होळकर यांचें वय आठा वर्षांचें. तिघेजण बराबरीचें, काम करण्याजोगे. चौघांसही बोलावून आई, माई, जोरू, बेटी काहीं एक विचार दुर्भाषणें बोलून, " श्रीमतांचा मजला ओळंबा आला, ते पक्षी उदईक मजला मरावयाचें. मग तुम्हांस उमजेल. " कोणेहि गोष्टीची बाकी ठेविली नाहीं. तेव्हा मल्हारजी होळकर लेंकरू, काशीराव होळकर एकांगहीन, भिकाजी होळकर ते होळकरच राहिले. बापू होळकराचे काळजास भोंक पडून, त्याप्रसगीं काहींएक उत्तर न करिता तेथोन बाहेर आल्यावर पागे, बारगीर व शिलेदार सरदार यांस, प्रसंगास उपयोगी तितक्यांच्या घरोघर हिंडून, पदर पसरून, पायावर डोकें ठेवून, मागणें मागितलें कीं, " सुभेदाराचा वृद्धापकाल, त्यानीं श्रमसाहस या दौलतींत केले, तें आपण कानांनीं ऐकिले नाहीं, मग पाहणें तर दूरच ! हे सर्व गावखुर्द होऊन या प्रसगीं वृद्धापकाळीं त्यास श्रीमताचा ओळबा आला. तेव्हा त्यानीं तर मरणाचा सकल्प केला. पण त्यानीं मरावें व आपण वाचावें, या वाचण्यास धिक्कार असो ! आमचे मरणाचे सोबती व्हावयाचें असल्यास चौघडा आखर झाल्यावर अमुक जागा घोडें न घेतां पादचारी ढालतरवारिनिशीं त्या ठिकाणीं हजर व्हावें. वडिलाचे पुण्येंकरून कामकाज होऊन

(५१) आई, माई, जोरू, बेटी इत्यादि – सतापाच्या भरात त्याना तुकोजी होळकरानें आईमाईवरून शिव्या दिल्या. जोरू – बायको. हिंदुस्थानी शब्द आहे. ओळंबा येणे – दोष येणें, आरोप लागणें, ठपका येणें. एकांगहीन – एक अंग लुळें पडलेला. काशीरावाच्या एका अंगावरून वारे गेलें होतें. भिकाजी होळकर ते होळकरच राहिले – भिकाजी होळकरास अक्कल वा समजूत काहींच नव्हती. प्रसंगास उपयोगी – लढाईत जीव गमवावयास तयार अशा ईर्षेचें. तें आपण कानानीं ऐकिले नाहीं मग पहाणे तर दूरच – होळकराची सरदारी रक्षिण्यासाठीं तुकोजी होळकरानीं फार पूर्वींपासून कमालीचें श्रमसाहस केलें. आपण जन्मलोंहि नव्हतों त्याच्या आधींपासून त्याचे पराक्रम झाले. ते इतके पूर्वी होऊन गेले कीं आपल्या लहानपणीं त्याच्या दन्तकथाहि आपल्या कानावर कधीं आल्या नाहींत. मग ते प्रत्यक्ष पाहण्यास मिळणें तर त्याहून अशक्य. या विचित्र भाषणाचा इत्यर्थ हा कीं, तुकोजीबावांनीं फार पूर्वींपासून पेशव्यासाठीं लढायांत अगणित कामकाजें केलीं, पण यावेळीं तीं सर्व विसरलीं जाऊन त्यास बोल लागण्याचा म्हातारपणीं प्रसग आला आहे. तेव्हां ती गोष्ट आपण होऊ देतां कामा नये. गांवखुर्द होणें – गांवखुर्द व गांवखुद एकच. रद्दबातल, नष्ट, बिनकिमतीचे. चौघडा आखर होणें – चौघडा समाप्त होणें. घुटी – प्रासादिक मद्य.

आल्यास दौलत तुमची आहे. वांटून खाऊं." या भावीं बोलणीं अस्तमानापासून दोन प्रहर रात्रपर्यंत एकेक माणसाशीं बोलून, आनंदानें रुकार दिला त्याचें नांव यादीवर लिहिलें. ज्यानें रडाच्या गोष्टी सांगितल्या, त्यास रामराम केला. ऐसी आसामी यादीवर १८०० आले. इतके सिद्ध करून डेऱ्यास जाऊन, घुटीची प्रार्थना यथास्थित करून, स्नान करून देवावर भंडारा टाकून, सुभेदारांचें नांव घेऊन कबर बाधली. संकेतस्थानीं आले, तेथें यादीबरहुकूम जमाव झालाच होता. कोणकोण यावयाचे तेही आले. एकत्र होऊन चाल केली. हें वृत्त कोणासही ठाऊक नाहीं. घाटाचे तोंडीं गेले. तोंपर्यंत पलटणवाल्यासी ही खबर नाहीं. आठ कोसाचा छटा राहिला. त्यानें बिघडून जागा बिकट केली होती. जोंपावेतों पलटणवाल्यास समजले नाहीं, तोंवर मुकाट्याच गेले. गडबड केली नाहीं, तोफे-पासून गोळीच्या पल्ल्यावर बिकट पाहरे होते. त्यानीं ऐकताच, झडपून पाहरे कापून टाकिलें ! तेथोन हजार बाराशे बदुकीचा एकदाच ताशेरा दिला. दुसऱ्यानें मेण्यातून काढून हल्ला केला. त्यानींही छेरे मारण्यात कमी केली नाहीं. आठ-राश्यात मेळ होईपावेतों ६०० राहिले सहाशानीं तरवार करून, पलटण दरोबस्त बुडवून, चारी तोफा अडीचशे माणूस परतून आले. यात चोवीस पालखीनवीस व तेरा हत्तीनवीस कामास आले. याशिवाय पागे बारगीर याची संख्या नाहीं.

(५२) हें वर्तमान सुभेदारास समजले. मर्जी प्रसन्न झाली. मेले, गेले, राहिले, इतक्याचे घरोघर जातीने सुभेदार हिंडोन, सर्वांची दिलजमाई करून, श्रीमंतास पत्रें लिहिलीं कीं, "आज्ञेप्रमाणे पलटण कापून काढलें व इतक्यात अंग्रेजाकडून

---

(५१) ऐसी आसामी – असे लोक छटा – छट्टा, अन्तर, फासला. त्याने – इंग्रजाने. **बिघडून जागा बिकट केली होती** – इंग्रजाने तळाची रचना बदलून मोर्चे बाधून जय्यत तयारी ठेविली होती. **बिकट पहारे** – 'पिकेटस.' छबि-न्याच्या चौक्या. 'बिकट' हा इंग्रजी 'पिकेट' शब्दाचा अपभ्रंश आहे. **त्यानीं ऐकताच** – 'त्यानीं येतांच' असें मुळांत असावें. त्यानी म्हणजे होळकराच्या लोकांनीं. **ताशेरा देणे** – फैर झाडणें, सरबत्ती करणें. **मेण्यांतून** – म्यानांतून. **मेण्यांतून काढून** – अर्थात तलवारी. **आठराशांत मेळ होईपावेतों** – लढाई सपून लोक परत आपल्या गोटांत येईपावेतों, १८०० लोकांपैकीं अवघे ६०० च जिवन्त राहिले. बाकीचे हल्ला करीत असतां ठार झाले. **सुभेदारावर ओझे ठेवून** – सुभेदारावरच जबाबदारी किंवा जोखीम सोंपवून. **चारी तोफा अडीचशें माणूस परतून आले** – शत्रूच्या ४ तोफा व २५० इंग्रजाकडील शिपाई पाडाव करून आणले.

सुभेदारापाशीं प्रेष आला कीं, "तुमची दोस्ती आम्हास तोडावयाची नाहीं. दादासाहेबांस तुमचे तुम्ही आटोपून बंदोबस्त करावा. तुमची आमची दोस्ती पूर्वापार आहे, ती कायम करावी." असें बोलणें आलीयावर नानाकडे प्रेष पाठविला. त्यानींही सुभेदारावर ओझें ठेवून उत्तर लिहिलें की, आपण प्रसंगीं आहां. कळेल त्याप्रमाणें ठरावात आणून साहेब हस्तगत करून घ्यावे. मग सुभेदारानीं अंग्रेजांशीं बोलणें करून, दादासाहेब व सहा आणीचा लेख व काहीं मसलतखर्चे व दादासाहेबाचा जवाहीरखाना मुंबईस आहे तो आणून द्यावा. त्यानीं उत्तर केलें कीं, "जवाहीर व सहा आणीचा लेख हें कलकत्त्यास आहे. आम्ही चकती देतों. कोणास पाठवावें. घेऊन येईल. गुंता पडणार नाहीं." ऐसें बोलणे झाल्यावर मसलतखर्चे व दादासाहेब व चकती आणोन हजर केली. मग सुभेदार पुण्यास आले. श्रीमंत जातीनें तीन कोस सुभेदारास सामोरे आले होते. भेटीचे समयीं श्रीमंताकडील व सुभेदाराकडील तोफखाना सुरू झाला. शनवारचे वाड्यात आले. नाना फडणीस यानीं शिरेदरबार सुभेदाराचे चार घटका स्तुतिस्तोत्र केलें. सुभेदारानीं एकच उत्तर केलें कीं, चाकरी चाकरानीं केली, त्याचा इतका बडिवार कशास पाहिजे? इतकें बोलून विडे घेऊन मुजरा करून मुक्कामास आले. दुसरे दिवशीं बापू होळकरास भेटीस पाठवावे म्हणोन निरोप आला. यानी बापूस बोलावून सांगितलें कीं, भेटीस जाणें. बापूनीं उत्तर केलें कीं, "मला श्रीमंताशीं काम काय? आपण चलाल तेव्हा बराबरच चालेन." सुभेदारांनीं शिव्या दिल्या. हें वृत्त निरोप आणणारानें अवघे डोळ्यानें पाहिलें. मग सुभेदारांनीं त्या गृहस्थाशीं बोलले कीं, "कारटा हट्टीखोर आहे. मी येईन ते दिवशीं बराबर घेऊन येईन." मग चौ दिवसांनीं सुभेदार गेले. त्याचे बराबर बापूही गेले. सुभेदाराचे पाठीमागे दोघे खिजमतगार त्यात आपण उभे राहिले. नानानीं सुभेदारास विचारिलें कीं, "बापू कोठें?" तेव्हा बापूनें हात जोडून विनंति केली कीं, "मी हजर आहे." नानानीं पराक्रम ऐकिला.

---

(५२) **एकाद्यावर ओझे ठेवणें** – एकाद्यावर विश्वासानें निर्धास्तपणें काहीं एक जबाबदारी सोंपाविणें. **साहेब** – दादासाहेब. **सहा आणीचा लेख** – दादासाहेबांनीं रुपयांत सहा आणे इंग्रजास देण्याबाबत जो तहनामा केला तो. **चकती** – पत्र. **गुंता** – अडचण, हरकत, अडथळा. **शिरेदरबार** – जाहीर दरबारांत, जाहीरपणे. **बडिवार** – स्तोम, बडेजाव. **चलाल** – जाल, निघाल. **सुभेदारांनीं त्या गृहस्थाशीं बोलले** – सुभेदार त्या गृहस्थाशीं बोलले. **हट्टीखोर** – हट्टी, हटवादी. **आचार** – वागणूक, रीतभात. **पराक्रम तो ऐकिला आचार हा पाहिला** – इतका पराक्रम केलेला असून अशी गर्वरहित लीन वागणूक पाहून

आचार हा पाहिला. येणेंकडून बहुत प्रसन्न होऊन, रावेर व कोंच महाल त्या दिवशीं जागीर करून दिली.

( ५३ ) नंतर दादासाहेबांस झांशीचे किल्ल्यांत ठेवावें असा विचार. श्रीमंतांकडून हरी बावाजी व होळकराकडून जीवनराव पागनीस अवसरकर या उभयतांस बराबर देऊन, साहेब कुटुंबसुद्धां झांशीस रवाना केले. मार्गांत हरी बावाजीचा जाच फार होऊं लागला तेव्हां सौभाग्यवती आनंदीबाईंनीं अमृतरावसाहेब यांजला सांगून ओंकारेश्वराचे अलीकडे तीन कोस मुक्काम, तेथून कूच करून पुढें जावें. तयारी झाली. घोड्यावर बसल्यावर अमृतरावसाहेबांनीं हरी बावाजी याचे गोटांत येऊन मशारनिल्हे आंगरखा घालून घोड्यावर बसावें, इतक्यात रावसाहेब कां आले म्हणून यांचेसमोर आले. तोंपर्यंत रावसाहेबानीं बासडा मारून पाडले, आणि घोडा उडवून आपले सरजामात जाऊन, तयारी होतीच, झाशीचा रस्ता सुधरून गुजराथचा रस्ता धरून पुनः अंग्रेजाकडे गेले. होळकराकडील व श्रीमंताकडील सरंजाम राहिला. ते कूच करून देशीं गेले.

( ५४ ) नतर मल्हारराव होळकर, सुभेदाराचे द्वितीय कुटुंबाचे चिरंजीव, याचें लग्न फार मोठें झालें. लाभाते यांची सोयरीक झाली. लग्नसमारंभ फार मातबर झाला. लग्नांत विघ्न, कचेरीचा माडव जळाला! लाखों रुपयाचें नुकसान झालें! काहीं माणसेंही जाया झालीं. श्रीमंत व नाना फडणीस लग्नास आले होते. नंतर श्रीमंताचें लग्न झालें.

( ५५ ) नतर टिपूनें खडणीचा ऐवज द्यावयास लबाडी करून फौजबंदीनें काकडावर मुक्काम केला. तेव्हा मसलत प्राप्त होऊन हरिपंततात्याबरोबर फौज देऊन भोंसले, मोंगल सामील करून, हरिपंततात्या व सुभेदार व मोंगलाकडील फौज व भोंसल्याकडील फौज मिळून लाख फौजेचा जमाव करून टिपूचे मुलुखांत शिरले. सावनूर बंकापुरावर लढाई मातबर होऊन टिपू उधळून आपले मुलखांत गेला. मागें हेही दरकूच चालले. टिपूचा कागदपत्र येणें तो सुभेदारांकडे यावा. इतराशीं त्यानें गरज ठेविलीच नाहीं. नादी लावून श्रीमंतांचे फौजेवर छापा टाकावा, हा मनसबा करून तयारी केली. हें वर्तमान सुभेदारास समजतांच, अवघे सरदारांस इतल्ला करून, बुणगे पिछाडी डोंगर याचे आश्रयानें अलीकडे ठेवून,

---

(५२) नाना फडणीस फार प्रसन्न झाले.

(५३) या उभयतांस बराबर घेऊन — या उभयतांस बराबर देऊन असें पाहिजे. ओंकारेश्वर — ओंकारमांधाता.

(५५) इतल्ला करून — दखल देऊन. इतराशी — इतरांची. पिछाडी — पिछाडीस.

खडे भारी घोडा राऊत असा सर्वांस इतल्ला केला. कोणीं ऐकून घेतलें. मोंगल, भोंसले यांनीं थट्टा केली कीं, सुभेदारांस म्हातारपणीं फार दिवस वांचावें हा अभिलाष उत्पन्न झाला आहे. अशा भावीं बोलले. ते सुभेदारांचे कानावरही आलें. तथापि क्षमा करून, आपले बुणगे दामदस्त राहुटी पाल पडदे बेलबाधी या कांहींएक न ठेवितां, एक बिचोबा ( व ) पलग मात्र ठेविला. बाकी आपला गोट सडा जगरा केला, तों मागील प्रहर रात्र रहता गोळा चालला. मोंगल, भोसले यांचें येथें रामजानीचा तमाशा होत होता. ते जेथील तेथें राहून प्राण घेऊन निघावयास मुष्कील पडली ! त्या काळीं अवघ्यास वाटलें की, सुभेदार सागत असता आपण हयगय केल्याचें फळ पावलों. मग टिपू सुलतानानें फौज लुटून नेऊन वेगळाली उभी केली. त्यात सुभेदारांकडील एक म्हतारीचा बैल, जातें व पाळ ! तेव्हा त्यास आश्चर्य वाटले. ज्यानीं हिंदुस्थान काबीज केलें, तेथें अशा सावधानीनेंच राहिलें म्हणून गुजारा झाला. नंतर टिपू सुलतान यानें लूट सुतळीन्या तोडयासुद्धा ज्याची त्यास पावती केली. सुभेदाराकडील म्हातारी तिजला साडी चोळी देऊन, एक बैल मातबर देऊन बिदा केली. पुढें दो चौ महिन्यांनीं सुभेदाराचे विद्यमानें खडगीचा ठराव ठरून, पैका चुकवून देऊन, तमाम फौजा मुलुखातून काढून दिल्या. पुणें मुक्कामीं आल्यावर सुभेदार वाफगांवास आले

( ५६ ) इकडे हिंदुस्थानांत महादजी शिंदे उज्जनीस होते गोहदकर जाट यांचा इरादा, ग्वालेर घ्यावी, हें कायवाङ्मनःपूर्वक परतु जातीचें अंगवण थोडें. तथापि उद्योग करीतच होता. तों ग्वालेर श्रीमतानीं शिंद्यास दिली. त्यान्या सोडचिठी घेऊन अंबोजी इंगळे ग्वालेरीस आले होते. अशा सधींत जाटानें कानपूर छावणींत फिरंग्याशीं पैगाम लावला. “ पांच लक्ष रुपये आम्हीं तुम्हास देतों. तुम्हीं ग्वालेरीचा किल्ला घेऊन आम्हांस द्यावा. ” त्यांनीं कबूल करून, चार पलटणें रवाना केलीं. त्यांनीं येऊन किल्ल्याची बदली होती असी संधी पाहून, उरवाईचे

---

(५५) **इतल्ला केला** – सल्ला दिला. **दामदस्त** – झाडून सर्व. **बेल–बाधी** – बैल वगैरे भारबरदारीचें साहित्य. **या** – वा. **बिचोबा** – छोटी राहुटी, लहान बिनखांबी तबू. **जगरा** – जरारा असें पाहिजे. **जरारा** – सडा, सामानसुमान, अडगळ, बोजा जवळ नसलेला. **रामजानी** – कळवतीण. **सावधानी** – सावधानता, दक्षता.

(५६) **ग्वाल्हेर द्यावी** – ग्वाल्हेर घ्यावी असें पाहिजे. **अगवण** – पराक्रम. **पैगाम** – बोलणें. **किल्लयाची बदली होती** – एका अमलदाराकडून दुसऱ्या अंमलदाराकडे किल्ला जात होता अशी संधि पाहून.

माजी किल्लेदाराकडील जमादार होता, त्याजला पंचवीस हजार रुपये देऊन, फितुरांत आणून त्या मार्गी किल्ल्यावर चढून आले. हें वर्तमान माजी किल्लेदार गोविंद शामराज यांजला समजताच त्यानीं तरवार धरली. ते सावध, हे बेसावध. तथापि निमक खाण्याची शर्त करून जुवामर्दीनें देह अवसान जाहलें ! लौकिक त्यांचा जाहला. ग्वालेरसारखा किल्ला एकाएकीं हातीं आल्यावर अंग्रेज हमराहा होऊन शिरोंजेकडे चाल केली अंबोजी इंगळे फिके पडून उज्जनीस आले. तेव्हां अंबोजीबरोबर महादजी शिंदे यानीं दहा हजार फौज घेऊन फिरंग्याचे मुकाबल्यास रवाना करून, श्रीमंतास पत्र लिहिले की, "ग्वालेर प्रातीं फिरग्याची पलटण घेऊन ग्वालेर घेऊन पुढें चाल करून शिरोंज घेतली. आम्हींही त्याचे मुकाबल्यास अबोजी इगळे दहा हजार फौज देऊन रवाना केले. साज सकाळ आम्हींही कूच करून जातों. फौजेची खर्चाची मदत झाली पाहिजे." असें लिहून आपणही अंबो-जीचे मागे चार मजलीचे अतरानें राहत गेले. अंबोजी इगळे याचा व पलटणांचा मुकाबला लागला. समोर मुकाबला करून लढाई करावी, तर पुरें पडणें हे तर कठीणच म्हणून खांद्यावर भाला टाकून, भोंवताले हिंडून, रसद चारा पाणी याज-वांचून जेर केले. मागें महादजीबाबा हा दबाव, सबब पुढें चालावयाची हाव सोडून मागें ग्वालेरीचे मैदानांत आले तेथे अबोजी इगळे व महादजी शिंदे एकत्र होऊन घेराघेरी आरंभिली. ऐसा क्रम ८ महिने चालला. कज्याखीचें आग महादजी शिंदे यांजला हीन अगामुळें कमी, सबब बेजार झाले. मग मातुश्री बाईसाहेबास पत्रें पाठविलीं कीं, फौजेची मदत करावी त्यावरून बाईसाहेबानीं बाळूजी इंगळे सरदार व राजाराम रणसोड बराबर देऊन, दहा हजार फौजेनिशीं शिंदे यास सामील झाले. क्रम तोच घेराघेरीचा प्रसग. त्यात पलटणवाल्यांनीं महादजी शिंदे मागें असत असी बातमी ठेऊन, चार तोफा, एक पलटण शिरोंजचे सुमारें जाऊन, तिकडून उलटून महादजीबावावर छापा टाकला. पाटिलबावांस जिवंत धरावें असा समय

---

(५६) **निमक खाण्याची शर्त करून** – निमक हलालीची शर्थ करून, खाल्ल्या मिठास जागून. **निमक** – मीठ. **जुवामर्दीने** – पराक्रम करून. **देह अवसान जाहले** – ठार झाले. **हमराहा** – येथें अर्थ उत्साहित. **फिके पडून** – लज्जित होऊन, अब्रू जाऊन. **सांजसकाळ** – दिवस रात्र न पहाता सारख्या मजली करीत. **कज्याखी** – जातीनें केलेले कष्ट किंवा पराक्रम. **हीन अंगामुळे** – पानपतच्या युद्धांत महादजीचा पाय लगडा झाला होता, यामुळें. **क्रम तोच घेराघेरीचा प्रसंग** – गनीमी काव्याचें सतत धावपळीचें युद्ध. **मागें असता** – मागें आहेत, अशी बातमी काढून.

प्राप्त झाला होता. होळकरांकडील फौज बाजूस होती. त्यांस समजल्यावर, सरदार धरला जातो जाणोन, मागील चार घटका रात्रीचे संधींत घोडें घातलें. पलटणें कापून चारी तोफा घेतल्या. फत्ते झाली. व पुढें अघाडीस अंबोजी इंगळे यांनींही एक पलटण झामडलें. नक्ष जमला असतां महादजी शिंदे यांनीं हैबत खाल्ली. छापा खाल्ल्यावर तिसरे दिवशीं, मागील चार घटका रात्र आहे तों बाळाराव दिवाण व राघो मल्हार पोतनीस यांनीं मसलत केली. फौज कमी. तेही खर्चाचे अडचणीमुळें तन देईना. तेव्हा जातीनें उज्जनीस जाऊन खर्चाची सरबरा व देशीं लिहून आणखी फौज आणून मुकाबल्यास यावें असा मनसबा सिद्ध करून, राजाराम रणसोड होळकराकडील याजला बोलावून बराय मसलत विचारली कीं, "आम्हीं असा विचार काढला आहे, ही गोष्ट कशी ?" मग राजाराम रणसोड यानीं बहुत निषेध केला कीं, "उज्जनीस जाऊन मसलतीचा सजल पाडणार, तोंपर्यंत समोरचा हरीप तुमची येण्याची वाट पाहील कीं काय ? उज्जनीस येऊन गोळे करणे त्यास अवघड तें काय ? यास्तव मसलतीचा सजल येथील येथेंच करणें ती करावी. पुण्याहून फौज व खर्चाची सरबरा होऊन त्या भरवशावर यासी पुरें पाडणें हें घडत नाहीं. तुम्हास न तोले तर नजीबखान दिल्लीचा वजीर याजपाशीं लाख स्वार व तीन लाख पायदळ व बाराशें तोफा चालू आहेत. त्याजकडे वकील पाठवून पुढें मुलूख सोडविला जाईल त्याची सहा आणी त्याजला कबूल करून त्याची फौज आणवावी म्हणजे सहजच इभ्रत पडेल." ही गोष्ट पाटिलबुवाचे मनास रुचून, "अत्याजी ! तुमचा त्याचा विशेष मेळ आहेच. तुम्हीं हें काम करावें." (असे बोलले) मग याचे सरदार त्रिंबकजी इंगळे पैक्याचें झाड. फौज खर्चाचें तोंड. सबब इंगळे यांनीं आपलें अंग काढून सरदारी राजाराम रणसोडदास याचे गळा घातली. नित्य गांड घोडें खर्चाची अनुपत्य जाणोन, येथें राहण्यांत आपली पुरें पडत नाहीं. महेश्वरास उठून जावें तर नाकाबली येती. तेव्हा ही मसलत कबूल करून, पंचवीस हजार रुपये पाटिलबावांपासून घेऊन दरकूच जयपुरास आले. जयपुरीं हिंमतबहादर गोसावी मशारनिल्हेस भेटले. त्यास त्यानीं मसलतीचा ओघ

(५६) **झामडले** – झडप घातली. झडप घालून लुटले. **नक्ष जमला असता** – शत्रूवर मराठी फौजेचा जोरा किंवा वरचष्मा बसला होता अशा वेळीं. **हैबत खाणें** – कच खाणें, भीति घेणें. **तन देणें** – छाती करणें. **सरबरा** – तरतूद. **सजल** – सज, उपक्रम. **इभ्रत पडणें** – दरारा किंवा वचक बसणें. **अनुपत्य** – चणचण, ठणठणाट, अनबाप्ति. **नाकाबली** – नाकाबिलात, नादानपणा. **मसलतीचा ओघ** – इतिहास, पूर्वपीठिका.

सांगितला. त्यांनीं उत्तर केलें कीं, " तुमचा आमचा भाईचारा, ऐकाल तर नेक-सल्ला सांगूं. " पंत मशारनिल्हे यांनीं उत्तर केलें कीं, " या विदेशांत आम्हांस तुमच्यासारखा रफिक कोण ? सरकारची फौज कायम राहून गुजारा चालेल ऐसें कांहीं सांगावें. " मग गोसावी बोलले कीं, " नजीबखान तुम्हीं पाहिला, तो आतां राहिला नाहीं. दिल्लींत आल्यावर नेकबंद, खरीच चाल, एक भाषण, तें कांहींच राहिलें नाहीं. आम्हीं रात्रंदिवस जवळचे राहणार, त्यास सहा सहा महिने वर्ष वर्ष आमचें दर्शन नाहीं. तेव्हां तुम्हीं जाऊन तुमची भेट होयास वर्ष सा महिने पाहिजेत. इतक्यात तुम्ही खर्चाचे कोचवणींत येऊन डेऱ्याचे दांडे होतीलना ! शिंद्यावर उपकार व धन्याची चाकरी. यास्तव आमचे मतें तुम्हीं याच जिल्ह्यांत काळ काढावा हें चांगलें " कोणे रीतीनें काळ काढावा ? तेव्हा हिंमतबहादर बोलले कीं, " आम्हीं नवाबापाशीं त्रासून येथें आलो. राजास शपथ केले. त्याचें म्हणणें भाईभेट यानीं आम्हांशीं फेरबदलीच्या गोष्टी करतात. यात एकादोघाचें पारिपत्य केलें असतां जरब पडून बंदोबस्त होईल. तुम्हीं ही गोष्ट करावी. त्यास आम्हांस या जिल्ह्यात काळ काढणें. सर्वांशीं भाईचारा. वाईट कोणाशीं व्हावें ? यास्तव तुम्हीं विदेशीं. तुम्हापासून ही गोष्ट घडावयाजोगी. तुमचा व राजाचा मेळ करून देतों. " यांनीं उत्तर केलें कीं, " टोंक, रामपुरा हे आमचे महाल. हे अकलेश सोडून देऊन बाईसाहेबांशीं सफाई करावी म्हणजे आम्हास राहण्यास प्रशस्त. पोटापाण्याचा बंदोबस्त करावा. सांगाल तरी चाकरी करूं. " त्यांनीं कबूल करून राजाशीं बोलणें केलें. त्यानीं ही गोष्ट कबूल करून यान्या त्यांच्या भेटी झाल्या. त्यानीं टोंक, रामपुरा, अकलेश सोडून, विसा लक्षाची जायदाद फौजेस लाऊन देऊन, कामकाज सांगण्याचें तें सांगितलें. बाईसाहेबाचें संमत आणून तेथें राहिले.

( ५७ ) इकडे फिरंग्याचे पलटणास घेराघेरी चाललीच होती. तों काशीचा राजा चेतसिंग यानें जमीयत करून फिरग्याचीं पाच पलटणें कापून काढलीं. काशीचे राज्यांत टोपी पाहिली असता कंठस्नान घालावें हा क्रम चालला. तेव्हां पलटणास

---

(५६) **भाईचारा** – दोस्ती, स्नेह. **नेकसल्ला** – योग्य तोच सल्ला. **रफीक** – स्नेही. **गुजरा** – गुजारा, उपजीविका. **नेकबंद** – नेकीनें चालणारा, प्रामाणिक. **खरीच चाल** – सरळ वर्तणूक. **एक भाषण** – एकवचनी, दिलेला शब्द पाळणारा. **कोचवणी** – तगी, अडचण. **डेऱ्याचे दांडे होणें** – डेऱ्याचें कापड झडून जाऊन फक्त दांडे शिल्लक राहणें. भावार्थ गळाठा होणें, दुर्दशा होणें. **भाईभेट** – भाईबेटे असें पाहिजे. **अकलेष** – अक्लेश, विनायास. **जायदाद** – जहागीर.

पायबंद पुरकस बसला. मग त्यांनीं पाटिलबावाशीं सलूख करून निघोन गेले. जाट गोहदवाला फिका पडला. मग पाटिलबावांनीं ग्वालेरचा किल्ला घेऊन तमाम अंमल फैल केला. शेवटीं गोहदही घेतली. जाटास धरून कैद केले. तों इकडे नजीबखानाचा काळ दिल्लीस झाला. तेव्हां सुनें रान पाहून, चमडावती उतरून आग्र्याचा किल्ला घेतला. त्यासमयीं लाला नौबतराय कोणी कायस्थ पाटिलबावांचे तोंडीं लागला होता. त्याजला फौजेची कंपूची बक्षिगिरी सागून, जिवबादादा, बाळोबातात्या वगैरे शेणवई यांचें कांहीं एक न चालता लाला नौबतराय सांगेल ती पूर्वदिशा. आग्रा येथील किल्लयात अंमल फैल करून जयपुरचे मुलखांत स्वारी आली. जयपूर-वाल्यांनीं, जोतपुरवाले व अमदानी, नजीबखानकडील सुभा व आपली जमीयत एकत्र करून लालसोडचे मुक्कामीं मुकाबला केला. अमदानी यानें हवा पाहून, लाला नौबतराय याजला तीन लक्ष रुपये देऊन फितूर केला. लढाईचा मोहरा यांचा त्यांचा लागला. एक दिवस तर फितूर समजण्यात आला नाहीं. दुसरे दिवशीं निकराची लढाई, पलटणें कपू मुकाबल्यास उभा. एक ताशिरा खालीं चालवून लाला नौबतरायसुद्धा पलटणें उठून गेलीं. राठोडानीं हल्ला केला पाटिलबावास जिवंत धरून द्यावा हा इरादा. तो ईश्वरी कृत्य. आमदानीस हत्तीवर गोळी लागून कामास आला. त्याची फौज बेबाद होऊन गेली. जयपुरवाले लबाडच, तेही तारगोवारगी राहिले. राठोडानीं निःसीम चालवून घेतलें. महादजीबावास धरून द्यावें तों विंचूर-कर यानीं आडवे घोडे घालून, राठोड थोपवून कटा केला, यामुळें पाटिलबावांस सवड पाऊन ग्वालेरीस आले. पागोटें टाकून फेटा बांधिला. जुने मुत्सदी यांचे गळां हात घातले. "केल्या कर्मांचें फळ ( मला ) पावलें. आतां संभाळावयाचें

---

(५७) **पुरकस** – पक्का. **अम्मल फैल केला** – आपले अम्मलदार नेमले. **चमडावती** – चर्मण्वती नदी. **तोंडी लागणें** – प्रियपात्र बनणें. **हवा** – रागरंग पाहून. **मोहरा** – तोंड. **एक दिवस तर** – एक दिवसपर्यंत. **ताशेरा खालीं चालविणें** – बंदुकीची फैर शत्रूच्या अगावर न सोडता खालीं जमिनीवर सोडणें. भावार्थ, लढाईचें खोटें सोंग दाखवून. **बेबाद** – बेबद असे मुळांत असावें. 'ब' 'बा' चा मोडीवाचनांतील घोटाळा. **तारगोवारगी** – ? **कटा केला** – 'खट्टा केला' असे तर मुळांत नसेल ? कटा असाच शब्द धरल्यास कत्तल केली असें होईल. **पागोटें टाकून फेटा बांधला** – उद्वेग किंवा शोक दर्शविण्यासाठीं. **जुने मुत्सद्दी यांचे गळा हात घातलें** – जुन्या मुत्सद्यांची पुनः विनवणी केली. **फळ पावलें** – फळ ( मला ) पावलें. **हमराह केली** – बरोबर दिली किंवा एकत्र केली.

असल्यास संभाळावें. " ( असा पश्चात्ताप केला. ) तेव्हां सर्वांनीं विचार करून मराठे फौज हमराहा केली.

( ५८ ) आग्र्याचे किल्ल्यास बादशाही सरंजामपैकीं नजीबकुलीखान यानें आग्र्यास मोर्चे लाविले. किल्ल्यांत लखोबा अंतरीवाला होता. यानें खूप किल्ला लढवून ग्वालेरीस पत्रें पाठविलीं कीं, कुमक आल्यास उत्तम आहे. आतां आमची पराकाष्ठा झाली तेव्हा फाळके वगैरे पथकें थोरल्या लखबाच्या बराबर देऊन आग्र्यास किल्ल्याचे मदतीस पाठविले. यांनीं जाऊन, नजीबकुलीखान आग्र्याचे किल्ल्यास लागला होता, त्याशीं लढाई करूच मोर्चे उठविले. मथुरा वगैरे ठाणीं कायम केली.

( ५९ ) इकडे रजवाडेमात्र लहान मोठे एकत्र होऊन विचार केला कीं, दक्षण्याचा अंमल ज्याच्या जिल्ह्यात, त्यानें ( तो ) उठवून द्यावा. ऐसीं पत्रें रामपुरा व सावेर व इदूरपर्यंत आलीं. या मसलतीस रुकार बुंदी कोटेवाले यांचा मात्र पांच विश्वे. तुमचा अवघ्याचा नमूद सिद्ध झाल्यावर आम्हासही करणें अवघड तें काय ? असा लपेटवार रुकार देऊन, तरतें बुडतें पहावें या बेतात. बाकी चद्रावतानीं रामपुरा घेतला. उदेपूरची दहा हजार फौज येऊन निंबहेडा, जावद वगैरे ठाणीं उठविलीं सावेरचे जमीनदारदेखील बाहेर पडले होते. राणाजीची फौज येऊन निंबहेडा, जावद वगैरे ठाणीं उठविलीं. तेव्हा बाईसाहेबानीं आबाजीपंत, राघो रणसोड पागनीस याचे मावसबंधु, याचेबराबर हुजरात सरंजाम दीड हजार व काहीं शिलेदार ऐसी तीन हजारांची भीडभाड त्याचे मुकाबल्यास पाठविलीच. चकरडा प्रात मेवाड येथील मुक्कामीं राणाजींचे फौजेनें दोन प्रहरा छापा घातला. अंबाजीपत मारले गेले. फौज रणभरी होऊन जावदेस जमा झाली. हें वर्तमान

---

(५७) **मराठे फौज हमराहा केली** – खरी विश्वासाची दगा न देणारी अशी आपल्या देशाची मराठी फौज बरोबर दिली.

( ५९ ) **मात्र** – झाडून सर्व. **रजवाडेमात्र** – झाडून सारे रजवाडे. **पांच विश्वे** – अर्धवट, संपूर्ण नाहीं असा. **नमूद** – मसलत. **लपेटवार रुकार देणें** – रुकार म्हणजे मान्यता असें लिहून देताना पुढें लपेटींत "नाहीं," असें लबाडीनें लिहून ठेवणें. भावार्थ, पळवाटीस जागा ठेवून मान्यता देणें. **तरतें बुडते पहाणें** – बुडेल त्याची बाजू टाकून देणें व तरेल त्याची बाजू धरणें. भावार्थ, आधी कोणाचाच पक्ष न धरता जो विजयी किंवा बळवान् ठरेल त्याची बाजू घेण्याचें स्वार्थी व लबाडीचें धोरण. **भीडभाड** – सैन्य, जमाव. **रणभरी होणें** – भय खाऊन रणांतून पळून जाणें.

महेश्वरी मातुश्रीसाहेबांस समजतांच, आबाजी रणसोड पागनीस यांचे डेरे बाहेर करून, शरीफभाई निसबत पागा हुजरात याजला पाठवून, करवंदीप्रमाणें थालनेर येथें पेंढारी पडले होते ते दरोबस्त आणून, जमादारांस मेजवानी करून वस्त्रें दिलीं. आणि ताकीद केली कीं, "मेले हो ! तोंड दाखवावयास आलां, तर मेकसू घालून मारून टाकीन मेवाड होतें कीं नव्हतें असें करून टाका." पेंढारी व आबाजी रणसोड व शरीफभाई रवाना झाले. शिलेदारांची तार बांधवून दिली. परंतु चकरड्याची लढाई मारल्यावर मेवाड हमराहा होऊन चंद्रावतांकडून रामपुरा घेववि़ला. तेव्हा उज्जनीस शिंद्यांकडील कुटुंबें होतीं. त्यांचें धैर्य हत होऊन, महेश्वरास पत्रें बाईसाहेबांस आलीं कीं, "आम्ही आपलेजवळ येतों." त्यास उत्तर बाईसाहेबांनीं लिहिलें कीं, "आल्यास तुमचे घर आहे. परंतु नक्षास बाध पडतो. तसाच प्रसग पडल्यास तीन प्रहरात तुमचेपाशीं दाखल होईन, घाबरू नये." असें उत्तर लिहून खाजगत डेरा बाहेर दिला. तेथें रोज फौजेचीं हजरी. शंभर स्वार आले ते रवाना केले पन्नास आले ते रवाना केले. पाचशें आले ते रवाना केले. आबाजी रणसोड व शरीफभाई तिसरे दिवशीं रामपुऱ्यास गेले. जाताजाताच मोर्चे लागले. हें वर्तमान मेवाड्यांस समजताच कूच करून दोन मजला चळद उतरून आले. हें वर्तमान आबाजी रणसोड व शरीफभाई यास समजतांच रामपुरीयाचा शह सोडून संजीतीस मुक्काम केला. त्याचा याचा छटा सा कोसाचा राहिला. तेव्हां रागड्यास खबर जाताच, दबाव पडून चळद उतरून गेले. सडा स्वार उतरून गेला. बुणगे चळद उतरत होते इतक्यात पेंढारी पोंचून बुणगे लुटून आणिले. दोनशें उंट व दीडशें घोडें शिवाय बैलबधीया घेऊन आले. शरीफभाईनीं आबाजी

---

(५९) **करवंदीप्रमाणे थालनेर येथे पेढारी पडले होते** इत्यादि – करवद बारीस पुष्कळ पेंढारी होते. तसेंच थालनेर येथें पेंढारी कामावांचून बसून राहिले होते त्यास आणविलें. **मेकसू** – मेखसू. कपाळमोक्ष करण्याकरितां डोक्यांत हाणतात ती मोठी लाकडी मोगरी. तंबू राहुट्यांच्या मेखा ठोकण्यासाठीं उपयोगांत आणतात तो हातोडा. **तार बांधवून देणें** – एकसारखा पुरवठा होण्याची तजवीज करणें. **मेवाड हमराहा होऊन** – मेवाडचा राजा होळकरास मिळाला. **धैर्य हत होऊन** – धैर्य गळून. **नक्षास बाध पडतो** – तुमच्या अब्रूस कमीपणा येईल. शिंद्याच्या बायका भीतीनें पळाल्या असा शिंद्याचा दुर्लौकिक होईल. म्हणून तुम्ही आहा तेथेंच रहा **छटा** – छट्टा, अन्तर, फासला. **बैलबधीया** – भारदारीचे बैल. 'बधीया' हिंदुस्थानी शब्द आहे, त्याचा अर्थ a bullock; any gelded animal असा सांपडतो.

यांजला सांगितलें कीं, तुम्ही कूच करून चला, खडेदम लुटून घेतों. परंतु उभयतांनीं ऐकिलें नाहीं. मग मकाजी गिते शिलेदार यांच्या तैनातीस होते. त्यांजला दम देऊन अर्धे रात्रीं कूच करून पेंढारी घेऊन गेले. आबाजी शरीफभाई यांजला न पुसतां यशाचा अभिलाष सर्वत्रास, मुकाबल्यास गेले. तेथें रांगड्यांनीं बुणगे काढून सडा स्वार उभे होते. अंधाराचा मामला. यांच्या मतें कालच्यासारखें बुणगेंच आहेत. पेंढारी यानीं तोंड लाविलें. तोंड लावताच रांगड्यांनीं सडकलें. तों पाच चार पेंढारी जाया होतांच यांनीं पळ काढला. दामदस्त पेंढारी नाहींसा झाला. इकडे लष्करांत खबरही नाहीं. मागील सा घटका रात्र राहतां फौजेचे कूच होऊन दिवस उगवतांच चळदचे कांठीं मुक्काम झाला. कोणी खोगीर उतरलें, कोणी उतरतो, कोणी घोडयावरच, तों नदीचे पार फौजेचा धुराळा उठून राहिला पेंढारी दोन दोन कोसावर तुंगचे तुग उभे. तों रांगडयांनीं मकाजी गिते यांस जिवंत धरावें या भावीं गराडा घातला मकाजीपाशीं पागेचे स्वार मात्र दहा बारा. मकाजी गिता जुवामर्द, जातीनें शिपाई, हासडयाचे बळें रांगडा जवळ फटकू दिला नाहीं. तशात गांडीखालील घोडा पडला तेव्हा पायउतारा होऊन मरणोन्मुख होऊन हातांत भाला, स्वार जवळ येऊं दिला नाहीं. इतक्यात मशारनिल्हेच्या पागेचा कारकून नारो सिद्धेश्वर व चोपदार बोंब मारीत आले. त्या रांगडयाची सरशी ऐकून पेंढाऱ्याचे बुणगे काठाशीं होतें, त्यांनीं आवळाआवळ करून मल्हारगड पाहिला. मग आबाजींनीं केशवराव फणसे तीनशें स्वाराचें पथक रवाना करून पार उतरून दिलें. त्यानें जाऊन मकाजी गिते याजला शाबुतीनें काढून आणिलें. तों रागडे हमराहा होऊन, पन्नास राऊत उठून फणसे याचे मागें लागले हे त्या स्वराशीं खेळत खेळत येत आहेत रागडे गालभ, ते आबाजी व शरीफभाई डोळ्यानें पाहतात. दरम्यान नदी मात्र. तों आबाजीपाशीं शंभर राऊत हुजरातीचा. भरवशाचीं माणसें. हे घेऊन, नदीचे कांठीं येऊन, ठासण करून गोळ्या मारूं लागले. त्यांत ईश्वरी कृत्यानुसार रागडयाचें पन्नास स्वारात अग्रगण्य पजू जमादार सिद्धी व मालजी मेहता व चतरसिंग चेचाणी व बहादरसिंग सादुडीवाला आणखी एक दोन याला गोळ्या लागून कामास आले. बाकी राहिले ते गलबलले. तों

(५९) **खडे दम** – याच दमांत, उभ्या उभ्यां. **दम देऊन** – धीर देऊन. **जुवा–मर्द** – जवान–मर्द. **तुंगचे तुंग** – ठिकठिकाणी घोळके करून. **हासड्याचे बळे** – 'बासड्याचे बळे' असें पाहिजे. **बासडा** – भाला. **मरणोन्मुख होऊन** – मारू किंवा मरू असा निश्चय करून. **गालभ** – गालब, जोर चढलेले. **ठासण** – ढासण, दबा, मा-याची जागा.

शरीफभाई यांचे हातास रामपुऱ्यावर गोळी लागली होती. रांगड्यांचे स्वार गलबलले पाहून, नदींत घोडा घालून पार झाला. तों मागाहून निराजी शामराज हुजरातचें स्वार घेऊन तोही उतरला. रांगड्यांचे राहिले स्वार तेथेंच कापून टाकले. पुढें घोडे उचललें तेही हें चिन्ह ( पाहून ) पेंढारी जवळपास होतेच त्यांनींही उठावणी केली. तें मारीत मारीत एकलिंगजीपर्यंत गेले. कपेश घोडे पांच हजार बाराशें मेहनतीच्या श्रमानें मेले. बाकी लूट कायम आली असेल, ती पेंढारीचे पेंढारी जाणेत.

( ६० ) सादडीवाला राजे सुलतानसिंग घरला आला. दुसरे दिवशीं कूच करून जावद, निंबहेडा, राणीपुरा वगैरे किरकोळ महालात ठाणीं बसवून रामपुऱ्याकडे आले. रामपुराही सातात्रिसा दिवशीं अमल झाला. चन्द्रावत पळून अमदेस गेले. अमदेस मोर्चे लागले. ज्वाळा तोफ रामपुऱ्यास होती ती आणली. मोर्चे जमवून ज्वाळा जाया होती ( सबब ) निमे बार भरून एक गोळा मारला. इकडील अलग फोडून, भवानसिंग निजला होता त्याचे खपरेल उडून पलीकडील सफेल फोडून गोळा पार झाला त्यातच त्याचे टाके ढिले झाले. दुसरे दिवशीं हल्ला करावा असा आबाजी रणसोड, शरीफभाई याचा विचार ठरल्यावर हें वर्तमान चद्रावतास समजलें. त्यांनीं मार्गांत दारू बिछावून दिली कीं, हल्ला येताच बत्ती द्यावी, म्हणजे माणसें उडून जातील. अशा भावीं दगा केला. इकडे मार्तंड साध्य. हल्ला आला नाहीं. तो अगोदर, भवानीसिंगाचे बधु सोभागसिंग किल्ल्याबाहेर माणसें बसविण्यास आले. त्यातून तोडयाचा गूल पडून दारूचा भपका उडाला. तों पन्नास माणूस जळून जातीनें सोभागसिंग फार जळाला. इतक्यात हल्ला जाऊन पोंचला. त्याजला उचलून नेण्याचें किल्लेवाल्यास न बनता किल्ल्यांत सापडला. परतु किल्लेवाल्यानीं हल्ला मारून काढला. सोभागसिंगास घेऊन आले. त्यानें रदबदल फार केली. परतु न ऐकता सोभागसिंग चद्रावत यास तोफेच्या तोंडीं देऊन उडवून दिला. चद्रावतात शूरत्वाचा व कर्तृत्वाचा तोही खर्ची पडला. तेव्हा भवानीसिंगाची हिंमत न पुरता तीनशें स्वारानिशीं रात्रौ पळून गेला. चोहो-

(५९) **घोडे उचलले** – घोडे उडविले, दौड केली. **तेही** – त्यांनी. **हें चिन्ह** – हा रागरंग.

(६०) **सातावीसा** – सत्ताविसाव्या. **ज्वाळा** – तोफेचें नांव. **अलंग** – तट. **सफेल** – तटावरील गच्चीची ठेंगणी भिंत. **टाके ढिले होणें** – घाबरणें. **बिछाऊन देणें** – पसरवून देणें. **तोडा** – बदूक पेटवण्याकरिता उपयोगात आणतात तो काकडा. **गुल** – ठिणगी. **तेव्हां भवानीसिंगाची हिंम्मत न पुरता** – भवानीसिंगाला दम न राहून.

करून जलुष वाढून पूर्ववत् बंदोबस्त राजास राज्य, प्रजास चैन ( झाले ) पुण्यास खबरा गेल्या. नाना फडणीस यांस वर्तमान समजून तोफा सोडून शिरेदरबार बाईसाहेबांचें स्तुतिस्तोत्र सहा घटिकापर्यंत गेलें. शापादपि शरादपि असे बायकांत अहिल्याबाई दिसण्यांत आली. आजपावेतों स्नानसंध्या धर्माची प्रवृत्ति एकण्यांत येत होती. आज पराक्रमाची गोष्टहि मोठीच केली. पुण्याचा दरवाजा म्हणजे माहिष्मती नर्मदा तीरचे, आम्हांस आज समजलें. सपूर्ण मानकरी सरदार यांनीं माना डोलविल्या.

( ६१ ) पाटिलबावा ग्वालेरीस, फौजेची कमती, खर्चाची अडचण बदनक्षीचा बुरखा, यामुळें रात्रदिवस चैन नाहीं. तेव्हा शेणवाई माणसें मोठीं सदाशिवभाऊ व जिवबादादा व बाळोबा तात्या आदिकरून यांनीं आपसात छाती चालवून पचवीस लक्षाची तजवीज करून, देशीं जाब गावीं बाळाजी जनार्दन होते त्याजकडे कांहीं ऐवजाचा भरणा करून, दहा हजार फौज नवी कलमजारी करून आणविली. त्यांनीं फौज ठेवून, बापूजी जनार्दन कनिष्ठ बंधूसमागमें देऊन फौज रवाना केली. तेही अमद मुक्कामीं येऊन पावले. त्या काळीं ग्वालेरहून शिंदे याचीं पत्रें दिवसातून दोन तीन आबाजी रणसोड, शरीफभाई यास येत होतीं. याचेही मनांत मदतीस जावें. तों देशीहून सुभेदार, शिंदे सोबती अडचणींत यास्तव नाना फडणीस याजशीं बोलणें केलें कीं, " सोबती अडचणींत. आम्हास आज्ञा द्यावी. आम्हीं मदतीस जाऊ." त्यानींहि विचार करून ' उत्तम आहे ' म्हणून शिरस्त्यान्वये बिदा केले. पुण्याहून वस्त्रें घेऊन माहिष्मतीस आले. अगोदरचे दश, त्याची सफाई पांच वर्षें संशयाची निवृत्ती तुकोजी होळकर सुभेदार याचे लक्षांतील निदर्शनें परभोरें झालीं.

---

(६०) **जलुष** – दरारा, दबाव. **राजास राज्य प्रजास चैन** – राजाला राज्य व रयतेला सुख अशी सुस्थिति निर्माण झाली. **नर्मदा तीरचे** – नर्मदा तीरावरील. **माहिष्मती** – महेश्वर. **पुण्याचा दरवाजा इत्यादि** – पेशव्यांच्या राज्याची उत्तरेला पहिली चौकी महेश्वर असें तुम्ही सिद्ध केलें.

(६१) **बदनक्षीचा बुरखा** – दुर्लौकिक झाल्यामुळें बाहेर तोंड न दाखविण्यासारखी झालेली परिस्थिति. **नक्ष** – लौकिक. **बदनक्ष** – दुर्लौकिक, महादजीला लढाईत फार मोठा पराभव खावा लागल्यामुळें लौकिकांत त्याची अब्रू साहाजिकच कमी झाली होती. **छाती चालवून** – हिय्या करून. **जांब गांवीं बाळाजी जर्नादन होते** – हा बाळाजी जनार्दन म्हणजे नाना फडणवीस नव्हे. शिंद्याचा पदरचा कोणी मुत्सद्दी. **कलमजारी करणे** – पत्रें पाठवून नवी सैन्यभरती करणें. **सोबती** – शिंदे.

यामुळें श्रीमंत दयाळू, कागदीपत्रीं सफाई झालीच होती. आज्ञा घेऊन हिंदुस्थानांत जाण्याचें समत अगोदर बाईसाहेबांचे आणून, मग नानाशीं बोलण्याचा उपयोग. श्रीमंतांकडून बिदा होऊन महेश्वरीं आले. भागाबाई, काशीराव होळकराची कन्या, हिचें लग्न करून कालगावडे मोत्याजीबाबाचे पुत्रास देऊन, अंबोजी इंगळे शिंदे याजकडून आले. ते सालशी दाखवावयास गेले. स्वार सरंजाम उज्जनीस ठेवून, एक पालखी, एक घोडा, पांच चार शागीर्दपेशाचीं माणसें असी जाबेपर्यंत येऊन, तेथें शागीर्दपेशा अवघे टाकून, एक घोडा, दोन माणसें घेऊन शहरात आले. घोडा माणूस शहरात सोडून, एक माणूस आपण रोजची प्रवृत्तीसारखें जाऊं लागले. ते किल्ल्याचे दरवाजात जाऊन बगल्यात शिरून रामराम मातुश्रीस करून बसावयास लागले. मातुश्रीसाहेबानीं ओळखून डोळे फाडून बोलली कीं, "मेले हो, सोदे हो, चार सोदे मिळून शिंदे याचे दौलतीस वक्का दिला. तसी बयमानी करून येथेंही छद्म करू पाहता. परतु मेखसू घालून डोकसें फोडून टाकीन." ऐसें बोलून शिरेंदरबार उठवून दिलें. करावयास गेले साधाकपणा, त्यास श्रीमंतीचे समजण्यांत आलें कीं लबाडी करून चवकशीस बट्टा काढला. हे समजुतीस येऊन जरब दिली. तो साधला. गोविंदपंतदादा खाजगीवाले याजकडे जाऊन, लाख रुपये नजर देऊन, त्याच दिवशीं मर्जी संपादून लौकिक व्यग दिसू दिलें नाहीं.

( ६२ ) पुढें सुभेदार कूच करून चालले. तेव्हा पुढें काशीराव होळकर यांचे बरोबर फौज व पाडुरग शकर मुखत्यार करून देऊन, पुढें रवाना करून, मागाहून खासा स्वारीचे डेरे बाहेर होऊन पंधरा दिवसात कूच झालें. मेवाड येईतों पावेतों इंगळे बराबर होते. भिलाड्याचे मुक्कामीं आलीयावर आपला प्रसर होत नाहीं असें पाहून, युक्तीनें आज्ञा घेऊन ग्वालेर प्रांतीं गेले. भिलाड्यास मुक्काम

---

(६१) **सालशी** – साळसूदपणा, सचोटी, गरीबी. **रोजची प्रवृत्ति सारखे** – रोजच्या प्रवृत्तिसारखें, नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें. **बयमानी** – बेइमानी. **छद्म** – कपट. **श्रीमंती** – श्रीमताचें स्त्रीलिंगी रूप. येथें श्रीमती ही पदवी अहिल्याबाईस लाविली आहे श्रीमत पेशवे तशी ही श्रीमती अहिल्याबाई. श्रीमती म्हणजेच श्रीमति. **चवकशीस बट्टा काढणें** – चवकशी म्हणजे जुन्या काळच्या टाकसाळींतील, खरीं–खोटीं नाणीं तपासून घेणारा अधिकारी. त्यावरूनच 'चोकशी' हे आडनांव पारशांत, गुजरथ्यांत रूढ झालेलें आढळतें. येथें भावार्थ कीं, अंबोजी इंगळ्यानें सरकार कामांत स्वतःचा स्वार्थ साधला. **समजुतीस येऊन** – समज करून घेऊन.

(६२) **प्रसर** – प्रवेश.

फार झाले. तळ सडक चार कोस. मागें पुढें होण्यांत बमण्याची गढी चौबुर्जी त्या गढीवरून रंव पडली. ठाकूर पाच सात दहा माणसें पारावर बसलीं. सरकारस्वारी निघून गेली भेटी केल्या. सर्वांशीं रामरामी झाली. रवेचा तमाशा पहात बसले होते तों जिवबा आणा सबनीस याचे बंधु यास कांहीं गैरआराम सबब पालखींत होते. यास बिगारी पाहिजे होता म्हणून गावकऱ्याकडे जासूद पाठवून बिगारी आणविला. ठाकरानें उत्तर केलें कीं, आम्ही भले माणूस शिपाई बसलों आहोंत. गावांत माणूस असल्यास बेगारी आणून देऊ, असें माणसानें येऊन सांगितलें. यानीं तोराखाळीं सागितलें कीं, त्यातून एक ओढून आणावा. तेव्हा जासूद पुन. जाऊन एकास ओढलें. तों गावचा ठाकूर ओढून आणला त्यानें बहुता प्रकारीं सागितलें कीं, मी ठाकूर गावचा आहें. क्षण दम धरा. बिगारी आणून देतों. असें नरम बोलताच, सबनीस यानी शिवी दिली. शिवी ऐकताच तरवार मेणातून ओढून सबनीसावर हात टाकिला तों पिंजणी नव्हती दाढी तोडून गर्दन एका हातानें वेगळी केली. आणखी दोघे चौघे जरबाऊन गावात गेले. सबनिसाचें वर्तमान सुभेदाराला समजताच स्वारी माघारी आली. येताच गराडा घालून हल्ला केला. रागडयांनीं तीन मारून काढले. मग शेवटीं सुभेदारानीं बापू होळकर याजला शिव्या दिल्या. 'तुम्हीं एकीकडे व्हावें. आम्ही हल्ला करतों.' मग बापूसाहेब पायउतारा होऊन कुदून पडले. गढीच्या चारी अलगा मजबूत, चढावयाचा लाग नाहीं. मग सयदूभाई यानें गोळे–माणसाचे डोकीवर हातावर गोळा, त्यात हात घालून वर चढावें असें हातावर गोळा, अशा तऱ्हेनें हल्ला चढला. त्यात रजपुतांनीं गोळ्या मारल्या. तेल कढवून टाकिलें. दगड जात्याच्या तळ्या त्याही वर टाकिल्या यांत

---

(६२) **सडक** – सपूर्ण किंवा आख्खे. **गढी चौबुर्जी** – बुरूज असलेली तटबंद लढाऊ गढी, किल्ला. **रंव पडणें** – सैन्याचें कूच होतांना एकामागें एक माणसांची लागलेली राग. **भले माणूस** – शिलेदार. **तोरा** – गर्व, ऐट. **पिंजणी** – गळ्याचें रक्षण करणारी कॉलर ? **दाढी तोडून** – गळा कापून. **कुदून पडणें** – उडी घालून पडणें, तुटून पडणें. **अलंग** – तट, भिंत. **लाग** – सोय. **माणसाचे डोकीवर, हातावर गोळा इत्यादि** – या वाक्यांचा अर्थ लागत नाहीं. तट चढावयास आलेल्या सैनिकाच्या डोक्यावर एक हातभर उंच अशा तोफेचा गोळा तटांत मारावा. मग त्या गोळ्यानें पडलेल्या भोंकांत हात घालून सैनिकांनीं वर चढावें. मग पुन्हा सैनिकांच्या डोक्यावर एक हात अतर ठेवून तोफेचा गोळा मारावा कीं त्या सैनिकांनीं त्या दुसऱ्या भगदाडात हात देऊन आणखी वर चढून जावें. अशा कष्टानें तट चढून तुकोजी होळकरांच्या सैनिकांनीं हल्ला चढविला !

माणूस जाया फार झालें. नक्षावर नजर. बापू होळकर जातीनें आंत कुदून दरोबस्त कापून टाकिले. एक बायको होती, ती मात्र मारली नाहीं. जिवंत धरून आणली. गर्दीत अर्थ पाहतां एका मडक्यात पावशेर दारू, याशिवाय धान्य अथवा कांहीं-एक नाहीं. त्या बायकोस लुगडेंचोळी देऊन सोडून दिलें. माणूस जखमी अतोनात झालें. ऐशी हजार रुपये जखमीना लागला. त्याशिवाय बक्षिसा. नक्षामुळें इतकें करणें प्राप्त. शिवाजी बल्लाळ प्रस्तुत हुजूर आहेत त्याचे घरचे पुरुष या दौलतींत, याजसुद्धा तरवारीखालीं अठरा कामास आले

( ६३ ) तेथोन अल्लीबहादरासुद्धा कूच करून मथुरे सुमारें महादजी शिंदे यांच्या भेटीचा इरादा धरला. तेव्हा नारो गणेश याचें कर्तृत्व पाटिलबावा यांचे ध्यानात. आजपावेतों डोंगरी मोर नाचविलें, आता अवघड पडले. ऐसें जाणून आबा चिटणीस याजला सामदामादि भेदार्थ पुढे सामोरें पाठविले. ते साता मजलीचे तफावतीनें येऊन भेटले नारो गणेश असताना चढवीत होते. त्याचे शांतवन एक रात्रींत करून, प्रातःकालीं नारो गणेश याजला बरावर पाटिलबावां-कडे घेऊन जावे असें ठरावून, आबाजी चिटणीस व नारो गणेश उभयता गेले. तों महादजीबावा जातीनें तीन मजला सामोरे आले. नारो गणेश याची व पाटिल-बावाची भेट झाली. नारो गणेश यांची जरब बाळगून पाटिलबावा होते. त्यातील कंपेशी आबा चिटणीस याची भेट झाली होती. खाशांची भेट झाली होती. खाशाची भेट होऊन भविष्यानुरूप बुद्धीचें ( वाटोळें ) होऊन रंगांत रंग मिळविला. पुढें सुभेदार व अल्लीबहादर याच्या व पाटिलबावांच्या भेटी झाल्या. तोफखाने सुरू होऊन पूर्वरग उत्तम झाला. मथुरेस आल्यावर मुलूख सुटला, त्याच्या वाटणीचा प्रसंग पडला. त्यात नारो गणेश याच्या बोलण्यांतील आशय, भेटीचे पूर्वी इरादा दिसत होता, त्यांतील समारोप होऊन बोलणें मिश्र पडू लागलें. तेव्हा मिलाफाचें

---

(६२) **आत कुदून** – तटाच्या आंत उडी टाकून. **जखमीना** – जखमी झालेल्या शिपायाना जखम बरी करण्यास मदत म्हणून देण्यांत येतो तो खर्च. **नक्ष** – प्रतिष्ठा, प्रतिष्ठेचें रक्षण.

(६३) **डोंगरी मोर नाचविणें** – मोठ्या आढ्यताखोरीनें वागणें. **कंपेषी** – न्यून. **इरादा दिसत होता त्यांतील समारोप होऊन** – पूर्वी जो इरादा म्हणजे हेतु त्यांनीं धरला होता त्याचा समारोप झाला म्हणजे त्यांनीं आपला हेतु बदलला, आणि म्हणून मिश्र बोलू लागले. **मिश्र बोलणे** – सरळ न बोलतां छक्के पंजे ठेवून किंवा कांहीं हातचें राखून बोलणें. **मिलाफाचे** – किलाफाचे असें पाहिजे.

बीजारोपण होऊन सुभेदारांचे मनांत विकल्प आला. पुढें महादजी शिंदे गंगास्नानास चालले त्यांचे समागमें नारो गणेशहि गेले. पुढें जातेंसमयीं शिलेदारी खर्चाची याद होऊन मोघम ऐवज राजश्री पाराजीपंतबावा याजकडून देण्याविषयीं आत्माराम शिवराम तांबोळी, वाकड्याचे गुमास्ते, याजला सांगून गेले. गंगेस गेलीयावर, गंगेच्या साक्षभूत काय बोलणें झालें असेल तें त्यांचें ते जाणोत, सुभेदारांकडे मुलुखाचे वांटणीबद्दल नव लक्षाचा मुलूख खुरजा, गडमुक्तेश्वर वगैरे महाल लाऊन दिले. अलीबहादराचें बोलणें खर्चास घेऊन स्वस्थ असावें. हे भाव बोलण्यात आणून महालच्या सोडचिठ्ठ्या घेऊन माघारीं आले. सुभेदारास सर्वार्थ समजाविला. त्यांत बोलणें मागील कांहींएक ओळख दिसण्यात न येता सोबत्याकडील कड धरून बोलणें पडलें. त्या बैठकींत मनओळखीचा प्रसर होण्यास आरंभ झाला हे कारभारी सरदार याचे मनओळखींत तथा राहिली नाहीं. ते दिवसापासून दिवाणाचे चालीचे पर्याय, मातुश्रीसाहेबास व श्रीमतांकडे नानास, कच्चे व्यवहार ज्यात अलीबहादरसहित प्रतिकूलता पै दर पै दर्शविण्यास आरंभ होऊन, जुने माणूस शिवाजी गोपाळ पारनेरकर याजला नानाचें संमतें बाईसाहेबानीं महेश्वरीं आणिलें. मग कैद करण्याविशीं दोहीकडील हालवत रजा आणविल्याच होत्या. तों पाराजीपंतबावास नानानीं विचारलें कीं, शिलेदाराची वाटणी कसी केली ? त्यानीं उत्तर केलें कीं, फडणिसाचे कागदात पाहून घ्यावें. मग खंडोपंतबावास विचारलें कीं, शिलेदाराच्या वांटणीच्या यादी दाखवा. त्यांनीं काढून दाखविल्या. त्यात सांगितल्याखेरीज शिलेदार कारकून याचें नांवें आठ दहा हजार रुपये जास्ती पडले. ते पाहून नारोपंतास अति क्रोध येऊन, खंडोपंतास अनिर्वाच्य शब्द शिरेकचेरींत बोलू नये, ते बोलले. तथापि खंडोपंत याजकडे कारकुनीचा पेशा, सबब खामोश करून उत्तर केलें कीं, हा राग आम्हावर काढून अर्थ काय ? देण्याघेण्याची मुखत्यारी आम्हाकडे नाहींच. सुभेदाराचे परवानगीनें पाराजीपंतबावाकडून देवऊन आम्हांकडून लिहिविलें तें आम्हीं लिहिलें. असें बोलल्यावर कमलदान उचलून मारावें. मारलें मात्र नाहीं. परंतु सुभेदार व पाराजीपंत या उभयताचा उद्धार ज्ञानाचा व उत्पन्न कसें होतें याचा उच्चार करण्यात सेव्यसेवकत्व राहिलें नाहीं. नंतर खंडोपंत यांणीं रुमाल आटोपून घरात आले. अंतःकरणास बहुत खेद केला कीं, रावजीपंतबावाचे संस्थानाशीं आजपावेतों अशीं भाषणें कधीं झालीं नव्हतीं. आम्हीं त्याचे सेवकांत असे कुलदीपक उत्पन्न होऊन, या अधिकारास प्राप्त झालों. मग अर्धरात्रीचें समयीं यजमानांचे चिरंजीव चिमणाबापू

(६३) तथा – बाकी. हालवत – हाल adj Quick जलदीनें. रजा – परवानगी.

हे रुमाल व कलमदान घेऊन सुभेदाराकडे गेले. रुमाल, कलमदान बापू सुभेदारापुढें ठेवून नमस्कार केला कीं, " या दौलतींत थोरले सुभेदारापासून रावजीपंतबावाचे घरचा अपमान कधींहि झाला नाहीं. तो मी कुलदीपक कारकून उत्पन्न— ( यापुढील कांहीं मजकूर गहाळ )

( ६४ ) चिरंजीव कांहींएक निघो पावलें नाहींत. कोट रुपये द्यावे म्हणोन चिरंजीव जातीनें उन्हांत उभे केले मुखें करून अनिर्वाच्य शब्द तसेच चालले. मग तोडगुळाची माळ घातली. तगाद्याची पराकाष्ठा केली. एकसारख्या अडीचशें घोडया हुजरातींत नेल्या, असेंच जें डेऱ्या रावटींत सापडेल तें सरकारात गेलें. शेवटीं पंधरा लाख ( ठरले ) मग ते रुपये पदमसीकडून हमी जाल्यावर कुटुंब व तिचा पिता-पुत्र धाकटे रामपुऱ्याचे किल्यास पाठविले. चौकशीस सुभानजी नाईक हुजऱ्या कोल्हापुऱ्या दिल्हा शृंखळाबधनें होतींच. तेथें सुभानजीचा त्रास विशेष पडून पधरा लाख ( रुपये ) खर्च घेतला ( च होता शिवाय ) आणखीही कांहीं दिल्हे ( असे ) असता आपली सुटका होती असें घडत नाहीं. तथापि सुभेदाराकडे शेखसरीफ याचे द्वारें प्रेष केला कीं, " अन्यायाचें फळ पावलों. धनी मायबाप आहांत. कृपाळू होऊन एकवेळ मस्तकीं हात ठेवावा. एका संवत्सरात दौलतीस कर्ज राहूं देणार नाहीं. हें न ध्यानास येता निग्रहच धरिल्यास माझा प्राण रहातच नाहीं. तेव्हा पुढें प्रस्ताव होईल. दूरदेशी पाहून चित्तीं दया उत्पन्न होऊन कृपा करून बोलणें नमूद सिद्ध करून देईन. " अशा भावीं प्रेष पाठविला. परंतु श्रवण करून शेखसरीफ यास आज्ञा जाली कीं, " या समयीं ही गोष्ट तुम्ही होता

---

(६४) **मुखें करून** – तोंडानें. **तोडगुळाची** – वास्तविक मुळांत 'गुडगुलाची' म्हणजेच ' गुडगुळाची ' असें असलें पाहिजे. ही वाचनाची चूक होय. **गुडगल** – हा एक अगदीं लहान तोफेचा प्रकार आहे. अशी ही जड तोफ गुन्हेगाराच्या गळ्यांत अडकवीत असत. जुन्या काळीं गुन्हेगाराचा छळ करण्याचे जे अमानुष प्रकार होते त्यातलाच हा एक. ( मुळांत मोडींत ' गुंडगुळाची ' असा शब्द असावा. मोडींत ' तु ' व ' गु ' हे सारखे दिसतात. मोडी लिपी जलद लिहितांना वरच्या मात्रा किंवा खालचे उकार पुष्कळ वेळां मागे पुढें होतात. ) **तगादा** – पैशाची मागणी. **एकसारख्या** – एकासारख्या एक, नामी. **पदमसीकडून हमी जाल्यावर** – पदमसी सावकारानें रुपये भरण्याची हमी घेतल्यावर. **किल्यास पाठविले** – कैद करून किल्यावर पाठविले. **मस्तकीं हात ठेवावा** – अभय द्यावें. **प्रस्ताव** – पश्चात्ताप. **दूरदेशी पाहून** – दूरवर विचार करून, दूरदृष्टि देऊन. **बोलणें नमूद** – बोलण्याप्रमाणें. **प्रेष** – निरोप, पत्र.

म्हणून ऐकून घेतलें, इतःपर कोणी गोष्ट बोलिलें असतां त्या पंगतीचा स्वीकार करावा लागेल." मग सरीफभाईनें तितके बोलण्याचा समारोप करून बिराडास गेले. मासपक्षांत इंदुरास येऊन काळ जाहला. हें वर्तमान नारो गणेश यांस समजतां विचार केला कीं, या पायीं मृत्यूचें घर पाहणें प्राप्त. ते व्यर्थ यातना तरी कां भोगाव्या ? ऐसा विचार करून एके दिवशीं स्नान करिताना हातरुमाल होता त्यांतील कागद पाण्यांत भिजवून सुभानजी नाईक यास बोलावून तो कागदांचा गोळा स्वाधीन केला कीं, " तुकोजी होळकरांस सांग कीं, हा गोळा फलाणे बिस्तानेच्या फलाण्यांत घाल आजपावेतों आशा होती आता शेवटलीच गोष्ट ऐकाल." ऐसें बोलणें सुभानजी हुजरे यांसी बोलून स्नानसध्यादिक भोजन जहालें. त्याचे तिसरे दिवशीं देहावसान जहालें.

(६५) इकडे कारभार पाराजीपंत व खडोपंत करूं लागले. राजकारणसबधीं ल.लसोटचे लढाईत महादजी शिंदे कच खाऊन ग्वाल्हेरीस गेले. त्या संधींत इस्माल बेग व गुलाम कादर यानीं एक होऊन, गुलाम कादर जाबताखानाचा नातू, मालक व कारभारी व इस्मालबेग यानीं पन्नास हजार फौज जमा करून, बड माजवून, दिल्ली हस्तगत करून, बादशहाचे डोळ्यात सळ्या फिरवल्या. त्याकाळीं इस्मायल बेग यानीं बहुत रदबदल केली कीं, तुमचे मनात बहुत काळकूट

(६४) त्या पंगतीचा स्वीकार करावा लागेल – त्याच्यासारखी तुमची अवस्था करीन. बिस्तान – बस्ता म्हणजे कागदाचा किंवा कापडाचा गठ्ठा. बस्तान म्हणजे तो गठ्ठा बाधण्याचा रुमाल किंवा त्यावर घातलेले कव्हर किंवा आच्छादन. बस्तान बसणें या रूढ मराठी वाक्प्रचारात तोच अथ आहे. 'गिस्तान' असा शब्द कोशातून सापडत नाही. कदाचित् 'बासन' असें मुळांत असण्याचाहि सभव आहे. कपडे किंवा कागदपत्र ज्यात बाधून ठेवतात त्याला बासन म्हणतात. मोडी वाचनाची चूक होऊन 'बासन' ऐवजीं 'बस्तान' असें वाचलें जाणेंहि शक्य आहे. फलाणे – कोणा एका विशिष्ट. आतां शेवटलीच गोष्ट ऐकाल – आतां नारोपत मेल्याचीच वार्ता तुमच्या कानीं येईल. " तुकोजीने पुढे नारो गणेशाचे इतके हाल केले कीं, ते पाहून सर्वांस मोठी कींव आली. तवे तापवून पुढें टाकिले, हत्तीचा सांखळदंड गळ्यांत घातला. अगास बत्त्या लावल्या. मिर्च्यांची धुरी दिली. राखेचा तोबरा दिला. स्त्रीस व पुत्रास उष्णामध्यें उभे करून कानास चाप लाविले. खांद्यावर बदुका दिल्या. तापल्या तव्यावर उभें केलें. तेव्हां तीस लाख रुपये कबूल केले. पुढें आणखी निकड लाविली." [ मराठी रियासत भाग २ पृष्ठ २३. ]

(६५) डोळ्यांत सळई फिरवणें – डोळे काढणें. काळकूट – द्वेष.

असल्यास त्याचें उत्थापन करून आणखी कोणी बसवावयाचें असल्यास बसवा. परंतु हीनाग न करणें. तुम्हीं वजीर, तुम्हांपासोन अशी अमर्यादा होण्यांत ईश्वरानें न राहतां तुम्हास फलादेश लवकरच येईल. त्यानें न ऐकतां वडिलांचें उसणें घ्यावें या इरादियावर डोळे काढिले. तेव्हां इस्मालबेग तड खाऊन तीस हजार फौजेनिशीं उठोन गेला. दहा हजार फौजेनिशीं गुलाम कादर तेथें राहून वजीरात करूं लागले. हें वर्तमान पाटिलबावांस समजताच थोरले लखबा शेणवी याजबरोबर कंपू व फौज देऊन गुलाम कादराचे पारपत्यास रवाना केले. हें वर्तमान गुलाम कादरास समजल्यावर जरबेपुढें पाऊल न टिकता बाहेर पडला. लक्ष्मण अनत यांनीं दिल्लीस येऊन पादशहाची बहुत खात्री केली. पादशहानीं प्रसन्न होऊन वजीरात पाटिलबावास दिली. नालखी व खलत भूषणादि जो वजिराचा मरातब तितका देऊन ग्वालेरीचे आलीकडे आले होते. तेथें तीन कोस पाटिलबावानीं सामोरें जाऊन मरातब ग्रहण केला. मग लक्ष्मण अनंत यास गुलाम कादर याचे बदोबस्त करण्यास म॥ निल्हेस त्याचे मागें लागण्याची आज्ञा जाऊन कौशा फकीर याजला वजिरातीचे मुतालकीची सोंप करून पातशाई सलतनतीचे दरोबस्त महालची वहिवाट फकीर मजकूर याजकडे करून पादशाई खर्चाचा व दिल्ली शहराचा बंदोबस्त चांगला केला. व लक्ष्मण अनत हे गुलाम कादराचे पिच्छा करून एका लढाईंत बरबाद केला. जातीनें पळून गेला. त्याचे शोधास हेर लाविले. चोहों सहा महिन्यांत (एक) उजाड खेडें, पाच चार घराची वस्ती, तेथें एका पटवारी याचे घरांत राहिला होता. तों यानीं महालात गावगन्ना द्वाही घराघरास उडदा

---

(६५) त्याचें उत्थापन करून — त्यास गादीवरून काढून टाकून. परंतु हीनाग न करणे — वाटल्यास हा काढून दुसरा बादशहा बसवा. परंतु याची आंगें हीन करूं नका. म्हणजे याचे डोळे काढू नका. ईश्वराने न राहता — 'ईश्वरातें न साहता' असा मूळपाठ असावा. ईश्वरास न आवडून. फलादेश — फळ, प्रत्यय. उसणे घेणें — बदला घेणें, परतफेड करणें, उट्टें काढणें. इरादा — हेतु. तड खाऊन — रागावून, बिथरून. वजीरात — वजीराचा कारभार, दिवाणगिरी. कंपू — युरोपियन सरदारांच्या हाताखालीं कवाईत शिकवून तयार केलेलें पायदळ सैन्य. फौज — घोडदळ. (सध्यां आपण 'फौज' हा शब्द सर्वसामान्य सैन्य याअर्थी वापरतों; परतु मराठेशाहींत 'फौज' याचा अर्थ फक्त घोडदळ असाच होत असे.) जरबेपुढें — कवाईती कंपूच्या तोफांच्या माऱ्यापुढें. जरब — तोफ. मरातब — सन्मान चिन्हें. पिच्छा करणें — पाठलाग करणें. पटवारी — कुलकर्णी. उडदी — वर्दी, ताकीद.

फिरविल्या होत्या कीं, जो गुलाम कादर दाखवून देईल त्याजला पांच हजारांची जागीर देऊन बादीष केली जाईल. आशा दुराशा त्यांत कायथाची जात. पठाणी कायथ होता. त्यानें गुलाम कादराची दिलजमाई करून इकडे लक्ष्मण अनंताकडे प्रेष लविला कीं, गुलाम कादर आमचे घरीं आहे. दोनशें स्वार पाठवावे त्यांचे स्वाधीन करून देतों. तेव्हा दोनशें स्वार पाठवून हस्तगत करून पाटिलबुवापाशीं पोंचवून दिल्हा. अल्लीबहाद्दर आलियावर त्यांचा बस न बसे तेव्हा सुभेदार यांणीं हिम्मतबहाद्दर याजला हमराई करून शिंदे शुद्ध सरदार ठेवून मुखत्यारी अल्ली-बहाद्दरकडे आणावी या राजकारणास अग्रसर केला. त्यानें मास पक्ष परिश्रम करून नमूद सिद्ध केला. हें वर्तमान पाटिलबावास समजल्यावर हिंमतबहाद्दर हस्तगत करावा, या कारस्थानास लागले. हस्तगत करून आणीत होते. येतांना अल्ली-बहाद्दराचे फौजेंतून आले. त्यानें जरीपटका शेंपन्नास हात ( दूर ) पाहून घोडिया-वरून उडी टाकून जरीपटक्याखालीं जाऊन बसला. तेव्हां अल्लीबहाद्दरास बहुत कठीण पडले. पाटीलबावानी निरोप पाठविला की, अशा लेकुरपणानें प्रांत कसा लागेल ? यानींही उत्तर पाठविले कीं, "आपण वडिलाचे हातचीं माणसें. तेव्हां आमचेकडे लेंकुरपणा खराच, परतु जरीपटक्याचा आश्रय केला, आम्ही न आणितां त्यानें केला, तेव्हां आता जें होणें तें विचारानेंच होईल." असे उत्तर पाठविलें असताही पाटिलबावाचा दुराग्रह विशेष पडून कपू बमय फौज अल्लीबहाद्दराचे सभोंवते फिरवून दिल्हे. तेव्हा अल्लीबहाद्दर यांणीं मुत्सद्यांस बलावून कौसल केलें.

(६५) बादीष – सन्मान. आशादुराशा – लोभ कायथ – कायस्थ. हिम्मत बहाद्दर याजला हमराई करून – हिम्मत बहाद्दराला सामील करून घेऊन. शुद्ध सरदार ठेवून – फक्त सैन्याची सरदारी त्याकडे राहावी. बाकी लढाई, तह करण्याचा आखत्यार त्याकडे राहू नये. ती मुखत्यारी अलीबहाद्दराकडे असावी, असें राजकारण तुकोजी होळकरानें केलें. या राजकारणास अग्रसर केला – या राजकारणाचा पुढारीपणानें उपक्रम केला. असें घडून यावें यासाठीं पुढाकार घेऊन खटपट केली. त्याने – हिम्मतबहाद्दरानें. नमूद – कारस्थान. लेकुरपणानें – मूर्ख अविचारी वागणुकीनें. अलीबहाद्दर म्हणू लागला कीं, हिम्मतबहाद्दर हा सर्वांत श्रेष्ठ अशा पेशव्यांच्या जरीपटक्याखालीं आश्रयास किंवा अभयार्थ आला आहे. म्हणून त्यास तुमच्या हवालीं करता येत नाहीं. या अलीबहाद्दराच्या बोलण्याला उद्देशून हा लेकुरपणाचा टोमणा आहे. प्रांत लागणें – शेवट लागणें, निभाव लागणें. सभों-वतें फिरवून दिल्हे – अलीबहाद्दराच्या सैन्याला शिंद्याच्या फौजेनें व कंपूनें वेढा दिला. कौसल – कौन्सिल या इग्रजी शब्दाचा अपभ्रश. कौसल – खलबत.

सदाशिवपंत अवसरकर पुरंदऱ्यांचे तर्फेचे दिवाण व आप्पाजीपंत दामले खासपतीचे दिवाण व भिकाजीपंत पाळंदे फडणीसांकडील असे गणनीय माणसें जमा करून विचार केला. कोणी बोलला, असामी त्याचे स्वाधीन करावी, कोणी कांहीं, इदमथ जहाले. त्यांत भिकाजीपंत पाळंदे फडणीसीकडील यांणीं अग्रसर होऊन बोलले कीं, " हिंमतबहादरास द्यावयाचा नाहीं. याचें सोईनें होणें असेल तें हो. श्रीमंतांचे राज्याची बडती दौलत. तें पक्षीं शिंदे आगळीक करतील असें होणार नाहीं. कदाचित् तमावर चढून आगळीक केल्यास मरून मिठू. मागें शिंदे यास पुसणार बळकट आहेत. श्रीमताचे दौलतीचे कायमींत शिंद्याचें शिंदेपण राहणें कठीण पडेल. आपले हातें आसामी देऊन श्रीमतापासून मुकाबला कबूल करणार नाहीं." अशा निर्धाराची गोष्ट सागून उठले. हे वर्तमान येशवतराव निंबाळकर अफळोजचे राहणार, पढरपुरानजीक, आठशें स्वाराचें पथक, महादजी शिंदे याजपाशीं होतें. त्याणीं ( ऐकून ) नौबत देऊन आपला गोट चालवून अल्लीबहादर यास सामल जहाले. अल्लीबहादर त्यांचे गोटास जाऊन त्याची खातर बहुत केली. एकच उत्तर केलें कीं, "शिंदे याणीं आम्हास पैक्याची कमी ( केली ) म्हणून आलों नाहीं. तुमचे सकेतें इरादा बसून गोष्टीचा ठराव जहाला, हें वर्तमान ऐकून श्रीमंताचे राज्यांत रहातों, दुसरे सल्ला बदनेक, याजवर अतःकरण प्रसन्न होऊन तुमचे करण्यास सामल जहालों." परस्परें शिष्टाचार होऊन हीच सल्ला मुस्तकीम

(६५) असें गणनीय माणसे – अशी गणनीय माणसें. **गणनीय** – प्रतिष्ठित, जबाबदार. **इदमथ** – 'इदमित्थम्' या सस्कृत शब्दांचा अपभ्रंश, **इदम** – हे. **इत्थम** – या रीतीनें. **याचे सोईनें** – ही गोष्ट मान्य करून मग इतर पर्याय काय काढता येईल तो काढा **बडती दौलत** – उत्कर्षकाल, होत काळ. **तमावर चढणें** – ईर्षेस पेटणें. **तम** – ईर्षा. **मरून मिठू** – तोंड देऊन लढतांना मरून जाऊ. **आपले हाते आसामी देऊन श्रीमंतापासून मुकाबला कबूल करणार नाहीं** – मी आपल्या हातानें आसामी म्हणजे हिम्मत बहाद्रासारखा मातबर माणूस पारिपत्याकरिता शिंद्याचे हवाली केला, तर श्रीमंत माझा मुकाबला करतील म्हणजे मला जाब विचारतील त्या रुजवातीस आपण तयार नाहीं असें पाळंद्यानें स्पष्ट सांगितलें. **खातर** – खात्री, खातरनिशा. **तुमचे सकेतें इरादा बसून गोष्टीचा ठराव जहाला** – तुमच्या इशाऱ्याप्रमाणें कारस्थान पक्कें झालें. **दुसरे सल्ला** – दुसरा विचार. श्रीमतांच्या विरोधी अशा गोटांत सामील होऊन राहण्याचा. **बदनेक** – विश्वासघाताचा, गैर इतबारीपणाचा. **मुस्तकीम** – कायम.

जहाली. तेव्हां पाटीलबावांची निकड पडली. बराय मसलत सुभेदारांकडे प्रसरही शिंदे यांनीं पाठविला कीं, " आपण वडील आहा मुलास समजून सांगा. आम्ही हरामखोर ज्या रीतीनें हस्तगत होईल त्या रीतीनें करूं, तोफेचे तोंडीं देऊं, आपण शब्द ठेवाल, याजकरितां आपलेही कानावर घातलें आहे." यांनीं उत्तर पाठविलें कीं, " मूल खरेंच, परतु धन्याचें, यद्यपि अमार्गही असल्यास त्याची अमर्यादा करणें आपल्यास असकच. या (?) ही गोष्ट तर मार्गाची दिसती. तेव्हां याचा विचार होऊन व्हावें हें उचित." मग पाटीलबावा यांणीं तुम्हांकडील कोणी बोलावयास पाठवा म्हणोन सांगून पाठविले. त्याजवरून भिकाजीपंत पाळदे बोलावयास पाठविले. व पाटीलबावाशीं बोलणें पडलें कीं, आपसात बखेडा होऊन आजपावेतों श्रम साहास करून श्रीमताचा रबाब जमविला, क्रोड रुपयांचे खर्चांत आलें, या गोष्टी ध्यानास न येता या हिंदुस्थानांत अनुपगीर गोसाव्यासारखा सोधा पाठीस घालून जमलेला लक्ष बिघडू पाहता हें आम्ही घडू देणार नाहीं. ज्या रीतीनें हस्तगत होईल त्या रीतीनें करू. यासाठीं श्रीमतांनीं आम्हास तोफेचे तोंडीं दिल्हेयास कबूल आहे." मग पाळदे यांणी उत्तर केलें कीं, " आम्ही त्याजला बोलावून आणिलें असें जहालेंच नाहीं. त्यानें जरीपटक्याचा आश्रय केला असता प्राण वांचेल म्हणून आला घरचे दबावणीच्या जरबा खाऊन तुमचे स्वाधीन लेकरू.

---

(६५) सल्ला – विचार. **बराय मसलत** – मसलतीसाठीं **प्रसर** – प्रेष, निरोप. **हरामखोर** – गुन्हेगार. येथे हिम्मतबहाद्दर. **असकच** – अशक्यच. **या** – अथवा, व. **रबाब जमविला** – रुवाब, प्रतिष्ठा वाढविली. **सोधा** – सोदा, डांबिस माणूस. 'सोदा' ही उत्तर हिंदुस्थानांतील लष्करांतील लुटारू लोकांना दिलेली एक सज्ञा आहे. **लक्ष** – 'नक्ष' असें पाहिजे **नक्ष** – वरचष्मा, कीर्ति. **घरचे दबावणीच्या जरबा खाऊन गोष्ट सांगणे प्राप्त** – 'घरचे' ही मोडी वाचनाची चूक. 'याचे' असें मुळांत असले पाहिजे. याचे दबावणीच्या जरबा खाऊन म्हणजे याच्या दमदाटीमुळें जरब म्हणजे भीति खाऊन जर लेकरू म्हणजे अलीबहाद्दर तुमच्या स्वाधीन होईल म्हणजे तुम्ही सागाल तसे ऐकू लागेल तर त्याच्या शौर्याची परीक्षाच होऊन गेली असें समजावें लागेल ! शिंदे घरचे परिचयाचे, त्याच्या दरडावणीनें जर आम्ही इतके हतबल होऊन जाऊ, तर बाहेरचे परके इराणी दुराणीसारखे शत्रु येऊन त्यानीं आम्हांस दमदाटी करावयास सुरुवात केली तर स्वतःचे प्राण वांचविण्यासाठीं आम्ही 'आमचे प्राण वांचवा, वाटल्यास आमच्या फौजेचीहि वळती करून न्या' असेंहि आम्ही सांगू !! हें कसें शक्य आहे ? श्रीमतांनीं जरीपटक्याचा अधिकार देऊन आम्हांस पाठविले ते आम्ही बावळट भित्रे नव्हे म्हणूनच.

[illegible] [illegible] यांशीं गांठ पडली असतां आपले प्राण वांचविण्याविशींही [illegible] गोष्ट [illegible]. तेव्हां श्रीमंतांनीं जरीपटका सोपला हें चुकून केलें [illegible] होतें. श्रीमंतांचे करण्यास दोष सिद्ध करून यावत् आयुष्य बेशरमीचा [illegible] [illegible] वांचावें या जगण्यास धिःकार. आपले यासी फिरोन गोष्ट सांगितली तेव्हां पुरी पडली हें कळतच आहे. हिंमतबहादरास घेऊन श्रीमंतांपाशीं जाऊं तेव्हांच याचा इनसाफ होईल. परंतु तुमचे स्वाधीन करणार नाहीं." अशा तव्याच्या गोष्टी सांगोन उठोन आले. पुढें सुभेदारांचे विचारें पुरी पडणें कठीण, येरवीं पाटीलबावा आगळीक करून तुम्हांशीं बिवडवितो असें घडत नाहीं, परंतु सर्वोपरी खराब करील, देण्याचें पेंचांत येऊन मु ( ? ) काबलीस पाठवावें हेही टीक नाहीं. यास्तव हिंमतबहादर, कारस्थानी माणूस, मोहरा हातीं लागला आहे, याजला अग्रसर करून बुंदेलखडांत जावें. असा मनसबा सिद्ध करून अलीबहादर बुंदेलखंडास गेले इकडे नारो गणेश प्रकरणीं व अलीबहादर प्रकरणीं पाटीलबावांचे मनांत दंश होताच. सुभेदारही आपले ठिकाणीं साशंकित. परंतु शिंद्यांचे दौलतींत माणसें चांगलीं. त्यांणीं विचार करून पाटीलबावास बुद्धिवाद केला, "आपण चाकर श्रीमंतांचे. लाख फौज, पन्नास हजार पायदळ व पांचशें तोफा घेऊन मुक्त्या-

---

(६५) श्रीमंतांचे करण्यास दोष सिद्ध करून — श्रीमतांनीं आमची नेमणूक केली, ती चुकीची केली असें जर आम्ही आमच्या कृतीनें सिद्ध केले तर सबंध आयुष्यभर आम्हास बेशरमीचा डाग कलंक लाऊन घेऊन जगावे लागेल. आपले यासी — आपल्या मागणीस. फिरोन गोष्ट सागितली — अनादर केला. पुरी पडली हे कळतच आहे — आम्ही आमचें जे उत्तर सांगितलें, त्याचप्रमाणें आम्ही निश्चित असेरपर्यंत वागणार. पुढें सुभेदारांचे विचारें इ० — पाळदे व अलीबहादर यांनीं सुभेदाराचा म्हणजे तुकोजी होळकराचा सल्ला घेतला तेव्हा तुकोजी होळकर म्हणाला, "आपण केली ही गोष्ट येथें शिंद्याच्या संगतींत राहून निभावणें कठीण आहे. शिंदे आतां प्रत्यक्षच तुम्हावर हल्ला करून हिम्मतबहादराला पकडून नेईल हें घडणार नाहीं. परंतु तो तुम्हांस सर्व तऱ्हेनें नुकसानांत आणील. व मग तुम्हांस पुन्हा तैनातीच्या खर्चाकरता शिंद्याकडेच माणूस पाठवावा लागेल. त्यासारखी अपमानास्पद गोष्ट दुसरी नाहीं. करता हिम्मतबहादर हा बुंदेलखंडाचा माहीतगार आहे. तिकडील मुलूख जिंकावा व फौज फेडावी. म्हणजे फौजेचा खर्च तिकडील खंडण्यांतून काढावा म्हणजे शिंद्याकडे तोंड वेंगाडावें लागणार नाहीं व आपला बडेजाव व स्वातंत्र्य कायम टिकेल."

रीचें काम करितों, [illegible]धीचे मुबादल्यांत. तथापि श्रीमंतांची चिटी आली असतां एकया घोड्यानिशीं [illegible] व्हावें हा श्रीमंतांस भरंवसा व आपलेंही शील असेंच. याजवर श्रीमंतांनीं [illegible]वंत होऊन प्यायाचे फर्जी केले. त्या भरंवशास अलीबहाद्दर याचा असा व्यवहार होऊन, काढून दिल्यासारखें, आणि सुभेदाराशीं ही किला-फाची वृद्धि करून, तेही साहेबसुभे, केवळ तैनाती करून राहणार नाहींच; एवंच श्रीमंतांशीं हरामखोरीस पात्र होऊन वेगळे पडून कोण्या कलावर उंट बसेल, तेव्हां कृत परिश्रम व्यर्थ जाऊन खाबास खामी पडून हरामखोर असे वानऊं. यास्तव होळकर आपले भाऊ, त्यांगीं आपले घरीं पाहिजे तसें केलें ( तरी ) त्यांसी आपल्याशीं कारण तें काय ? यांसी मेळ घालून एक विचारें धोरण चालवावें. यांत अलीबहाद्दर प्रकरणीं ( जा ) हाला व्यवहार याजवर माती पडून सुभेदाराचे मिळ-ण्यांत शीळास बट्टा येणार नाहीं " ही गोष्ट पाटीलबावाचे गळीं उतरून याच मनसुब्याचे पैरवींत राणेखान भाई याजला घालून सफाई करून पुढें राजकारण होणें तें एक विचारें होत असावें असें कायम जहालें पुढें इस्मायलबेग तीस हजार स्वार व लाख पायदळ व पाचशें तोफेनें नबाब कूलीखां व अफरासखां इत्यादि नजीबखानाचे चेले फौजबंद तितके साम-दाम-दडभेद करून पिशवींत घालून त्यांचा जागा व सलतन समेटून नार जालेर या जिल्ह्यात येऊन जयपूरचे राजास उपद्रव आरंभिला. बंदोबस्तास बापू होळकर दहा हजार फौजेनिशीं व शिंद्या-कडील अंबोजी इंगळे असे रवाना जाले. शिखाचा व इस्मयलबेग याचा शिल-शिला होता. याजमुळें शिखाचे तोंडावर काशीराव होळकर व शिंद्याकडील बाळोजी इंगळे वीस हजार फौजेनिशीं उभयता सरदार रवाना केले. इकडे इस्मायलबेगाशीं बापूजी होळकर ( व ) अंबोजी इंगळे यांशीं मुकाबला होऊन दूरावरचे पाटणा-

---

(६५) कोट्यावधीचे मुबादल्यात – कोट्यावधी रुपये वसूल होतील अशा मुलखाचे मालक, धनत्तर, कोणावर अवलबून नाहीं असे. साहेब सुभे – मोठे सरदार. तैनाती – नोकऱ्या, सांगकाम्यासारख्या चाकऱ्या. कोण्या कलावर उंट बसेल – कोण्या कलावर उट बसेल तें सांगवत नाहीं म्हणजे आपलें दैव कसें फिरेल तें सांगतां येणार नाहीं. खामी – नुकसानी. वानऊ – वानिले जाऊं; असा आपला लौकीक होईल. वानणें – कौतुक करणें. याच मनसुब्याचें पैरवींत – ह्या मनसुबा किंवा ही मसलत सिद्ध करण्याच्या कार्यात. चेला – घरच्यासारखा, मुलासारखा पाळलेला माणूस, पालकपुत्र, शिष्य, चेलेचारगीर. पिशवींत घालणें – सामील करून घेणें, कुटांत मिळून घेणें, घशात [illegible], फसवणें. नारजालेर – 'नारनोल्ड' असें मुळांत असेल ? शिलशिला – सख्य, [illegible].

वर लढाई सुरू जहाली शिंद्यांकडील पलटणें होतीं. तोफांचे लढाईत आपली फौज थिजली दिवस थोडा राहिला, अस्तमानीं लढाई महकूब होऊन आपलाले जागां मुस्तकीम राहून सूर्योदय होतांच गोळा फिरून सुरू जहाला. मग अंबोजी इंगळे व बापूजी होळकर यांणीं विचार केला कीं, तोफांचे लढाईत आपल्या वस्तू पुरी पडेल असें नाहीं. तेव्हा घोडे घालावे. यात ईश्वर यश देईल तो देऊ. असा खचितार्थ करून एक्या बाजूस बापूजी होळकर, एक्या बाजूस अंबोजी इंगळे, पाठीचे बाजूस पेंढारी ( असे ) तीनरूख शह वाढून हल्ला केला. तेव्हां इस्मायलबेग कायल होऊन शिकस्त जहाला. लाख स्वार जिकडील तिकडे जाऊन जिवंत धरून आणला. तोफखाना वगैरे दरोबस्त हस्तगत जहाला. फत्ते जहाली.

( ६६ ) पुढें मारवाडवाले जमाव धरून काकडावर आले. अजमेर जागा आपली प्राचीन साधावी व जयपूरवाल्याचेही महाल दाबावे. ( असा इरादा ) हें वर्तमान मथुरेस सरदारास समजल्यावर मारवाडवाल्याची जरब जयपूर प्रांतीं लालसोटचे लढाईत बाबद गालद होती याजमुळें पाटीलबावा ( स ) संकट वाटून फौज वीस हजार, त्यात गोपाळराव चिटणीस व जिवबादादा प्रमुख तैनातीस डबाईचा कपू असे रवाना होण्याची सिद्धता होऊन सुभेदाराकडे आले. 'मारवाडवाल्यानें डोकें उचलले आहे. अजमेर घ्यावी हा त्याचा इरादा आहे. त्याचे मुकाबल्यास फौजेची योजना जहाली आहे. आपलेकडील फौज व सरदार जमेयत यावी. असें बोलणे पडलें तेव्हां इस्मायलबेग धरल्यावर शिखाचे फौजेचे मुकाबल्याचे कारण राहिलें नाहीं. काशीराव होळकर व बाळोजी इंगळे पटाल्याहून हुजूर येऊन दाखल जहाले होते. काशीराव होळकर मारवाडांत रवाना करून बापू होळकरास पत्रें गेलीं कीं, तिकडील मसलत समारोप होऊन इस्मायलबेग हस्तगत जहाला. ते पक्षीं तुम्हीं फौज पेंढारी याजसुद्धां काशीराव यास मारवाड प्रांतीं जाऊन सामल व्हावें. अशीं पत्रें रवाना जहालीं काशीराव होळकर व शिंद्या-

---

(६५) **थिजली** – कचरली, बेहिम्मत झाली. दबली. **आपल्या वस्तु** – आपल्याच्यानें. **खचितार्थ** – निश्चय, संकल्प. **तीन रुख** – तीन तोंडानें, तीन बाजूनें. **शिकस्त** – पराभव. **शिकस्त झाला** – पराभूत झाला.

(६६) **सरदारास** – शिंदे यांस. **लालसोटचे लढाईत बाबद गालद होती** – 'लालसोटचे लढाईबाबत गालब होती,' असें मुळात असलें पाहिजे. लालसोटचे लढाईत महादजी शिंद्याच्या झालेल्या प्रचंड पराभवामुळे मारवाडवाल्यांची जरब जयपूर प्रांतीं गालब होती, त्यामुळें इ. **गालब** – जोरावर, प्रबळ. **डबाईचा** – डीबॉइनचा. **डोकें उचलणें** – आव्हान देणें, बंड करून उठणें.

कडील सरंजाम अजमेरीवर मुकाबल्यास दाखल जहाले. तो बापू होळकर यांसी पत्रें पोंचाऊन अंबोजी इगळे यांसी पाटीलबावांनीं हुजूर बलावलें तेव्हां इस्मायलबेग याजला घेऊन मथुरेस गेले. बापू होळकर फौज बमय पेंढारी बमय काशीराव होळकर याजपाशीं दाखल जहाले. मारवाडवाल्याचा मुकाबला घालून एक लढाई होऊन मारवाडवाल्यास हटवून मेडत्यावर नेऊन घातले. हें वर्तमान राजास समजून त्यांणीं आपले भाईबेट्यांस बलावलें तेव्हां तुम्हांकडून कांहींच बनून आलें नाहीं. मग राठोडाचे फौजेंत जाटाचे गणनीय माणसें होतीं त्यांस वीरश्री पडून आठशें असामी रजपूत यांणीं केशऱ्या करून मरणोन्मुख जहाले. लढाईची तयारी शिंद्यांकडील फौज जरब खाऊन ( होती ) तथापि त्याणें नक्षा बाधून उभे राहिले. पुढें पलटणें. पलटणापुढें रणगाड्याचा जंजिरा. यापुढें तिकाऱ्यांचें गोखरू. असा जाबता तोफांचे गोळ्यांत करून कपूचे एक एक बाजूस गोपाळराव व जिऊबादादा. होळकराची फौज त्यास गणनींत नाहीं. बापूराव व काशीराव अदकोसाचे

---

(६६) बमय - मुद्धां, सह. जाटाचे - जाटाची. गणनीय माणसे - मानकरी, नांवाचे, ईरेचे एकाडे. केशरी करणे - मारू किंवा मरू असा निश्चय करून रजपूत प्राणपणाच्या लढाईस उभे राहात, त्यावेळीं ते केशरी पोशाख परिधान करीत असत अगर छातीवर केशराच्या गधाचा पजा उठवून घेत असत. नक्षा बाधून - ईर धरून, वीरश्री धरून. किंवा 'नकाशा बांधून' असेंहि होईल. नकाशा बाधणे - व्यूह रचना करणें. रणगाड्याचा जंजीरा - रणगाडे आणि तोफा. जंजीर - या शब्दाचे तोफ आणि साखळदड असे दोन अर्थ आहेत. म्हणून 'साखळदडानें एकमेकास जोडलेले रणगाडे' असाहि अर्थ होऊ शकेल. तिकाऱ्याचे गोखरू - तिखार म्हणजे पोलाद. विल्सनच्या कोशात दिलेल्या गोखरू या शब्दाच्या अर्थावरून हल्ला करून दौडत येणाऱ्या घोड्यांच्या पायांत पोलादी काटे शिरवून त्यांची गति कुठित करण्याचा प्रयत्न करण्यात आला हें स्पष्ट दिसतें. विल्सनचा अर्थ असा a large kind called गोखरू ढाकिनी bears a fruit of a triangular shape with prickles at the angles, and hence the same name is given to the iron crowsfeet thrown on the ground to check the adavance of the cavalry. असा जाबता तोफाचे गोळ्यांत करून - ? होळकराची फौज त्यास गणनीत नाहीं - होळकराची फौज त्याच्या खिसगणतींत नव्हती. म्हणजे होळकरांच्या फौजेला त्यानें क्षुल्लकांत गणून त्यांस महत्वाचें काम न सागता रणांगणामागें अर्धा कोस ठेवले होते.

पिछाडीनें उभे होते. तेव्हां राठोडांनीं घोडे कसे घातले [६६] आउणच्या गाळावा घेऊन उजवे हातीं हुका ( ? ) डावे हातीं लगाम आणि चालीनें गेले. रणगाडे तरवारीनें तोडून तोफांवर तरवार चालविली. सफे कोठेंही अक्षरें न बोलता गेले. गोपाळरावजी व जिवबादादा तीन कोस पराङ्मुख जहाले. तेव्हां डबई भयभीत होऊन काशीराव व बापू होळकर उभे होते, त्याजपाशीं येऊन टोपी आपटली. "बदनक्षा व नुकसान माझें होत नाहीं. सरदार आहां ( आतां ) चांगलें दिसेल तें करावें." मग बापूसाहेबानीं बाळासाहेबांस ठिकाणीं उभे करून, चार हजार स्वार निवडक घेऊन घाडे घातले. रजपूत गोळा, छरा, संगिन यांत निमे खपलेच होते. निमे राहिले त्यांणीं हल्ला बापू होळकराचा गोल उठला हें पाहून पलटणचा मुकाबला सोडून यांजवर आले. भेळाभेळ होऊन चार घटका समरंगणीं भाला, बंदूक यांचें काम पडलेंच नाहीं. एकमेकांचें गळा हात घालून घोड्याखालीं येऊन तरवार,

---

(६६) तेव्हां – अशा स्थितींत. आउणचा गाळावा घेऊन – मुळांत 'अफुचा गाळावा किंवा गोळ्या घेऊन' असें असलें पाहिजे. लढाईत बेभान होऊन लढता यावें म्हणून उत्तर हिंदुस्थानांत अफू इत्यादिकाचा अम्मल करण्याची चाल असे. चालीने गेले – दौडत चाल करून गेले राठोड वीरानीं बेभान होण्याकरतां अफूच्या गोळ्या खाल्या. व उजव्या हातीं हुका धरून ओढीत, आणि डाव्या हातानें घोड्याचा लगाम धरीत ते बेदरकारपणें शिंद्याच्या फौजेवर येऊन पडले. तथापि हुक्का या शब्दाचा हातगोळा असा एक अर्थ आहे. व तोच येथें खरा शोभून दिसेल. म्हणजे असें कीं, डाव्या हातात घोड्याचा लगाम व उजव्या हातांत दारूचा बॉम्ब-गोळा शत्रूवर फेकून मारण्यासाठीं अशा पवित्र्यांत राठोड दवडत आले. आधीं हातांतील बॉम्ब फेकून नतर शिंद्याशीं प्रत्यक्ष भिडताच त्यांनीं तरवार चालू केली. रणगाडे तरवारीने तोडून इ० – रणगाड्यावरील लोक तरवारीनें मारून, तोफा-वरील गोलदाजहि तरवारीनें मारले. सफे कोठेंहि अक्षरें न बोलता गेले – वाच्यता किंवा हाकाहाक होण्याच्या आंत. याप्रमाणें [illegible] मारून राठोड वीर परतही गेले. पराङ्मुख झाले – पळाले. टोपी आपटली – वैतागानें सर्वनाश झाला अशा आग्यानें डोकीची टोपी काढून त्यानें जमिनीवर आपटली. जुन्या काळीं अशीच पद्धति होती. शाहूराजानेंहि, वसईच्या मोहिमेंत आपले चाळीस हजार मराठे मेले, त्यासबधीं इग्रज वकिलासमोर त्रागा करतांना डोकीचें पागोटें काढून जमिनीवर आपटल्याचा प्रसग सुप्रसिद्धच आहे. बदनक्षा – काळीमा, दुर्लौकिक. गोल – जमाव. गोल उठणें – जमावच्या जमाव उठणें. भेळाभेळ – सरमिसळ.

कटार, दोन अशमिशी रजपूत एक आडे न दिल्हा. चार पांचशें रागडे खपू देऊन आपल्याकडील महादजी पिंगळेसारखीं दोन तीनशें नांवाचीं माणसें कामास आलीं. यशवंतराव महाराज, बारा वर्षांचें वय, प्रथम तरवार तेथें केली. आबाजी खंडेराव पारनेरकर फडणिसाकडील यांनींही तरवार चांगली केली त्या पांचशा रजपुतांचे लढाईंत माणसांमाणसांची परीक्षा जहाली. खेत कायम करून शाहाजनें वाजवून सुभेदारासी, कागद शाई हजर नव्हती सबब कोळसा उगाळून, चिठी लिहिली. यात भाव रजपुतांच्या केशऱ्या पाहून शिंद्याकडील फौज तीन कोस पळाली. कंपू बरबाद जहाला. मग डबई आम्हाशीं येऊन बोलला कीं, नक्षा व कारखाना माझा बुडतो असें नाहीं. सरदार आहा, चांगलें ते करा. (मग) आम्हीं घोडे घातले. श्रीमार्तंड कृपेनें फत्ते जहाली. यांतील खरें खोटें डबई पाटील बावांस लिहील. अशी चिठी लिहून साडणीस्वाराबरोबर रवानगी केली. मग डबई याणें आपले बेडयांत जाऊन सरदार पळाले होते त्यांजकडे साडणीस्वार पाठवून बलावून आणून मग लढाई खतल जहाली त्याची खुषी होऊन त्यांणीं आपले परी पाटीलबावास पत्रें लिहिलीं. डबईनें जे सरदार येथें जाजती देऊन पाटीलबावांस जालें वृत्त वास्तविक लिहून पाठविलें कीं, तुमचे फौजेकडून कांहीं एक जहालें नाहीं. होळकराकडील सरंजाम नसता तर करणें त्याचा कारखाना बरबाद होऊन बदनक्षा मुलुखभर होता. याणें मात्र वास्तविक लिहिलें होतें.

(६७) नंतर गोपाळरावजी व जिउबादादाचीं पत्रें पाटीलबावांस जवळ पोंचून स्फीत्यर्थ पाटीलबावा मुत्सद्दी मंडळासह पत्रें घेऊन सुभेदारांकडे आले. बिचोव्यांत

---

(६६) खपू देऊन – खपू दिले, मारले. खेत कायम करून – आपल्या सरदाराचे व सैनिकांचे मुडदे रणांगणावर लांबवर कोठें कोठें पडले आहेत त्याचा तलास लावून. शहाजन – जयवाद्य, जयसूचक वाद्य. बरबाद – नष्ट. बेड्यात – बेहड्यांत. बेहडा–कारखाना येथे अथ तोफखाना, तोफखान्याचें शिबीर. आणून – आणलें. खतल – खतम असे पाहिजे. खतम – समाप्त. लढाई खतल जाहली त्याची खुशी होऊन – 'लढाईंत शत्रूची संपूर्ण कतल म्हणजे कत्तल झाली. त्याणे खूष होऊन' असाहि अर्थ होईल. डबईने जे सरदारांस येथें जा जती देऊन – ? करणे त्याचा कारखाना बरबाद होऊन – 'करणेलाचा कारखाना' असे तर मुळांत नसेल? म्हणजे कर्नल डिबाईचे कवायती कंपू.

(६७) स्फीत्यर्थ – फिदी फिदी हसण्याकरता, होळकराची फजिती उडवण्याकरता, किंवा आपल्या फौजेचा दिमाख दाखविण्याकरतां. स्फीती – दम, प्रतिष्ठा, ऐट. बिचोवा – लहान बिन खांबी तंबू.

एकांती बसून पत्रें वाचून दाखविलीं. सुभेदार श्रवण करून हांसून उत्तर केलें कीं, " श्रीमतांचे प्रतापें करून शिंदे, होळकर ज्या समरगणांत तेथें अपेशाची दाद ती काय ? बाकी कच्छे व राठोड माझ्या बापानें शंभर वेळां पाय पसरून मारलें आहेत ! हे तुमचे आमचे पाहिले ऐकिल्यांत ( आहेच. ) " मग चिमणाजीबापूस आज्ञा करून बाळासाहेब व बापूसाहेब यांची चिठ्ठी आली ती दाखवा म्हणोन सांगितलें. मग ती चिठ्ठी पाहून व डबईचें पत्र महादजी शिंदे यांस आलेंच होतें व यांचे चिठ्ठींतही खऱ्याखोट्याचा हवाला डबईचें पत्रावर होता ( मग ) पाटीलबावा मनचे मनांत समजून सर्द जहाले सुभेदाराचे बोलण्यावर उत्तर होऊ पावले नाहीं. पानसुपारी अत्तरगुलाब शिष्टाचार होऊन आपले फौजेंत गेले.

( ६८ ) पुढे देशीं टिपूवर फिरंगी आले ते समयीं श्रीमताकडे टिपूकडून व फिरंगी याजकडून वकील मदत करण्याविशीं आले. तेव्हा नाना फडणीस यांणीं विचार केला कीं, टिपू आपले ठिकाणीं मुस्तकीम राहिल्यास पुण्याचा दरवाजा आहे ते पक्षीं आपण इंग्रजास नादीं लावून ( ठेऊन ) मदत मात्र टिपूची करावी. अशी मसलत सिद्ध करून हरीपततात्या याज समागमे पन्नास हजार फौज देऊन रवाना केलें. या स्वारीस मोहीमशीर महर्गता अशी झाली कीं, दाणे रुपयाचे पावशेर भाव मात्र चारा आंब्याचीं पानें वगैरे वाळलेलीं रुपयाची टोपलेभर. आणि टिपू फिरंगी मिळून पाच लक्ष जीव मसलत दिवसेदिवस वाढत चालली. नाना फडणीस यांणीं हरीपततात्याचे खर्चाची मदत करण्यास कमी केली नाहीं व हरीपततात्यानीं दुतर्फा पैसा उत्पन्न करण्यास कमी केलें नाहीं. परंतु मोहीमशीर फौजेस, घरींहून मदत व मागितला पैसा अशा महर्गतेंत कोठून पुरणार ? तेव्हां फौज गळून मसलत जड पडली. हे वृत्त पुण्याहून वकिलानीं शिंदे यांस

---

(६७) **दाद** – वार्ता, बात. **पाय पसरून** – कांहीं श्रम न पडल्यासारखें, जागचे उठावेंहि न लागता. **माझ्या बापाने** – थोरल्या मल्हारराव होळकराने. **सर्द होणे** – थिजणे, खजील होणें

( ६८ ) **पुण्याचा दरवाजा आहे** – पुण्याला म्हणजे पेशव्याच्या राज्याच्या घराला एकतऱ्हेने दरवाज्यासारखा आधार आहे म्हणजे टिपू तिकडे इंग्रजाच्या उरावर कायम आहे तोपर्यंत इंग्रज पुण्यावर चालून येऊ शकणार नाहींत. **मोहीमशीर** – मोहीम चालू असता. **दाणे रुपयाचे पावशेर भाव मात्र** – रुपयाचें पावशेर दाणे द्यावे असा लष्कराच्या बाजारात भाव ठरला परंतु प्रत्यक्ष दाण्याचे दर्शनच होईना ! **जीव** – माणसे. **फौज गळून मसलत जड पडली** – शिलेदारास पगार व घोड्यास दाणावैरण न मिळाल्यामुळें फौज गळाठली

लिहिलें. त्याजवरून याजला आशा उत्पन्न झाली कीं, हिंदुस्थानाचा बंदोबस्त आपले हातींच आहे. परंतु तेथील बंदोबस्त ठेऊन आपण देशी जावयाचें करून टिपूची ( हि ) मसलत आपले हातें सुदरावी. म्हणजे ब्राम्हण अर्थात् टाळे जातील. ही उमेद धरून जिऊबादादा व गोपाळराव व डबई याना पलटणानशीं हिंदुस्थानचे जिल्ह्यांत सोडून जातीनें पन्नास साठ हजार फौज व दोन अडीच कटू घेऊन दरकूच देशास चालले.

( ६९ ) दरम्यान मेवाडचा मामला येणें होता याजकरितां मासपक्ष गडबड करून रबाबाचे पोटीं खडणीचा जाब बोलण्यात आणून वसुलास अबोजी इंगळे यास ठेऊन खासास्वारी झाडून उज्जनीस आली तेथें मागील फौजेचा जाब व पुढील खर्चाची वगैरे तोडजोड करून हड्या हर्याचे घाटें उतरता घाटात नेमावर पचमहालपैकीं सत्वास महाली बाईसाहेबानीं गढी मजबूत बाधून वस्ती आबादी चागली केली होती जागा सोयकर पाहून गढी खालीं करून होळकराचें ठाणे उठवून बऱ्हाणपूरचा सुमार धरला त्याकाळीं बाईसाहेब म्हणजे प्रत्यक्ष अहल्या. तिचे मुखावाटे अक्षरें निघालीं कीं, " हा मेला पुन्हा हिंदुस्थान पहात नाहीं. " देशीं येण्याचे राजकारण पाटीलबावाचे मनात भरून कूच जालें. तेव्हा वकील पुण्यास लिहीतच गेले की, टिपूचे मसलतीचा समारोप आपले हातें करावा हा इरादा धरून येत आहेत. तेव्हा नाना फडणीस याणी हरीपंततात्यास निकड आरंभिली कीं, महादजी शिंदे बऱ्हाणपुरापर्यंत आले नाहींत तोंपावेतों टिपूचे मसलतीचा समेट, अग्रेजाची व त्याची दुरुस्ती करून बमय फौज पुण्याचे मुक्कामीं येऊन दाखल व्हावे तरी तुमचे परिश्रमाचे सार्थक. हें न जाल्यास आजपावेतो गर्भवासी श्रीमतापासून सेवासेवन केले हे गावखुद होऊन यशाधिकारी आणखीच होईल. यातील कार जे उगवून लिहिण्यात येत गेले त्याज-

---

(६८) व मसलत लवकर तडीस जाईना, कारण फौजेत शक्ति व ईर्षा राहिली नाहीं. **वकिलानीं** – शिंद्याच्या वकिलानें. **म्हणजे ब्राह्मण अर्थात् टाळे जातील** – ?

**(६९) मामला** – खडणी. **रबाबाचे पोटीं** – दहशत देऊन, दहशतीच्या पोटीं, दबाव देऊन. **खंडणीचा जाब बोलण्यात आणून** – खडणीची रक्कम ठरवून घेऊन. **गढी खाली करून** – गढीतील होळकराचे लोक हाकून देऊन. **हिंदुस्थान** – उत्तर हिंदुस्थान. **दुरुस्ती** – स्नेह. **सेवासेवन** – सेवाचाकरी, कष्ट. **गावखुद होणे** – नष्ट होणें, निष्फळ होणें. **आणखीच** – निराळाच कोणी तरी, भलताच, दुसरा. **कार** – दश, मर्म, मुद्दा. **उगऊन लिहिणें** – खोलून खुलासा करून लिहिणें.

करून हरीपंततात्याही कृतकर्माच, तांम्र व टिपू उभयताश्चर भय प्रीति अशी त्यापरि घालून, हवा याप्रमाणें, महागाई या प्रकारची, ते पक्षीं सालमजकुरी तहरह ठरवून तऱ्हे द्यावी. पुढें बस पडल्यावर पाहिजे तसें करावें हे नेकसल्ला. धसी बळें गोऊन गुंतून पडणें हे राजधर्मास अप्रशस्त. असाच टिपूसही बुद्धिवाद केला कीं, या गर्दशींत पानावर पान घालून तूर्त सफाई करावी. या भावीं ज्यांचें त्यास वेगवेगळालीं बोलणीं करून ( इंग्रज व टिपू दोघासही सांगितलें कीं ) याप्रमाणें तुमच्यानें होत नसल्यास आमचे घरीं राजकारण उत्पन्न जालें आहे याजकरितां मसलत खर्च लागला हा तुम्हापासून घेऊन आम्ही निघून जाऊं. यात उभयतासही अडचण पडेल हें उभयताचे मनीं बिंबून त्याचा त्याचा आपसात किलाफ न ठेविता सफाईचें पोटीं भेटी करून स्वारी खर्च पुण्याहून मदत जाली त्याजसुद्धां दुतर्फा आपला हात उगवून फौजेची समजावीस तेथील तेथें करून, दरकूच महादजी शिंदे बऱ्हाणपुरास दाखल जहाले नाहींत तो साठ हजार फौजेनिशीं हरीपततात्या पुण्यास दाखल जहाले

( ७० ) हे वर्तमान पाटिलबावास समजल्यावर मनची उमेद मनांत गळून ठोकर फार मोठी खाल्ली पुढे जाऊन अर्थ नाहीं, मागें काय समजून जावें ? मग देशी येण्यास कारण वजीरातीचा आफ्लाब बमय मरातब श्रीमतास नजर करावा,

---

(६९) **कृतकर्मा** – मोठमोठीं कामें केलेला, अनुभवी. **ताम्र** – इंग्रज. **तऱ्हे देणे** – तऱ्हा देणें, दिरंगाईवर टाकणें. **बस पडणें** – बस बसणे, बळकटी होणें. **धसीं बळें गोवून गुन्तून पडणें** – उगाच आपणच होऊन संकटांत स्वतःच गोवून घेणे. 'धस' व 'धसमुसळ्या' या शब्दांचा मूळ अर्थ फार अश्लील आहे. **गर्दशी** – सर्वनाशाचा प्रसंग. **पानावर पान घालणें** – हो ला हो म्हणणें.

(७०) **ठोकर खाणे** – हिरमोड होणें. **पुढे जाऊन अर्थ नाहीं, मागे काय समजून जावे ?** – टिपूच्या मोहिमेचें यश आपल्या पराक्रमानें पदरांत पाडून घ्यावें म्हणून आपण जलदीनें दक्षिणेत चाललो, तो मोहीम यशस्वी करून हरिपंत पुण्यास परतलेहि. तेव्हा दक्षिणेत जाण्यांत आतां स्वार्थ काय राहिला ? बरें, असेच उलट परतून हिंदुस्थानांत जावयाचें करावे तर तेही शोभण्यासारखे नाहीं, कारण नाना फडणवीस तुम्ही उत्तर हिंदुस्थानचा बंदोबस्त सोडून दक्षिणत येऊ नका असे वारंवार बजावीत असता आपण हट्टानें येण्यास निघालों तेव्हां काय करावे ? असा मोठा पेंच महादजीला पडला. **आफ्लाब** – मूळ आफ्ताब असा शब्द असला पाहिजे. आफ्ताब– ( १ ) अब्दागीर. ( २ ) येथें वजिरातीचा 'आफ्दाब' म्हणजे वजिरातीच्या प्रतिष्ठेचे द्योतक असें अब्दागीर वगैरे सामान. **मरातब** – सन्मानचिन्हें.

ही गोष्ट प्रधान करून, तावडतोब जाण्याचा समारोप बऱ्हाणपूर पावेतों होऊन सोहळतीनें पुण्यास गेले. इकडे हिंदुस्थानांत गोपाळराव चिटणिवीस मुक्त्यार, अलीबहादर सबंधीं व्यवहार होऊन, पुढें सुभेदाराशीं मेळ शिंदे यांनीं राखला. यांतील आदिपश्चात् पहाणें याची माहिती जिऊबादादास त्याजकडे ताबेदारी. गोपाळराव चिटणवीस याचे अल्पश्रय, दुरादेशी पहावयाचा तोटा. त्यांत धन्याचे प्रतापें कडून एक दोन कामें बनून आलीं. यावर तरवारीचे अदमासाचा स्फुंद. पाटिलबावा असता सुभेदाराचे मनोधारण राखणें हा क्रम न धरितां लहान मोठया गोष्टी बेशिस्त घडून आल्या. तेव्हा सुभेदारानीं विचार करून येथे राहून आपसात कंबेशी उत्पन्न होईल, म्हणोन चार दिवस जयपूरचे राज्यात काढावे, खंडणीही घ्यावयाची आहे, ( अशी ) सबब ( सागून ) कूच करून जयपूर प्रातीं आले. कंबेशी न यावी याजकरिता सुभेदारानी टाळा दिला. किल्ले कामा प्रात ब्रीज येथें अमल शिंद्याचे, परतु खुशाल कुवर त्या जिल्ह्यातील राहणार त्याजकडे पागा हजार बाराशे घोड्याची तो कामास राहिला होता. गोपाळराव चिटणीसाचे मनात काहींही करून होळकराशीं कळ वाढवून फाट पाडावा असें होतें. सुभेदार जयपूरचे जिल्ह्यात ( होते. ) हा तेथें राहिला होता त्यास हुसकून द्यावें म्हणोन लखबा दादा थोरले याजबरोबर पाच हजार फौज देऊन रवाना केले. हे कामा मुक्कामीं आल्यावर त्याणीं त्यासी जाब लाविला कीं, आमचे खटल्याचा एक गवत वेगळें

---

(७०) **ही गोष्ट प्रधान करून** – या गोष्टीकरतांच मुख्यत्वें येत आहोत अशी जाहिरात करून. **समारोप** – निश्चय **आदिपश्चात्** – मागील पुढील, अर्थात् आरभापासूनची माहीतगारी. **त्याजकडे ताबेदारी** – वास्तविक खरा माहितगार जिवबा दादा होता. त्याजकडे हिंदुस्थानची मुखत्यारी महादजींनें द्यावयास पाहिजे होती. परतु ती दिली गोपाळराव चिटणीसाला. आणि जीवबादादाला ताबेदाराचें म्हणजे दुय्यम नोकराचे काम सागितले. **दुरादेशी पहावयाचा तोटा** – दूर दृष्टीचा तोटा, अविचारी बुद्धि, कोती बुद्धि. **यावर** – यामुळें. **तरवारीचे अदमासाचा स्फुंद** – आपल्या फौजेच्या पराक्रमाविषयींचा स्फुन्द म्हणजे गर्व झाला होता. **कंबेशी** – कलह. **टाळा देणे** – दूर निघून जाणे. **फाट पाडणे** – वैर उत्पन्न करणें, ताटातूट करणे. **आमचे खटल्याचा एक गवत वेगळे करून इ०** – खुशालसिंगानें उत्तर केलें कीं, “आम्ही या किल्ल्यांत जमेतीनिशी राहिलों असलो तरी तुमच्या प्रांताची काहीं एक नासाडी करीत नाहीं. आमच्या खटल्याला म्हणजे घोड्या तट्टांना गवत वगैरे लागते तेवढें फक्त येथून घेतो. या वेगळा आमचा कोणचाच उपद्रव तुम्हास होणार नाहीं.

करून कांहीं उपद्रव असल्यास शोध घ्यावा. (तथापि) त्यास हरतऱ्हेनें बिघाड करावयाचा. तेव्हा मोर्चे लाविले. तोफ सुरू जहाली. तिसरे दिवशीं पांच लोकांनिशीं बाहेर निघून मोर्चे तुडवून तोफा ओढून आणावयास लागतील यास्तव ठिकाणीच छकड्याखालीं टाकून आले. अशी सत्तावीस रोज लढाई झाली. तीन वेळा मोर्चे कापले. शिपाई जुवामर्द खुशाल कुवर एकच होता, परतु होळकराच्या घरचीं माणसें. कोण्या नावाची बायको घरात घातली होती तिचा भाऊ याचा प्राण घ्यावयाकरिता हिंडतच होता ते दिवशीं दोन प्रहराची वेळ, हुक्का ओढीत बसला होता त्यानें संधी पाहून जवळ कोणी माणूस नाहीं, बंदुक धरलीच होती, गोळी छातींत मारून प्राण घेतला. तेव्हा ह्मणार मेला, आतून मजबूत परतु धणी नाहीं. यामुळें सर्वांनीं विचार करून हजार बाराशे सरजाम, दीडशें उट जबुऱ्याचें सरजाम तयार करून बाहेर निघून सुभेदाराकडे जयपूरचे मुलकात आले. याजवर जयपूरचे खंडणीचा जाब ठरावून राजाच्या भेटी जाल्या. परस्परें मेजवान्या शिष्टाचार व्हावयाचे ते होऊन ऐवज भाई-बेट्यावर वराता दिल्हा, त्यात तीन लाख रुपयेची वरात प्रतापसिंग माचा हेडीवाल्यावर होती तो ऐवज सुभेदारानीं बापूजी होळकराचे खर्चास दिल्हा. बापूसाहेब सरजामानशीं वसुलास गेले. जयपूरवाले दुतीघर गोपाळरावभाऊ व जिवबादादा याच्या गोडींत शिरून हिमायत केली. त्याचा प्रेष बापसाहेबाकडे आला कीं, माचाहेडीवाल्याकडे आमचे दहा लक्ष रुपये घेणें. आमचा ऐवज वसूल होय तों पावेतों तुम्ही तगादा करू नये, येणार नाहीं. असें पत्र पाठवून मागाहून कूच करून मुकाबल्यास आले तेव्हा यानींही सुभेदाराकडे पत्रें पाठविलीं कीं, येथे असा प्रसग प्राप्त जाला आहे आज्ञा येईल तसे करू.

---

**(७०) कोण्या नावाची** – कोण्या फलाण्या नावाची. लेखकास नाव स्मरत नसल्यामुळे असे लिहिले आहे. **ह्मणार** – मोडी वाचनाची चूक. लढणार असे पाहिजे. लढणार:– लढवय्या असा एक खुशालकुवर होता, तो मेला किल्ल्यात मजबुती पुष्कळ होती. परतु खुशालकुवर मेल्यामुळें धनी किंवा पुढारी नाहींसा झाला. म्हणून किल्ल्यातील लोक तो टाकून पळून गेले. **जंबुरा** – एक तऱ्हेची तोफ. ही उटावरून चालवीत असत. **ऐवज** – ऐवजासाठीं. **वरात** – सध्याच्या चेकसारखी पैसे पटविण्यासारखी हुडी किंवा हुकूम. **दुतीघर** – द्वामुष्यायण ? दोहीकडे अग देणारा ? दुदील ? तरतें बुडते पाहात बसणारा ? **याच्या गोडीत शिरून हिमायत केली:**– यांच्याशीं सख्य करून वजन मारलें, वशिला लावला. **येणार नाहीं** – पैसा येणार नाहीं. वसूल मिळणार नाहीं. खंडणी हातीं लागणार नाहीं.

तेच दिवशीं होळकराकडील पेंढारी याणीं शिंद्याकडील फौजेचा तीनशें उंट व कांहीं घोडे बैल व बंदीशाळा ही लुटून आणलीं. ही अनाहूत फिसाद होऊन त्यांनीं चालून घेतलें. यानींही बुणगे छाटून पुढें रवाना केले. सडा घोडा राऊत मुकाबला सांभाळीत सांभाळीत जयपूरचे मुलकांत आले. सुभेदाराचा मुक्काम बनारसचे कांठीं होता

(७१) एक दिवशीं जयपूरवाल्याचे व शिंद्याचे फौजवाल्याचे अंत्र एक (असता) इकडे दौलतराम हळदे जयपूरचे कारभारी याजला आणून सुभेदारांनीं ताव दिल्हा कीं, ऐवजास इल्लाबिल्ला दाखऊन आमचे आपसात कलह उत्पन्न केला. त्यानें उत्तर केलें कीं, "तुमचे हत्तीची लढाई तुमचे तुम्ही जाणा. आम्ही पैसा कबूल केला तो देऊ–आम्ही त्यांचेही देवाळ व आपलेही देवाळ. जबरदस्त असेल तो घेईल." असें बोलणें होताच त्यासमयीं गोपाळराव व जिऊबादादा याचा छापा बापू होळकरास सोडून सुभेदारावर आला. पाराशर दादाजी जुवामर्द सर्वा गोष्टींस बहाद्दर परतु स्वभाव तपीक. सुभेदाराचा हात धरून वोढून "कसचें कपाळाचें बोलणें बोलता? हरीप उरावर आला." सुभेदारांस घोड्यावर बसवून, दोन हजार स्वार हुजुरातीचे बराबर देऊन पुढें काढून दिल्हें. मागें शिलेदार कांहीं हुजरात घेऊन जातीनें मुकाबल्यास राहिले. बाजार वगैरे कदूप सुभेदाराचे मागें रवाना केला. तों शिंद्याकडील फौज नदी उतरून आली. त्याठिकाणीं दोन घटका हुरमठ फार मोठी जाली. माणीकचंद हजारी व

---

(७०) बंदीशाळा – शत्रूकडील पकडून कैद करून आणलेले लोक? फिसाद – कटकट, फितूर. छाटून – निवड करून, निराळे काढून. बनारसचे कांठीं – बनासचे काठीं असें पाहिजे. हें नदीचें नांव आहे.

(७१) अंत्र – सूत्र, आतडे. एक अंत्र असणे – एक विचार असणें, सख्य असणें. ताव देणे – समज देणे, जरब देणें. इल्ला बिल्ला – चाळवणी, देऊ दिलाऊ करणें. तुमचे हत्तीची लढाई – तुमची हत्तीहत्तींची लढाई. एकाला शरण जावें, तर दुसरा मारणार. तेव्हां आम्ही दोघानाहि शरण जाणार. तुमच्या दोघांत मारामारी होऊन जो विजयी ठरेल त्याला आम्ही खंडणी देऊ. देवाळ – देणेंकरी. तपीक – वाचनाची चूक मूळशब्द 'तपीळ' किंवा 'तपळ' असा आहे. त्याचा अर्थ 'तापट,' 'तल्लख' असा होतो. हरीप – शत्रु. कदूप – मोडी वाचनाची चूक. 'लादून' असें पाहिजे. हुरमठ – झुरमठ, झोंबाझोंबी, मारामारी, हातघाई.

शिरोजी वाघमारे असे पांच पन्नास नांवांचीं माणसें कामास आलीं. दिन-करराव पागनीस याजला भाल्याची जखम लागली. तेव्हा सांभाळून पाठीवर घ्यावी. (पण ) निशाणाचा हत्ती भवानी शंकर मागें फिरेना तेव्हां निशाण उतरून घेतल्या-वर मागें फिरला. प्रसंगीं माणसें कामास आलीं इतक्या अवसरांत सुभेदाराचा याचा चौ पाचा कोसांचा छाटा पडला. तों इतक्यात बापू होळकरही येऊन सामील जहाले. तो सरंजाम आलियावर मुस्तकीम होऊन मुकाबल्यास खडे उभे राहून मागें ढाला उभ्या केल्या. त्यानींही यांची बळकटी पाहून तीन कोसाचे छाटीनें मुक्काम केला. सुभेदार बावीस कोस, मौजे बावी तालुके ब्राह्मणगाव, हडोतीचा अम्मल जहागीर होळकराची, गढी मजबूत, पाणी चाऱ्याची सोय, असें पाहून मुक्काम करून, महेश्वरीं बाईसाहेबास पत्रे रवाना केलीं कीं, “ येथें प्रसग असा गुदरला. इत.पर खर्चाची व फौजेची मदत जाली पाहिजे.” वर्तमान मातोश्रीसाहेबास समजून अगुष्टाची आग मस्तकास गेली. तुकोजी होळकर मारला गेला असता चिंता नव्हती, परंतु म्हातारपणीं चाकराचे हातून बदनक्षीची गोष्ट ! असो “ जीवन्नरोभद्रशतानि पश्येत् ” ऐसा धैर्याचा विचार करून पाच लक्ष रुपयेच्या हुंड्या सुभेदाराकडे पाठवून पत्र लिहिलें. त्यातील आशय कीं, “ हिंमत न सोडता हरामखोरांचें पारपत्य करावें. खर्चाचा व फौजेचा श्वेत बाधितें. म्हातारपणीं जरब खाली असल्यास लिहून पाठ-वावें. मी डेरे दाखल होते.” अशा रवानग्या तिकडे दोन चार लगत करून, देशीं दहा कारकून नालबंदी बाबद ऐवज बराबर देऊन खानदेशांत व स्वदेशी पाठवून शिलेदार आणिले. एक्या महिन्यात दहा हजार हजेरी होऊन चिमणाजी फडणीस याजबराबर रवाना केले. दुसरे महिन्यात आठ हजार स्वाराची हजेरी जाली. काशी-राव होळकर जयपूर प्रातीं देवाशाचे मुक्कामींहून लग्नाकरिता महेश्वरीं आले होते. त्याचेबराबर रवाना केली. अशा फौजेच्या चुंगी पाचशें, हजार, पधराशें, दोन हजार जशी हजेरी होत गेली तशी पाठवीत गेले. याशिवाय सुभेदारानीं गोसावी

---

(७१) तेव्हा सांभाळून पाठीवर घ्यावी – तेव्हां अधिक हानी होऊ न देतां माघार घ्यावी. प्रसंगीं – तेवढ्या अवधींतहि. म्हणजे हत्तीवरून निशाण उतरून घेईपर्यंतच्या थोड्याशा अवधींत झालेल्या हातघाईत कांही माणसें ठार झालींच. छाटा – छत्र, अतर. ढाल – निशाण. अंगुष्ठाची – पायाच्या अगठ्याची. श्वेत – सेतु, पूल. श्वेत बांधणें – एका पाठोपाठ रवाना करीत राहाणें. जसें ‘ पत्रांचा श्वेत बांधला.’ लगत – लागोपाठ. चुंग किंवा चुंगी – टोळी. गोसावी-बैरागी – या उत्तर हिंदुस्थानांतील लढाऊ जमाती होत्या.

बैरागी चाळीस हजार ठेविले. चाळीस हजार स्वारांचा भरणा जदीद कदीम जाहला. याशिवाय पायदळ. रोज लढाई चालली. एक दिवशीं त्यांनीं कंपू पुढें घालून मागें फौजेच्या मुकाबल्यास आले. तोफांच्या माऱ्याखालीं यांचा टिकाव न होतां पाय उठले. सांभाळून मुकाबला सोडविला. पुढें विचार करून सुभेदार व बुणगे कोव्यास पोंचून नगारा, घोडा, राऊत बापू होळकर व पाराजीपंत राहिले. मग मुकाबला न पडता पलटणास घेराघेरी केली. पलटण सोडून स्वार सरंजाम मुकाबल्यास आल्यास उचलून घ्यावे याप्रमाणें कजाखी तीन महिने केली. तीन महिन्यात त्याचे लष्करांत रुपये शेर अन्न व रुपयाच्या पांच पेंढया चाऱ्याच्या जाल्या. ते कायर जाले. मग त्याजकडील पेगाम आला की, जाली गोष्ट ही भविष्यावर टाकून, आपण धणी, मागें आम्ही सेवक, पूर्वींपासून मुलकाच्या वगैरे वाटण्याचे शिरस्ते, त्याप्रमाणें अतरवेद वगैरे मुलकाची वाटणी घेऊन आम्ही ताबेदार. सुभेदारानीं एखादी मोहीम करावी आम्ही चाकरीस हजर ( राहावें ) याप्रमाणें पेगाम आल्यावर सुभेदारास लिहून परवानगी आणली. त्याजवरून पाराजीपंत बाबा व बापू होळकर व गोपाळरावजी व जिवबादादा याच्या भेटी होऊन यादी बुदी ठरून यांचा बेलभंडार त्याची उदी परस्परें सलामाइ जाली.

( ७२ ) तो महेश्वरी मल्हारराव होळकर सवाई यानीं महेश्वरीहून बाहेर पडून बड केलें. खानदेश स्वदेश मोंगलाचा मुलूख लुटून दहा हजार फौज जमली होती. तें बंड श्रीमंतानी फौजा पाठवून बुद्धीबळाचे खेळासारखे घेरीत घेरीत वाफगावचे किल्ल्यात आणला. तेथें हस्तगत करून पुण्यास नेऊन महेश्वरी बाईसाहेबांपाशीं

---

(७१) जदीद – नवा. कदीम – जुना. पाय उठणे – धर न धरवणें. उचलून घ्यावें – त्यावर उलटून पडावें. कजाखी – कष्टाची लढाई, मेहनत. कायर – कायल म्ह. घाबरे पेगाम – पैगाम–बोलणें. झाली गोष्ट ही भविष्यावर टाकून – अदृष्टात होते त्याप्रमाणें न व्हावी ती गोष्ट हातून झाली, ती आता विसरा. यादी बुदी – करार, करारांचीं कलमें. उदी – पिराजवळ ऊद जाळून त्याचा अंगारा प्रसादार्थ घेतात तो. बेलभंडार, उदी, गंगाजळ, देवावरील तुळशी फुलें इ० देऊन शपथप्रमाण करण्याची पूर्वी पद्धत असे. सलामाई – दिलजमाई, सख्य.

( ७२ ) मल्हारराव होळकर सवाई – तुकोजी होळकराचा मुलगा मल्हारराव. सवाई हा इंग्रजींत Junior किंवा The second असे लिहितात त्यासारखा देशी शब्दप्रयोग आहे. जसें सवाई माधवराव, सवाई जयसिंग, सवाई शिकदर.

मावतें केलें. त्याची उमेद कंपूस एक दिवसांत मारून बराबर करीन ! हें बोलणें. देशी बंडांत मोंगलाशीं व श्रीमंताशीं पन्नास पन्नास स्वारांनशीं कुदून पडून फौज हात बेहत्तर केल्या. त्या भरंवशियावर हें बोलणें गोडसें वाटून जोत्याजी घोरपडे वगैरे नांवाचीं माणसें दहा हजार फौज बराबर देऊन रवाना केले. ते येऊन पोंहचले. मातोश्रीचा लेख गेलाच होता कीं, समेट जाहला हा सर्वोपरी चागला. परंतु जाल्या गोष्टीची उजळणी न जाली हें अंत:करणीं खटकणी राहिली. यानंतर मल्हारराव होळकर दहा हजार फौजेनशीं येऊन पोंहचलें याचे शूरत्वाचे वोहोम्यावर व मुख्य भावी होणारान्मुख बुद्धि उत्पन्न होऊन ठरला प्रकार बेलभंडारसुद्धा त्या गोष्टीस फेरपगडी बाघून बदलून गोष्ट सागितली यात पाराजीपत, बापू होळकर यांनीं तीन महिने श्रम करून वचनात आल्या गोष्टी रहीत होऊन पूर्व दिवस प्राप्त जाला. यांत उभयता उदास जाले पुन्हा घेराघेरी चालली सुभेदारानीं मथुरेचे मुक्कामीं जुजरनेक फराशिस चाकर ठेवून कपू तयार करण्याविशीं आज्ञा केली होती त्याचीं पांच पलटणें तयार जालीं होतीं. लढाईचा मुकाबला ठरला. त्याचा कपू याची पलटणें त्याचीं साठ तोफ व यान्या पाच तोफा. लढाई सुरू जाली. यांच्या पांचा पाचा पलटणाची बरोबरी गोसावी चाळीस हजार त्यात बाणाच्या कैन्या. सूर्योदयापासून ( तों ) चौदा घटका तोफाची लढाई जाली. त्यांत त्याच्या चौदा तोफा गैर उपयोगी करून छकड्याखालीं पडल्या. डबई झाडावर चढून दुरभीण लावून पहात होता. त्या खादीस गोळा मारून खालीं पाडला. चौदा घटकेंत पाचा तोफांनीं सत्तावीस हजार गोळे मारले. दोन प्रहरचा समय. पाणी पाणी मनुष्य करूं लागलें त्याचे कंपूंत उटान्या पखाला भरून येऊं लागल्या. इकडे पाण्याचा तोटा. येणें करून गोसावी व बैरागी याचे पाय उठले. पलटणात सरंजामाची कमती पडली म्हणून, एवं पलटणें बैरागी निघाले. स्वाराचेही पाय उठले. लाखेरीचे

---

(७२) **कुदून पडणें** – उडी घालून पडणें. **फौज हात बेहत्तर** – वाचनाची चूक. फौजा तारबतार केल्या असें पाहिजे. **तारबत्तार** – तारबतार म्ह. उध्वस्त, विकीर्ण, दाणादाण. **उजळणी न जाली** – उट्टे काढतां आलें नाहीं. **खटकणी** – बोंच, रुखरुख. **वोह्मा** – वहमा, आवाई, लौकिक. **भावी होणारान्मुख** – भविष्यांत होतें त्याप्रमाणें. **फेर पगडी बांधणें** – वचनभग करणें. **जुंजरनेक** – दुद्रनेक. **कैची** – २४ बाणाची गड्डी. **बाण** – दारूचे बाण. **छकडा** – तोफ ज्यावर घातलेली असते तो गाडा. **यांचे पाय उठले** – हे जागा सोडून निघून गेले, पळून गेले.

बारींतून निघता त्या तलावाचे काठीं मल्हारराव होळकर फारबस होऊन पाण्यांत पडले आहेत. ज्याचे भरंवशियावर फेरपगडी, त्याची ही दशा !! मग त्यांजला उचलून हत्तीवर बसवून तेथून काहडलें. तों मागाहून शिंद्याकडील पेंढाऱ्यानें लगट करून खराबा बहुतच केला. भिकाजी होळकर सुभेदाराशीं येत तोंपर्यंत तीन घोडे ठार जाले. वाटेंत पाणी नाहीं. पाराजीपंत बाबा सुभेदारांपाशीं आले. घोड्यावरून उतरून तळतळून सुभेदारांपुढें हात करून "जाल्या गोष्टीस फेर-पगडी बांधल्याचें फळ पावला आतां उठा. माझा मार्तंड मल्हारी आला." तो समयास फरबस होऊन तलावांत पडल ा. त्यास साभाळून आणणें कठीण पडलें. खंडोबा खडोबाचे जागां राहिला. म्हातारपणीं अपेशाचे ठिकरे घेतलें. मग सुभेदारास उठवून हत्तीवर बसवून काहडलें. पळती फौज, पाणी पधरा वीस कोस नाबूद, त्यात पेंढाऱ्याची अडचण. सुलतानपुरापासून तीन कोस गांव तेथें तलाव होता. त्या तलावाचें पाणी आटून कर्दम शेष राहिला. तो मागाहून आले त्यांनीं वस्त्रें घालून पिळून प्याले. ही दशा जाली. शेंकडों घोडे व शेंकडों माणूस पाण्या-वांचून गावखुद जहाली. या तऱ्हेनें मुकुदराव उतरून दरकूच इंदुरास आलें. गोपाळराव चिटणीस याचे मनात धर्म होता कीं, सुभेदारास जिवंत धरून पाटिल-बावापाशीं न्यावें, आणि तो करताही. परंतु जिवबादादा जुना माणूस दुरांदेशीचा, त्यानें बनासचे छाप्यात व लाखेरीचे लढाईंत टाळा दिल्हा. लाखेरीची हार जाल्या-वर त्यानें गोपाळराव व कपू याजला लाखेरीची बारी उतरूं न देता आपण जातीनें मुकुंदराव हे रामपूर प्रगण्यात येऊन मेवाडकडे निघून गेले. इकडे पिच्छा केलाच नाहीं. यामुळें इमान ठिकाणीं राहून भावी प्रारब्धानुसार होणें तितकें जालें. हें वर्तमान महादजी शिंदे यांजला पुणें मुक्कामीं समजल्यावर आबा चिटणीस यांनीं तोफा सोडण्याविशीं परवानगी तीन वेळा विनंती केली, परतु पाटिलबावा बोललेच नाहींत. तिसरे वेळेस झडझडून उत्तर केलें कीं, "आपसांत कटकट करून

---

(७२) फारबस – 'परवश' असा शब्द साने यांनीं सुचविला आहे. परवश – बेहोष झाल्यामुळें तर नव्हे ? मल्हारराव एक नंबरचा व्यसनी व दारूबाज होता. जाल्या गोष्टीस फेर पगडी बाधल्याचें फळ पावला – ठरलेला करार मोडलात त्याचें प्रायश्चित तुम्हांस मिळालें. समयास – लढाईच्या वेळीं. ठिकरे – खापर. नाबूद – साफ, स्वच्छ. गावखुद – नष्ट. मुकुन्दराव – मुकुदरा असें असावें. मुकुदरा हे स्थानिक विशेष नाम आहे. धर्म – अतस्थ हेतु. टाळा देणें – पळ काढणें. हार – पराभव.

आम्हांचे भाऊपणियांत पाणी घातलें ! तोफा सोडण्याविशीं मजला वाटत नाहीं ! इतक्यावर सुभेदारांची माझी भेट होत नाहीं. " डोळ्यांस पाणी आणलें. गोपाळराव यांस कैद करून भेलशास ठेविलें. जिऊबादादा यास बोलावून आणून हुजूर घेतलें. सुभ्याचें काम जगन्नाथराम व लक्ष्मण अनंत याजकडे सांगितलें. त्याच वर्षांत महादजीबावांचा काळ जहाला. पाटिलबावा जिवंत असतां सरदारीचीं वस्त्रें दौलतराव शिंदे यांस द्यावी असें मनांत होतें. तोच मजकूर कारभारी यानीं श्रीमंतांचे कानावर घालून विनंती केली. त्याजवरून श्रीमंत कृपावंत होऊन पाटिलबावांचे मनोदयानुरूप वस्त्रें सरदारीचीं दौलतराव शिंदे यास दिलीं. पुढें मोंगल चढाई करून आले. त्याचे मुकाबल्यास श्रीमंत जातीनें जावें हा इरादा धरून बाहेर निघाले. होळकरांस पत्रें आलीं कीं, तुम्ही सरंजामसुद्धा येऊन सामल व्हावें म्हणून. येथें फौज मनस्वी, हिशेबाचा राडा पडला होता, ( तो ) राडा निपटून सुभेदार महेश्वरीं आले पुढें श्रीमंताचे आज्ञेप्रमाणें हजर होण्याचा विचार तावत्कालपर्यंत दिवाणगिरीचे मोहोगम होतें. पाराजीपंत, खंडोपंत काम करीतच होते 'असें' 'नाहीं' म्हणावयास पाराजीपंतबावा. परतु मातुश्रीबाईसाहेबाचा व सुभेदारापासून शिलशिला लोभाचा व ऋणानुबंधही रावजी महादेव पारनेरकर फडणीस याचे घराकर यांतील वास्तविक अर्थ व निदर्शनें बाईसाहेब कारभारात अव्वल अखेर माहीतगारी त्यांची व सुभेदारही तोंडापुढेंच होते. त्यांजलाही ठाऊक. त्या ओघावर सुभेदार मातुश्री एखादें बारीक मोठें विचारणें तें खंडोपंतास विचारीत असावें, त्या धोरणावर ओघ चालावा, असा क्रम होता त्या प्रसंगीं खंडोपंत यानीं विचार केला कीं, श्रीमंताचे हुजूर जाणें. समयसमर्पक द्रव्याचा, राजकारणाचा, लढाईचा प्रसंग तेव्हां मुकत्यार कोणी असावा म्हणजे धण्यास पुसावयास व आपल्यासारखे गोरगरीबांचे बचावास नीट. यास्तव नारो गणेश बहुतां दिवसाचे पदरचे. भविष्यानुरूप धण्याचे लक्षांत न जपतां कंबेशी आली न आली त्याचें फळ पावून प्राणास मुकले, तं पक्षीं त्याचेच मुलास वस्त्रें देऊन बाळाजी लक्ष्मण व त्याचे मुतालक श्रीपतराव मैराळ रांजणगांवकर यानीं उभयतांनीं कारभार करावा ही सल्ला खावंदास

---

(७२) भाऊपणीयांत पाणी घालणें – भाऊपणांत विक्षेप आणणें. स्नेहांत वैर पाडणें. तोफा सोडण्याविशी मजला वाटत नाहीं – तोफा सोडाव्या खुषी करावी असें मला वाटत नाहीं. हुजर होण्याचा विचार तावतकालपर्यंत – हुजर होण्याचा विचार पका ठरेपर्यंत. मोहोगम – मोघम, पक्के नाहीं असें. शिलशिला – ऋणानुबंध.

देऊन नमूद सिद्ध केली. सवत १८५१ चे सालीं वस्त्रें दिल्हीं. रामराव आप्पाजी पळशीकर याजलाही म्हाळसाकांताचीं वस्त्रें जालीं.

( ७३ ) याप्रमाणें बंदोबस्त होऊन पुण्यास याक्याकरिता सुभेदार नर्मदा उतरले. पुणें मुक्कामीं दाखल जहाले. श्रीमंत भोंसले, शिंदे, होळकर व किरकोळ सरदार मानकरी मिळोन असख्य सैन्य जालें. दहा कोसांत तळ रहात होता. तसाच मोंगलहि असंख्य सैन्य मिळवून तीन वर्षाचा सरंजाम भारबरदारी करून आले होते त्यात श्रीमताचे प्रतापें करून एक्याच लढाईंत मसलत सिद्ध जाली. लौकिक शिद्याकडील तोफखाना व भोंसल्याकडील बाण याचा फार जाला. परंतु तरवारीशीं गांठ परशुरामभाऊ पटवर्धन मिरजकर व होळकराशींच पडली! यांतील दर्याप्तीनें ज्या प्रसंगीं हिंडण्यात वागण्यात त्यास आहे नानासाहेब यांस पुर्ते उमजलें होते.

( ७४ ) हा अध्याय संपल्यावर श्रावण वद्यात चतुदर्शीस मातोश्रीबाईसाहेबाचा काळ जाहला. त्यासमयीं सुभेदाराचे कनिष्ठ बंधु संताजी होळकर किल्ले सेंदव्याचे जिम्मेस होते, ते समयास येऊन हजर जाले. उत्तर कार्य त्यानीं केलें. प्राणोत्क्रमण बहुत सावधानीनें जालें. श्रावण मासचा महिमा. बारा हजार तेरा हजार पात्र जेवण्याचे, त्याचा सकल्प सोडून, आसन्नकाळीं मोक्ष धेनु उत्क्रात धेनु ( दिल्या ), वर्माची प्रवृत्ति होऊन, नामस्मरणाचे घोषात देहावसान जालें. त्याच

---

(७२) म्हाळसाकाताचीं वस्त्रे – देवाचीं प्रासादिक वस्त्रे.

(७३) दहा कोसात तळ रहात होता – सैन्य इतकें अगणित जमलें होतें कीं, त्याला दहा कोसाएवढें विस्तृत्त क्षेत्र उतरावयास लागत होतें भारबरदारी – सामानसुमान वहाण्यासाठीं बैल, उट, तट्टे, वगैरे. यांतील दर्याप्तीनें ज्या प्रसंगीं हिंडण्यांत वागण्यांत त्यास आहे – "यांतील दर्याप्त जे त्या प्रसगीं हिंडण्यांत वागण्यांत होते त्यांस आहे" असें पाहिजे. दर्याप्त किंवा दर्याप्ति – समजणूक, आकलन, भावार्थ, त्याप्रसगीं जे हजर होते त्यांना या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे. नानासाहेब – नाना फडणवीस.

(७४) किल्ले सेंदव्याचे जिम्मेस होते – सेंदवा किल्ल्यावर किल्लेदारीचें काम करीत होते. सावधानीनें – शुद्धीवर असता. श्रावणमासाचा महिमा – धार्मिक दृष्ट्या अति महत्त्वाचा असा श्रावणमास सुरू असल्यामुळें. मोक्ष धेनु आणि उत्क्रान्त धेनु – ही मरणसमयीं करावयाचीं दाने. सुखानें मृत्यू यावा व पापक्षालन व्हावें म्हणून मरणसमयीं गाई दान करीत असत. त्या दानांची हीं नांवें आहेत.

समयीं प्रातःकाळीं दर्शनी गाय होती तिनें हामडोन प्राण सोडला. बाईसाहेब होळकरांचे घरांत आल्यापासून समजूं लागल्यावर खंडेराव होळकर यांचे जहाला सरदारी चलण, त्यांत घुटी प्राधान्य. खर्च वगैरे अव्यवस्थित. आचारही सदहू अन्वयें. यामुळें वृत्तीस उदास राहून सासू सासऱ्यांचे सेवनी तत्पर असून अंबादास पुराणीक याजपासून परत्र साधनाची कांहीं व्यवस्था ग्रहण करून सासुरवाशी सबब चोरून जपून युक्तीनें त्या वस्तूचें दास्य करीत राहिल्या. महिन्यांतून दोनवेळ तीनवेळ खंडेरावमहाराजाकडील बोलावण्याचा प्रसग येईल ते दिवशीं खाशानीं सर्व गोष्टी व्रतस्थ रहावें. थाळाही दुवक्तीं हिकडून जावा. प्रहररात्र जाहल्यानतर बाईसाहेबांनीं डेऱ्यात जाऊन सहा घटका रात्र रहाताना निघून ( परत ) यावें, अशी रूढ. यांत ईश्वरी कृपेंकरून एक पुत्र व एक कन्या मालराव बावा व मुक्ताबाई जालीं. थोरले सुभेदार यांचा पूर्ण लोभ. कशीही तबियत बेज्याह असल्यास बाईसाहेबांचा निरोप गेला असतां त्याप्रमाणें व्हावयाचें. दौलतींत उत्पन्नाविशीं सुभेदाराचें प्रारब्ध व पराक्रम. परंतु व्यवस्था करणें, नफानुकसानी पहाणें हें कारभारी यानें बाईसाहेबांचे आज्ञेनें करीत असावें. असाच ओघ. याचप्रमाणें गौतमाबाईसाहेबांचाही लोभ करणें ( असे ) बाईसाहेबाचे करण्याची रीत प्रखर. धनीपणाचें वारें कांहीं एक न ठेविता कोणतेंही करणें ते करावें. दुसरें, खावंद या प्रकारचे, परतु स्नानसंध्यादि आचाराविषयीं सबाह्य एकरूप. येणेंकरून दिवसेंदिवस जास्ती वाढून खंडेरावमहाराज कुंभेरीवर कामास आले. तेसमयीं सहगमनाचा निर्धार. परंतु सुभेदारानीं बहुतच ग्लानी केली. दौलतीचे सांभाळण्याविषयीं खंडू हें नांव तुजला ठेऊन मी उत्पन्नाची काळजी करून होतों हें माझें सौभाग्य कायम ठेवणें असल्यास विचार करावा. तेव्हां बाईसाहेबांनीं सुरत सांभाळल्यावर इष्ट अराध्य सुभेदारच असें मानून काळ काहाडला. तेव्हा संकोच प्राप्त होऊन मनेच्छा रहित

---

(७४) दर्शनी गाय – रोज सकाळीं जिचें दर्शन अहिल्याबाई घेई ती. हामडणें –हबरडा फोडणें. जहाला – जहाल. चलण – वर्तणूक. घुटी – आंबलेला पदार्थ, दारू वगैरे. ( कांहीं ) व्यवस्था ग्रहण करून – कांहीं मत्र वगैरे घेऊन. त्या वस्तूचे दास्य करीत राहिल्या – त्या मत्राचा जप करीत राहिल्या. थाळा – जेवणानें ताट. हिकडून – अहिल्याबाईकडून. रूढ – पद्धत. बेज्याह – अनावर, सतत, ओघ – पद्धति, वहिवाट. प्रखर – प्रकट, किंवा उघडाउघड. खावंद – नवरा. ग्लानि – अजीजी, आर्जव. सुरत संभाळल्यावर – शरीर सांभळतां येऊ लागल्यापासून, कळू लागल्यापासून.

केली. सुभेदारांची सर्वोपरी झकली त्यात दबाऊन आदिपश्चात विचाराच्या गोष्टी बोलणें असें पुण्य व भीड अहिल्याखेरीज दुसरे कोणाची नव्हती. अशा वर्तणुकीनें ईश्वरें पुत्ररत्न नेऊन दौलत आपले हातें दुसऱ्याचे घरांत घालून स्वच्छ रेवातीरीं वास करून स्नान-संध्या-दान-धर्म यांतच निमग्न राहून दौलतीचें धोरण दक्षण उत्तर महालची वहिवाट लावणी-उगवणी दामदस्त बाईसाहेबांपाशीं. दरम्यान सुभेदाराची बैठक वाफगांवीं पडून आठ चार चा ( ? ) प्रसंग प्राप्त जाल्यावर खानदेश गंगातीर महालची चुकोती वाफगावीं करीत जावी, म्हणून सांगून पाठविलें. जातीनें महालची वहिवाट केली. धर्माचा लौकिक परंतु पंधरा लक्षांची गांवखेडीं चालले होते तेव्हा वाड्यांत पाहिजेल तें केलें. परंतु महालचे रुपयेपैकीं धर्माकडे एक कवडी न खर्चेता तिसरे वर्षी चवथे वर्षी हिशेब मामलेदारापेक्षा जुजरशीनें वाफगांवीं पाठऊन द्यावे. त्यात लाख दोन लाख आपले फाजील व घरचे बंदोबस्त. याप्रमाणें राजकारणसबंधीं. दादासाहेब आनंदीबाईसह लहान मोठा सरदार विठ्ठल शिवदेव, राजेबहादर आदिकरून कोणी विरामास आले नाहींत असे राहिले नाहींत. त्याचे मनोदयानरूप हातीं कर्तव्यतेविशीं नानाफडणीस यांस लिहून पुसून ऐक्य करून रवाना केले. श्रीमताचे दौलतीचे बारीक मोठे विचार आपले हातें ठेऊन वैराग्याचा प्रकार करून स्नान-सध्या, दान-धर्मादि वार्ता कापेटचे म्हातारीस देखील ठाऊक. दोन हजार तेलंग द्राविडांचीं कुटुंबें अक्षयी राहून वंशावळीचे विस्तार होऊन सोयरिका येथेंच जाल्या. हिंडणार वागणार मनुष्यास यांतील दर्जे माहीत असावा याजोगेंच.

( ७५ ) असो. बाईसाहेबाचा काळ जहाल्यानतर काशीराव होळकर महेश्वरचे बंदोबस्तास रवाना केले. महेश्वरीं आल्यावर जखीऱ्याची व जामदारखान्याची वगैरे मोजदाद करून यादी सुभेदारांकडे रवाना केल्या. पुढें आश्विन शुद्ध १४ स श्रीमंत सवाई माधवरावसाहेबांचें देहावसान जालें. पुढें सुभेदाराची प्रकृत परतंत्र होत चालली. समक्ष कारभारी बाळाजी लक्ष्मण व श्रीपतराव मैराळ व बळवंतराव

---

(७४) **झकली** – झकली–स्वच्छदी वृत्ति. **आठ चाराचा प्रसंग** – भांडणाचा प्रसंग. **जुजरसी** – चवकशी. **विरामास आले नाहींत** – आश्रयास आले नाहींत. **हाती कर्तव्यतेविशी** – 'इतिकर्तव्यतेविशी' असें वाचन पाहिजे. **कापेटचे म्हतारीस देखील ठाऊक** – भावार्थ असा दिसतो कीं, भारताच्या कोनाकोपऱ्यातील म्हाताऱ्या कोताऱ्यापर्यंत तिच्या दानधर्माचा बोलबाला झाला होता. **दर्जे** – सबध, सगति.

(७५) **जखीरा** – धान्याचें कोठार.

बाकडे. परंतु अंतःकरणीचा विचार शरीराचें अवसान पाहून खंडो महादेव व पाराशर दादाजी यांस सल्ला विचारली कीं, " साप्रत काळीं शरीराची दशा या प्रकारची. घटकेचें शाश्वत नाहीं. दौलत अव्यवस्थित या प्रकारची. तेव्हां दौलतीचें ओझें कोणाचे माथां द्यावें ? दोन पोरें दोन प्रकारचीं. " तेव्हां उभयतांनीं यथाबुद्धि सुचेल ती विनंती करून बोलले कीं, " दौलतीचें थामडें कायम ठेऊन, चार जुने माणसें वडिलांचे व आपले हातचीं जनलाज मनलाज धरून काशीराव होळकर वागवील. वरकड मजकूर जाल्यास जुने माणसांस देशांतरास जावें लागेल. आयुष्याचें पहाणें आपणही पहावें ध्यानास यावयाजोगें ( आहे. ) केवळ आमचे सांगितल्यावर राहूं नये. " तेव्हां सुभेदार यांचे गळीं उतरून आनंदराव माधव नि॥ बुळे याजला तेच समयीं बोलावून चार गोष्टी दौलत प्रकरणीं उपदेशप्रद ठरण्यात आल्या. गोष्टीबाबत सागावयाच्या त्या सांगून सत्वर येण्याची ताकीद करून मशारनिल्हेची रवानगी दुसरे दिवशीं काशीराव होळकर यांजकडे केली मशारनिल्हे महेश्वरीं दाखल होऊन अज्ञापित विषय तेच निवेदन करून चाल चालावयाचा विचार तों काशीराव होळकर याजला पुत्र जहाला. तेव्हा चार पाच महिने राहण्याचा विचार होऊन पुत्रोत्साह बाईसाहेबांचें कृतीप्रमाणें जाला. पुणें मुक्कामीं सुभेदार याणींही तसेंच केलें जोशी व शास्त्री व व्यापाराचीं माणसें याजला गांव इनाम, पालख्या सुभेदारानींही वाटल्या. आनदराव माधव यांची रवानगी आठा चौ दिवसात सुभेदाराकडे केली कीं, चौ पांचा महिन्यानीं वडिलांचें पायापाशीं येऊन दाखल होतों. त्याजवर महेश्वरीं महालचे हिशेब व हुजुरांत पागानिहाय हजेऱ्या, गणत्या, दादी, फिर्यादी, जुजरनेकाची समजूत इत्यादि कामें होण्यास दोन दिवस आरतेपरते लागल्यामुळें ( येणें झाले नाहीं ) सुभेदारांची शरीरप्रकृति दिवसें-दिवस गळित ( म्हणून ) पुन्हा आनंदराव माधव व सुकजी बारोसे व सोमाजी लांबहाते, म्हाळोजी बारगळ इतक्याची रवानगी होऊन स्वच्छ ताकीद तेथील कामें तशींच ठेऊन चिरंजिवास उचलून घेऊन येणें. ते येऊन पोंचल्यावर आणखी मास पक्ष लागून मुखत्यार महेश्वरीं रामराव आबाजी पळशीकर व आबाजी रणछोड

---

(७५) **थामडे** – डोलारा. **वरकड मजकूर जाल्यावर** – अन्यथा मजकूर किंवा प्रकार झाल्यास, म्हणजे काशीरावाऐवजीं मल्हारराव होळकरास गादी दिली गेल्यास. **आयुष्याचे पहाणें** – चरित्र, वर्तणूक. **बाईसाहेबाचे कृतीप्रमाणें** – अहिल्याबाईच्या कीर्तीला शोभेल असा. **व्यापाराची माणसें** – कामकाजास उपयोगी पडलेलीं माणसें.

पागनीस राहुरीकर व भारमल होळकर यांजकडे मुकत्यारी ठेऊन वरकड दरखदार मंडळींचे कारकून आपलाले कामावर होते. हुजुरींहून मंडळी आली ती बाळासाहेबांस घेऊन दरकूच आले. मनमाडचे मुक्कामीं आलियावर डेरे उभे होत आहेत तों सुभेदारांची प्रकृत केवळ अवसानकाळास प्राप्त होऊन पत्रें आलीं कीं, जेवीत असल्यास पाणी येथें येऊन प्यावें अशीं पत्रें आलीं. तेव्हा पाच हजार स्वार काशीराव होळकर याजबराबर हुजुरात व इतलाखी सरंजामी होते, त्यांतून चौदाशें स्वार निवड करून ते वेळेस निघून सोळावे प्रहरास पुणें मुक्कामीं (येऊन) दाखल जहाले. चौदाशें स्वारात बारा स्वार ठरले. त्यात चौघे ब्राह्मण, आठ स्वार. खिजमतगार देखील एक नाहीं. प्रातःकाळीं जातांच सुभेदाराची भेट होताच मल्हारजी होळकरही सामोरे गेले होते ते बराबरच होते. बापू होळकर व भिकाजी होळकर जवळ होतेच येशवंतराव होळकर यानीं अवसानकाळीं सुभेदाराची सेवा फार केली, तेही सन्निध होते. सुभेदारानीं अगोदरचा बेत होता त्याप्रमाणें वस्त्रांची तयारी करून ठेविलीच होती. दिवाण फडणीस वगैरे दरखदार सर्व्व देखता काशीराव होळकर यास वस्त्रें दिलीं. सुभेदार यास नमस्कार करून मार्तंडाकडे चालले. ते समयीं मल्हारराव होळकर यानीं हात जोडून सुभेदारास विनंती केली, "मजला आज्ञा काय आहे?" उत्तर केलें कीं, "काशीराव यास माझे ठिकाणीं मोजून चाकरी कर. तो तुजला आज्ञा करील." हुकूम म्हणोन कुरणिसा करून काशीराव होळकर यांचे मागें आले. उभयतानीं मार्तंडास भडार बरोबर वाहून गादीकडे आले. काशीराव गादीस कुरणिसा करून गादीवर बसले. बधु वगैरे मंडळी दरखदार बराबरच होते. काशीराव गादीवर बसल्यावर मल्हारराव होळकर यानीं काशीराव यास कुरणीस करून चालले! बहुतानीं आग्रह केला कीं, या समयास जावें हें नीट नाहीं परंतु कोणाचें न ऐकिता आपले गोटात जाऊन नयबद दिली. कूच करून फिरग्या बेटाचे व मुळामुठा नदीचे दरम्यान मैदान होतें तेथें मुक्काम केला.

---

(७५) चौदाशें स्वारात बारा स्वार ठरले – मनमाड ते पुणें अशा दौडीत काशीरावाबरोबर चौदाशें स्वारापैकीं फक्त बारा स्वार मजलीला निभले. चालले – निघून चालले. फिरंग्या बेट – पुण्याच्या सगमावरची ब्रिटिश रेसिडेन्सी.

# काशीराव ऊर्फ बाळासाहेब होळकर

( ७६ ) पुढें भाद्रपद शुद्ध ८ संवत १८५२ ते दिवशीं सुभेदारांचें देहावसान झालें. क्रिया त्यांनीं वेगळी केली. सपिंड्याही दोन जाल्या. सवाई मल्हार यांनीं खानदेशात महालानिहाय फौजा पाठऊन दंगा पुरकस करून महालचा खराबा जाला. आबाजी लक्ष्मण व धोंडो माणकेश्वर व सदाशिव भवानी यानीं नंदुरबार, सुलतानपूर, आवेड वगैरे जागा धूळधुमासा करून दिला. त्या काळीं शिंद्याचा मोठा जळजळाट. तेव्हां महालचा पैसा येऊन पुरीं पडावा असा अर्थ राहिला नाहीं. दौलतींत काशीराव होळकर यांजला खर्चाची अडचण फार पडली येणें करून पागा, पीलखाना, दाम-दस्त बरबाद जहाले. मास पक्षात शिंद्याकडे, श्रीमंताकडे जाणें येणे जाल्यास सरजाम बाहेरून आणावा, येथवर वारद जाले. मग काशीराव होळकर यांणीं मसलत केली त्यांत रघुपत खंडेराव व बापू होळकर व चिमाजी बुळे याणीं कौसल करून शिंदे यांस पांच लक्ष रुपये देऊ, मल्हारराव हस्तगत करून आमचे स्वाधीन करावा, असा बेत ठराऊन बोलणीं, लिहिणीं, पुसणीं जहालीं. काशीराव होळकर यांचे अंतःकरणापासून मारावें असें नाहीं. परतु भोपे सबळ. रघुपत खंडेराव याणीं व बुळे, बापू होळकर यानीं काशीराया वेगळें बोलणें केलें कीं, हस्तगत न होता तैसाही प्रकार जहाल्यास चिंता नाहीं. हें बोलणें काशीरायास न समजता केलें. दरम्यान समेटांचेंही बोलणें जहालें कीं, “ माझा मनोधर्म व सुभेदाराची आज्ञा. त्याप्रमाणें बाळासाहेब मजला कैलासवासी सुभेदारांचे ठिकाणीं. माझे हातून मुखत्यारीचें काम घेतील तर त्याचा हुकूम मजवर, माझा हुकूम दवलतीवर. घेणें-देणें, स्वारी-शिकारी, श्रीमंताचा हुकूम, शिंद्यांचा भाऊपणा राखणें इत्यादि कांहीं एक आच लागू न देतां कैलासवासी वडिलांचे मागें

---

(७६) त्यानीं – मल्हारराव होळकरांनीं. **पुरकस** – लढाई, तटा. **धुळधुमासा करणे** – बेचिराख करणें, उध्वस्त करणें, लुटणें. **जळजळाट** – सताप. **पीलखाना** – हत्तीखाना **पील** – हत्ती. **दाम-दस्त** – दरोबस्त. **वारद, वारीद** – प्रविष्ठ, दाखल, प्राप्त. **येथवर वारद जाले** – येथपर्यंत स्थिति आली. **कौसल** – खलबत, मसलत. **लिहिणीं पुसणीं** – पत्रापत्री, लेखी करार-मदार. **भोपेसबळ** – भोप्या हा देवीचा पुजारी येथें मुख्य देव किंवा देवी काशीराव, परतु त्याचा सल्ला गुडाळून ठेवून पुजाऱ्यासारखे जे रघुपत खंडेराव त्यांनीं वेळच आली तर मल्हाररावास मारण्यासहि कमी करू नये असें ठरविलें। **तैसाही प्रकार** – मारून टाकण्याचा प्रकार. **आंच लागूं न देतां** – कांहीं एक कमी पडू न देतां.

चाकरी करून दाखवीन. हें न जाल्यास बाळासाहेब माझा बाप आहे, त्यानें आज्ञा केल्यास जोडा सांभाळून राहीन. नेमणूक देतील तितक्यांत गुजरा करीन. मजला कोणाच्या बापाचा संकोच नाहीं. परंतु बापू होळकर याजला काढून देणें म्हणजे मी सर्वोपरी अनकूल. बापूचें नांव यांत पैक्याची तरवारीची खामी पडेल. जाब मजपासून भरून घ्यावा. बापूचें निघणें न जाहल्यास ईश्वरें नेमलें तेंच घडेल. तिसरा जाब नाहीं." इकडे बापूचा अगत्यवाद विशेष पडल्याचें पोटीं, दिवसें-दिवस किलाफाची वृद्धि होत जाईल अशाही अडचणींत काशीराव हस्तगत करावें अशी गांठ बाबासाहेबाशीं तीन चार वेळ पडली. काशीरायाबरोबर मार्गी घोडे शेंपन्नास स्वार. बाबासाहेबाबरोबर पाचशें स्वार प्रति बाबासाहेबांस (?) सहजात उचलून घ्यावें असा प्रसग. परतु कैलासवासी सुभेदाराची आज्ञा व मनोधर्माचे बळकटीवर मुस्तकीम राहून एकटे पुढे येऊन घोडियावरून उतरून, कुरणीस करून आपले सरंजामात जावे काशीरायास वावगी नियत धरलीच नाहीं

(७७) दरम्यानवाल्यानीं किलाफाचे पर्वत टाकून सदरीं लिहिल्याअन्वयें मसलत सिद्ध केली. शिंदे यांणीं पैक्याचे लालचीनें कबूल केलें. जमियेतीचे धणी परंतु मल्हारजी होळकर हस्तगत करण्याचा विचार पडला कीं, दोन तीनशें स्वारानिशीं मुसळी मारून निघून गेला तर अवघडच. अथवा आपल्यावरि येऊन पडला तरीहि विचारच. शेवटीं कसेंही होवो, लेखपूस जाला तेव्हा उद्योग करणें प्राप्त आहे. विठोबा व येशवतराव होळकर हे बाबासाहेबाकडे जाऊन सामल जाले. आबेड परगण्याकडे सदाशिवभाईनीं काहीं सरंजाम घेऊन होते ते तिकडे मोंग-

(७६) **मनोधर्म** – मनापासूनची इच्छा. **सकोच** – आडकाठी, पर्वा, फिकीर. **बापूचें नाव यात पैक्याची तरवारीची खामी पडेल–खामी** – नुकसानी. बापू होळकरानीं दिवाण म्हणून काम केलें तर तो तुम्हास उत्पन्नांत खोट आणील व लढायांतहि अपेश आणील. **जाब मजपासून भरून घ्यावा** – माझे शब्द खरे झाले नाहींत, तर मग मला विचारा. **बापूचें निघणें न जाहल्यास**–बापू होळकरास तुम्ही दूर न केल्यास. **किलाफाची वृद्धि होत जाईल** – किलाफाची वृद्धि होत जाई, म्हणजे गेली असे पाहिजे. **गांठ** – संधि. **बाबासाहेब** – मल्हारराव होळकर. **प्रति** – या शब्दाचे प्रयोजन येथें काय तें कळत नाहीं. **उचलून घ्यावे** – पकडावें, हल्ला करून पकडावें. **नियत** –वर्तणूक.

(७७) **दरम्यानवाले** – मध्यस्थ. **किलाफाचे पर्वत टाकून** – मोठें वैर निर्माण करून. **जमियेतीचे धणी** – शिंद्याजवळ भरपूर जमियत म्ह. सैन्य होतें, परतु. **मुसळी** – मुसडी. **लेखपूस** – करारमदार.

त्याचे फौज त्याचे मुकाबल्यास आली. त्याचे मदतीस आठशें स्वार येथून बाबा-साहेबांनीं रवाना केले. जवळ अडीचशा तीनशांचा भरणा. ही खबर (ठेवून) रघुपत खंडेराव याणीं भाद्रपद वद्य ९ चे प्रातःकाळीं छाप्याची तयारी केली. हें वर्तमान बाबासाहेबांस समजतांच गोट आवळून अडीचशें स्वारानिशीं कंबरा बाधून हुशार जाले. बुणगे आवळून एकीकडे बाडाचे आश्रयानें उभे केले. मागील प्रहर रात्र राहाताच बाबासाहेबाचे वकील बजाबा कुटे नानाफडणीस याचे दरम्यानकीत होते. रघुपत खंडेराव याणीं कुटे याचे नावें चिठ्ठी लिहिली कीं, आजच बेत होता खरा, परतु राहिला. पुढें प्रसग पडेल तसें पाहून घेऊं. अहेव नवमीचा स्वयपाक करवून सुवासिनी सांगाव्या. खचीत बातमी आहे. ही चिठ्ठी बाबासाहेबापाशीं आली. ते वेळेस रात्र तीन घटका होती चिठ्ठी वाचून अतःकरणास विश्राती पडून, जिजीसाहेबास सागून पाठविलें कीं, सैपाक करावा. लोकासही सागितले कीं, कबरा सोडून झाडाझटका करावा आणि फिरून यावें. तेव्हा कोणी कंबरा सोडल्या, कोणी सोडिते, कोणी सोडून शौचास गेले, कोणी कंबरा न सोडिता हुक्का तमाखू करितात. इकडे शिंदे यास मोठीच मसलत पडून लष्कर आंवळून कांहीं फौज पलटणे बदोबस्तास ठेऊन जातीनें पर्वतीचे डोंगरावर जाऊन बसून पलटणाचा परीघ पहाडाभोंवता केला स्वार, सरजाम याचा ताता बाधून कुंभारवेशीचे नदीपर्यंत स्वाराचा थट उभा केला. पुढें मोहऱ्यावर मुजाफरखानाचें पथक घालून त्यांनीं बाबासाहेबाचे गोटाचे मुकाबल्यास येऊन एक ताशीरा दिला त्या काळीं बाबा-साहेबानीं आग टाकिलें होतें. तितक्यात लाख्या बारगीर येऊन, जागे करून,

(७७) बाड – खाशाच्या राहण्याच्या राहुट्याजवळ तबूच्या किंवा डेऱ्याच्या भोंवतीं अगण करून कपाउडासारखे कनातीचे पडदे लावतात, त्याना 'बाड' म्हणतात. **बुणगे आवळून** – तळावरील व्यापारांचीं दुकानें लुटलीं जाऊ नयेत म्हणून व्यव-स्थित एकत्र जमवून उभी करून. **दरम्यानकी** – मध्यस्थी. **बेत** – मल्हार-रावाच्या गोटावर शिंद्याचा हल्ला होण्याचा. **झाडाझटका** – शौचमुखमार्जन, वगैरे. **करितात** – करीत बसले **मसलत पडणें** – सधि, किंवा मोका सापडणें. **परीघ** – वेढा. **ताता** – शिस्त, मित. **थट** – जमाव. **मोहऱ्या-वर** – आघाडीस. **ताशीरा** – ताशेरा – फैर. बदुकीची, तोफांची फैर, शिलक. **आंग टाकिले होते** – विसावा घेत होते, आडवे झाले होते. **लाख्या बारगीर** – हा एक नामांकित एकांडा एक लाख तैनात कबूल करून मल्हाररावानें पदरीं बाळगला होता. लाख तैनात म्हणून त्यास लाख्या बारगीर असे नांव पडलें होतें. बखरींतून व पोवाड्यांतून त्याचा उल्लेख आहे, परतु समकालीन कागद पत्रांत

हुषार होऊन घोड्यावर बसा मी पुढें होतों ( असें बोलला ) त्याचेही अगोदर येशवंतराव होळकर घोड्यावर बसून एक बाण चालविला. तो बाण त्याचे स्वारांत न जातां आपले लष्करांत आला. इतक्यांत हवा समजून, काहडतें घेऊन शहरच्या मुमार धरला. माकड हाडावर भाल्याची जखम लागली. परंतु निघून शहरांत दाखल जहाले. त्याचा लाख्या बारगीर त्यांत गडप जाला. तो पुन्हा माघारीं आला नाहीं त्याचें शव अथवा घोड्याचें हाड दृष्टीस पडलें नाहीं. मग पार होऊन गेला कीं मारला गेला, कसे असेल तें असो, पुन्हा कोठें उमगला नाहीं. त्याचे मागून आनदराव बहाड यानीं घोडा घातला उलटणी एक करून दुसऱ्या उलटणीस छत्तीस जखमा खाऊन खेतात पडला. चवथ्यानें बाबासाहेब उठले पहिले उठावणीस कोणी त्याजवर हत्यार धरले नाहीं. दुसऱ्यानें घोडा घातला, तीन जखमा अनीनीच्या हातावर आल्या चवथ्याने घोडा घातला तेव्हा मुजाफरखा जातीनें सामोरा येऊन बोलला कीं, " अरे सरदार ! तेरे तरवारकी हाद हो चुकी. खूप तरवार कियी. आब तो मेरे पास आवो " त्यासी उत्तर केले कीं, " मी मल्हारराव होळ्कर धरलेला शिंद्याचे येथे जाऊ ? हें घडणार नाहीं. " असें बोलून त्याजवर तरवारीचा हात टाकिला. त्याचे आगांत दहाशेर रूईचें डगले. तरवार लागू जहाली नाहीं. इतक्यात एके स्वाराने भाल्याची जखम छातींत मारून पार केला. घोडियाखालीं आले. मग त्यानी गोटात जाऊन घोडीं व जामदारखाना लुटला. वरकड कशास हात लाविला नाहीं. मुजाफरखाकडील ऐशीं खासा कामास आला. ते निघोन आपले गोटात गेले. राहिले बारगीर वगैरे शिलेदार जिकडे ज्याला वाट फुटली तिकडे ते गेले. रविराव दोघे बधु रात्रौ येऊन उमेदवाराचे नातें बाबासाहेबांस भेटले ( होते. ) त्यानी दोन पट्या पानाऱ्या दिल्ह्या होत्या. तेही कामास आले.

---

(७७) तो सापडत नाहीं. **हवा** – दुर्लक्षण, अपशकून. **त्याचे** – शिंद्याचें. **इतक्यात** – या घटनेमुळें. **कहाडते घेणे** – आग काढून घेणे. **उलटणी** – पळत असता एकदम उलटून हल्ला करणे. **अनीनीचा हात** – लगाम धरणारा डावा हात. **धरलेला** – कैद झालेल्या स्थितींत. **आगात दहा शेर रुइचें डगले** – मुजफरखानानें दहा शेर वजनाच्या कापसाचें जाडजूड चिलखत बखतर अगात घातलें होतें. **भाल्याची जखम** – भाल्याची फेंक. **रविराव** – हा एका शिंदे घराण्याचा किताब होता. त्या घराण्यातील दोघे भाऊ आदलेच दिवशीं मल्हाररावाकडे येऊन नोकरीस राहिले होते. ते उमेदवाराच्या नात्यानें आले होते. म्हणजे कोणच्याहि बिकट प्रसगीं हार न खाता छातीनें लढू अशा प्रतिज्ञेनें नोकर झाले होते. व त्यानीं तसे पैजेचे विडेहि उचलले होते. **पट्टी** – विडा.

इकडे कामास येताच पांच कोस लोणी तेथें बायकांनीं खांद्याखालीं पदर टाकून बसल्या. सासू-सासऱ्यानें निषेध केले कीं, "तुम्हांस कशावरून समजलें ?" तों दोघांचीं माणसें आलीं. त्यांणीं वर्तमान सांगितलें. नंतर त्यांनीं सहगमन केलें. मग बापू होळकर व रघुपत खंडेराव व चिमणाजी बुळे जातीनें जाऊन बाबासाहेबांचें शव पालखींत घालून बाया जिजी आदि करून विठोजी (व) यशवंतरावाच्या बायकासुद्धां घेऊन आले. अग्निसंस्कार करून उत्तर कार्य जालें

(७८) पुढें शिंद्यांकडील पाच लक्षाचा तगादा लागला. धरणेपारण्याचा प्रारंभ झाला. तेव्हा रामपुऱ्याची मामलत रामचद्र शिवाजी याजकडे सागोन त्यांचे बधु कामावर पाठविले आणि अडीच लक्ष रुपये पटवून दिल्हे. तगादा काहीं शम जाला तेव्हा श्रीमंतानींही दिवाण देण्याबद्दल पधरा लक्षाची वरात शिंदे यासी होळकरावर दिल्ही. या साडेसत्राचे पेट्यात महेश्वर व स्वारी व दरखदार आदि-करून कशाचाही भ्रम न राहतां दारोदार पचाईत होऊन आब जाब काहीं एक राहिला नाहीं रोज रोजीना खुराक आणखी देणे घेणें मिळून एकूण चाळीस लक्षाचा भरणा जाला. शिंद्याचे हिशेबीं पाच चार लक्ष बाकी काढून तगादा चाल-लाच होता. तो कृष्णाजी बाणाजी हुजरे यांनीं बाळोबातात्या यांजला कैद केलें होते ते सुटून कारभारास लागले. तों शेख करीम फौजदार दौलतरावबावाचे कृपे-

---

(७७) **खाद्याखालीं पदर टाकून बसल्या** – वैधव्य आलें असें समजून त्यांनीं डोकीवरील पदर खांद्याखालीं काढून टाकला. **तों** – इतक्यांत. **सहगमन करणें** – सती जाणें

(७८) **धरणें पारणें** – आपला पैसा वसूल करण्याकरता देणेदाराच्या दारीं आपण स्वत. उपवास करीत बसावयाचे व घरात देणेदारासहि उपवास पाडावयाचे, अशा रीतीने त्याला हैराण करून वठणीवर आणण्याची जी सर्रास रूढ अशी पद्धति जुन्या काळीं होती, तिला धरणे पारणें म्हणत. **धरणें** – धरणें धरून बसणें. **पारणें** – उपवास पाडणें. **शम होणें** – शमन पावणे. **साडे सत्राचे पेट्यात** – साडे सत्रा लक्ष रकमेच्या पोटात. **पेट्यांत** – पोटांत. **भ्रम राहणें** – अब्रू राहणें. भावार्थ असा कीं, साडे सतरा लक्ष रुपयांचा भरणा करतां करता नाकीं नव आले. महेश्वरास बरीच रक्कम मिळेलसे वाटलें होतें, पण भरती झाली नाहीं. दरक-दार होते त्यांजकडूनहि कांहीं उकळता आलें नाहीं. स्वत: खाशाच्या स्वारीचा खजिना तपासून पाहिला तोहि मोकळा. मिळून काय ! सगळा भ्रम फिटला. दारो-दार तोंड वेंगाडण्याची पंचाईत म्हणजे पाळी आली, व आबजाब (आबदाब) म्हणजे काहीं एक अब्रू शिल्लक राहिली नाहीं.

तील, पाचशें स्वारांचा बेहडा करून दिल्हा होता, त्यानें तगाद्याची पराकाष्ठा केली. हें वर्तमान बाळोबातात्या आल्यावर इकडून व परभारें त्याचे लष्करांत तगाद्याचें वर्तमान समजल्यावर बाळोबातात्यांनीं दौलतराव शिंदे यास बुद्धिवाद फार केला कीं, "होळकर कोण? आपण कोण? अडचणींचे प्रसंग. त्याजकडून आपला उपयोग कोणेसमयीं कसा जाला? व गोपाळराव चिटणीस याणीं आगळीक करून शिंदे, होळकर याची दुजागी राजेरजवाड्यात दाखवून होळकरांची कमती पाडली. यात नकसान किती जालें? या रागानें पाटिलबावाचे अवसानच जाले. तुकोजीबावा (स) व अहल्याबाईस तोंड दाखविलें नाहीं. त्या गोष्टीचें पहाणें, राखणें, जोखणे, त्याचे त्याचे बराबर जाऊन, आपण पुढें गौण राजकारणात सामल होऊन होळकराची दौलत शिंद्यानीं बरबाद केली हे ठिकरें आपल्या माथ्यावर घेऊन, पुढे होळकर बुडाल्यावर आपणही राहू असे होणार नाहीं. व वक्त पडल्यावर परस्परे लौकिक दिसण्यात उपयोग? आदौ घटत असावे. याचें निदर्शन होळकराकडून पैदरपै घडत आले. त्याजवर समय प्राप्त जाल्यावर आपल्याकडून हा लौकिक जाला. अशीच धोरणे राखण्याची मर्जी असल्यास आम्हास घोरात घालू नये. ज्या ठिकाणीं होतो तेथें आपलें शुभचिंतन करून होतो. अशीच उमेद राहिल्यास आम्हासारखे गरीबगुरीब जवळ असल्यास उपयोग नाहीं." अशा भावीं बोलण्याचें प्रसग तीन दिवस पडून दौलतराव शिंदे यास कायल करून, पुढे आला तो वसूल, राहिलें तें कृष्णार्पण असे करून, शेवटीं फौजदार मजकूर यानें शिंदे, होळकर याचे घरोब्याचा शिरोभाग केला, त्यास तोफेचे तोटीं उडवून द्यावे, व होळकराचे घरीं

(७८) बेहडा – तैनात बेहडा. शेख करीम याला पाचशें स्वार चाकरीस ठेवून चाकरी करावी असा दौलतराव शिंद्यानीं तैनाती बेहडा करून दिला होता. बेहडा – Budget, A statement of ways and means बुद्धिवाद – उपदेश. आपला उपयोग कोणे समयीं कसा जाला – आपल्या उपयोगी कसे पडले. दुजागी – द्वैत, फूट, वैर. अवसान – मृत्यु. त्या गोष्टीचे पहाणे, राखणे, जोखणें, त्याचे त्याचे बराबर जाऊन – त्या बाबतींतली विचारी व धोरणी अशी पाटिलबावांची वागणूक किंवा त्याचे धोरण त्याच्या मृत्यूबरोबरच सपले. गौण – क्षुद्र. ठिकरे – खापर, दोष. आदौ घटत – ? पै दर पै – वारवार. समय – सकट. लौकिक – दुर्लौकिक, दुर्लौकिकाची गोष्ट. आम्हास घोरांत घालूं नये – आम्हास कारभाऱ्याचें काम करण्यास लाऊ नये. उमेद – भलत्याच गोष्टी करण्याची हौस, ईर्षा. शिरोभाग – शिरोभग असें पाहिजे. शिरोभंग – नाश. होळकराचे घरीं चालून – होळकराचे घरीं चालून जाऊन.

चालून पूर्वे क्रमास शिकल राहील असें होत असल्यास, आम्हांसारख्यास हांक मारल्यास हजर आहोंत. मग शिंदे यांनीं कायल होऊन कबूल केलें. दुसरें दिवशीं फौजदार याचा गोट दामदस्त लुटला. मशारनिले हस्तगत करून तोफेचे तोंडीं दिल्हे. तिसरें दिवशीं दौलतराव यांसी घेऊन होळकराचे येथें आले. शिष्टाचार समाधानें भविष्यानुरूप होणार ज्या गोष्टी तुमचे आमचे स्वप्नींही नसाव्या त्या गोष्टी प्रत्यक्ष दिसण्यांत आल्या. आपले वडील घर, ते पक्षीं मनांतील कलुष टाकून परस्परें वडिलोपार्जित आचार याचेच परिशीलन मनात परस्परें वागून एकविचारें श्रीमंताचे सेवन समर्पक सेवा घडेल तें होत असावें यात फार चांगलें आहे. हरदु दौलतीचे पुण्य पुरुषार्थ वोहोदे परत्रींचा विचार आहे असें कल्याण-दायक गोष्टी बोलून साकर वाटून गेले दो चौ रोजानी होळकर शिंद्याचे येथें गेले तेथे पानसुपारी अत्तर-गुलाब होऊन, डेऱ्यात आले.

( ७९ पुढें दोन्ही दौलतींतही वागलेत अशा इरादाने बाळोबातात्यांनीं यशवंतराव शिवाजी पुढें करून होळकराची दिवाणगिरी करावी, अशा पैरवीचीं बोलणीं चालू होऊन पांच पन्नास हजार रुपये आतून बाहेरून खर्चास दिल्हे. बोलल्या क्रमाचा नमूद निदर्शनास यावा तों शिंदे याचे बाजारात सरजेराईचा प्रसर होऊन दौलतरायास घुटीचा प्रारंभ करून त्या झपाट्यात दौलत प्रकरणीं अनेक तऱ्हेचे भर सरजेरायानीं भरून एकूण ( वीस ) आसामी कैद केली त्यात बाळोबातात्या व धोंडोबा व नारायणराव बक्षी व रामचद्र शिवाजी व रायाजी पाटील वाबळे असे नावाचीं कामाचीं माणसें एकूणीस असामी कैद केलीं. श्रीमत बाजीरायास सामल करून तेथील कारभारी नारोपत चक्रदेव वगैरे कैद करून दोन पलटणें शनवारचे वाड्याभोंवतीं चवकशीस ठेविलीं पुण्यामधी उल्कापात केला सरजेरायानें होळकराशीं आगळीक केली नाहीं. स्नेहच राखिला. शिंद्याचें दौलतींतील माणसें

---

(७८) शिकल – उजळा, पाणी, चकाकी. पूर्वक्रमास शिकल राहील असे होत असल्यास – पूर्वीच्याच धोरणास उजळा मिळणार असेल तर. कायल – निरुत्तर कलुष – किल्मिष, वाकडें, संशय. हरदु – दोन्ही, दोहीकडील. वो हो दे – ?

(७९) सरजेराईचा – सरजेराव घाटग्याचा – प्रसर – प्रबळता, वरचष्मा. दौलतरायास घुटीचा प्रारंभ करून – दौलतरावास दारूचें व्यसन लाऊन. भर भरणे – सल्ला देणें. उल्कापात – उत्पात. सर्जेराव घाटगे हा इतका घोरकर्मा होता व पुण्याच्या लोकाचे त्यानें इतके हाल हाल केले कीं, तेव्हापासून ‘ सर्जेरावी जुलूम ’ असा वाक्प्रचारच मराठींत रूढ झालेला आहे.

कैद केलीं होतीं ती सरदाराचे परतंत्रतेंत परवानगी घेऊन एकसमयावच्छेदें एकोणीस असामी मारून टाकिले. दौलत माणसांवांचून खालीं केली.

( ८० ) इकडे काशीराव होळकर याचा गुजारा मोत्याजी काळगावडे व्याही खानदेश प्रातीं बड करून पांच पंचवीस हजार फौज घेऊन फिरत होते त्यांजवर चालत होता इकडे यशवंतराव होळकर निघोन पुण्यांत गेले. ते बापू विठ्ठल परभू पूर्वीं आपले होळकरांचे दौलतींत शिलेदारीनें होते, चौभास माणूस, लिहिणार बोलणार, शिपाई इराद्याच्या माणूस, त्याच्या घरीं जाऊन त्याजला घेऊन जेजुरीस आले. मार्तंडाची महापूजा करून नागपूरचा रस्ता धरिला. नागपुरास जाऊन रघोजी भोंसले याची भेट घेतली. त्यानीं मोठयाचा मूल वक्तशीर आपल्यापाशीं चालून आला, ते पक्षीं सर्वोपरी बरदास्त करून आपल्यापाशीं ठेविलें हें वर्तमान पुणें मुक्कामीं ( काशीराव ) होळकर यास समजताच श्रीमंत व शिंदे याचे कानावर घालून भोसल्यास पत्रे घेतलीं कीं, यशवतराव होळकर तुम्हापाशीं पळून आला आहे त्याजला कैद करून पुण्यास पोहोंचाऊन द्यावें अशीं पत्रे श्रीमंत, शिंदे, होळकर याचीं गेलीं इकडे मल्हारजी होळकर याचे कुटुब जिजीबाई वगैरे होतें. त्यास स्वतंत्र डेरा देऊन चौकी पहारा काशीराव होळकर यांचा जाबता होता तेव्हा मल्हार शामजी दिम्मत होळकर नि॥ कापडणीस तुकोजीबावा सुभेदाराचे लोभातील असामी, नाना फडणीस मेणोलीस निघून गेले होते, तेथून फौज ठेवण्याविशीं, पैका द्यावयाविषयींचा करार ठरला त्याचे जाबसालांत व ऐवज आणण्या–नेण्यात मल्हार शामजी होते, त्या आरोपावर कैलासवासी सुभेदार वर्तमान असता दिवाण यानें मुतालिक बाळाजी लक्ष्मण व श्रीपतराव मैराळ यानीं कैद करून वाफगावचे किल्ल्यात ठेविलें होतें तेथून पळून नाना फडणीसाचा

---

(७९) **सरदाराचे परतंत्रतेत** – शिंद्याच्या बेहोष स्थितींत. **दौलत माणसावाचून खालीं केली** – माणूस–नामांकित माणूस, मुत्सद्दी माणूस. शिंद्याच्या दौलतींत एकहि नामांकित मुत्सद्दी, विचारी माणूस शिल्लक राहिला नाहीं.

( ८० ) **चौभास** – चार भाषा बोलणारा. त्यावरून भावार्थ हुशार, हरहुन्नरी. **शिपाई इराद्याचा माणूस** – शिपाई बाण्याचा माणूस, लढवय्या. **वक्तशीर** – वक्त पडल्यामुळें म्हणजे संकटामुळें. **जाबता** – पहारा. **दिम्मत** – पदरचा. **निसबत** – कडील. जसे निसबत–कापडणीस म्हणजे कापडणीसाकडील. **कापडणीस** – कापड पुरविणारा किंवा कपड्याचा कारखाना ज्याच्या ताब्यांत असतो तो कापडणीस. **बटकी** – दासी. **श्रीपतराव मैराळ यांनीं** – येथें 'यानी' या शब्दाऐवजीं 'याना' असें मुळात असावेसें वाटतें.

आश्रय करून पुण्यास होते. त्यांनीं जिजीबाईशीं सधान लावून तुम्हीं ठिकाणांहून निघून मुळामुठा नदी उतरून यावें म्हणजे तुम्हास घेऊन जाऊ. त्या सधानावर एके दिवशीं त्याचा जाबता नदीपार ठेवून इकडे बाईस सूचना जाली बाई शौचाच्या मिसें करून शेतखान्यात जाऊन, बटकीचा लहगा नेसून, आपलें लुगडें बटकीस नेसवून डेऱ्यात वाटे लाविली. ताब्या घेऊन कुणबिणीच्या रूपाने नदी उतरून पार गेली. तेथे जाबत्याची गाठ पडली. पुण्यात दाखल जाली मल्हार शामजी यांनीं खर्चाचा वगैरे बदोबस्त ठेवून तीन महिन्याची गरोदर होती, सहा महिन्यानतर पुत्र झाला. त्याचें नाव खडेराव ठेविले

( ८१ ) हिकडे भोंसले याचे मनांत होळकराचें मूल आपले येथे आलें तेव्हा काहीं यास जाहागीर देऊन जाहागीरदार करून ठेवावा ऐसा इरादा. तो श्रीमताचीं, शिंदे, होळकराचीं कैद करण्याविषयींची पत्रें गेली होतीं त्याजवर मनात विचार केला होता तो रहित करून यशवतराव यास कैद केले पलटणात होते. पाच चार महिने कैद भोगिली पुढें भोसल्याचा विचार पुण्यास पोहोचते करावे असा विचार होऊ लागला. हें वर्तमान यशवतरायास समजल्यावर बापू विठ्ठल याशी विचार केला कीं, पुढें काय करावे, तेव्हा बापूने सागितले की, “ आपण शौचास जावें. तेथें माणसाचा चोळणा, पागोटे घालून बाहेर पडावें. आपले बिछान्यावर मी निजतों. गोष्ट फुटल्यावर माझें काय होणें ते होवो. आपण निघून जावें ” असा विचार करून निघून गेले इकडे बोभाट जाहाल्यावर बापू विठ्ठल यास धरून नेऊन पुरशीस भोसले यानी केली. याने साफ उत्तर केले की, “ आम्हीं वक्ताचोर फीक सरदारास काढून देऊन हजर आहोत. यात सेवाधर्मास विरुद्ध केले नाहीं. आपणही सरदार आहात. पाहिजे तें करा. ” भोसले उत्तरावर प्रसन्न होऊन गुण घेतला. परतु इकडे पुण्यास वाईट वाटेल याजकारिता त्याचे पायात बिड्या घालून चार महिने कैदेंत ठेऊन पुण्यास यशवंतराव निघून गेल्याचे वर्तमान लिहिलें. तिकडून काहीं यशवंतराव गेल्यासंबधीं अधिकउणें दिसण्यात आले नाहीं. सबब बापू विठ्ठल यांस सोडून दिल्हे.

---

(८०) **त्याचा जाबता** – बाळाजी लक्ष्मण व श्रीपतराव मैराळ याचे लोक.

( ८१ ) **माणूस** – हुजऱ्या, चाकर माणूस, खिजमतगार. **पुरशीस** – चौकशी. **आम्ही वक्ताचोर फीक** – ‘आम्ही वक्ताचे रफीक’ असे वाचन पाहिजे. **रफीक** – स्नेहीसोबती. **वक्त** – सकट प्रसंग. भावार्थ आम्ही याचे निदानचे सावती आहों. मरेपर्यंत त्यास सोडणार नाहीं. **सरदारास** – यशवतरावास. **सरदार** – मोठे लोक.

( ८२ ) यशवंतराव होळकर पायात जोडा नाहीं, अनवाणी पादचारी निघाले, तों नागपुरापासून दोन मजला आले. एक जोरीचें शेत होतें. त्या शेताचे छायेस दहापांच ताडांचें आड जाऊन बसले होते. तों वाटेनें लोक भवानी शंकर कायथ घोडयावर बसून चालले होते स्वार पाहून यांजला आशका उत्पन्न जाहाली. हा स्वार धरण्यातील आहे किंवा पाथस्थ आहे ? असा सदेशा उत्पन्न होऊन जोरींत शिरले. तों पुढें नाला होता तेथें लाला स्नानास उतरला हे पाहून, ( हा ) पांथस्थ असा निश्चय करून, बाहेर निघून त्याजपासून पाच पचवीस हातावर आपणही स्नानाचा उद्योग केला त्याचे लक्षाचे सधान पाहिले. तो वाटसरू, त्याचें लक्ष याजवर कशाकरिता असावें ? असें पक्के ध्यानास आणून त्यास जाऊन रामराम केला. पुसलें 'तुम्हास कोठे जावयाचें आहे ?' त्यानें उत्तर केलें कीं, "आम्हीं उमेदवार नागपुरास आलो होतो येथे काहीं रोजगाराची सोय बनली नाहीं, सबब हिंदुस्थानात जातो" "आम्हास तिकडेच यावयाचें आहे सांभाळून न्याल तर सोबतीनें चालू" त्यांनीं म्हटले की, "उत्तम आहे" हे बोलले की, "आम्ही लुटले गेलों, घोडे कंठाळ अगदीं गेले, आम्हापाशीं खर्चास राहिलें नाही. कांहीं खर्चाची मदत कराल तर माळव्यात गेल्यावर इदूर, उज्जन येथे आमचें आप्तविषयीं आहेत तेथे तुमचे रुपये देऊ" त्याने कबूल केल्यावर त्याचे सोबतीनें चालले. दिवसेदिवस बोलण्याबसण्यात वाट चालण्यात भरोंसासा दिसून आल्यावर त्याजपाशीं वर्तमान सागितले त्यास अनुकूल करून चार कोस यानीं घोड्यावर बसावें, चार कोस त्याने बसावे. (पुढे तो) सेवाचाकरी करू लागला खानदेश प्रांतीं आल्यावर जुझार नाईक भील याचे हाटीवर आले. त्यास भेटून खासगत वर्तमान सांगितलें. त्यानें सर्वोपरी आगेजनी करून आपल्यापाशीं ठेविलें. तेथे शिबदीची कलमज्यारी करून पांच चारशें माणसे ठेवून सुलतानपूर, नदुरबार येथें लुटण्यास प्रारंभ केला. हें वर्तमान सेदव्यास भिकाजी होळकर यास समजल्यावर आनदराव होळकर यांस

---

(८२) जोरी – ज्वारी. कायथ – कायस्त. धरण्यातील – आपणास धरण्यासाठी पाठविलेल्यापैकी. संदेशा – अन्देशा, सशय. त्याचे लक्षाचें संधान पाहिले – त्याचें लक्ष कोणाकडे कशात आहे, त्याचा अदमास पाहिला. कंठाळ, कंठाळी – जनावराच्या पाठीवर दोहो अगास सारखी बसेल अशी पडशी, गोणी, बारदान. वाट चालण्यांत – प्रवासात. भरोंसासा – भरोंसा असा, विश्वास. हाटी – डोंगरातील भिल्लांची वस्ती. आंगे–जनी – अगिकार सर्वोपरी – पूर्णपणें, निखालसपणें. शिबंदीची कलमज्यारी करून – सैन्य ( ठेवण्यास ) जमवण्यास सुरुवात करून.

समागमें तीनशें स्वार व पांचशें पायदळ देऊन यशवंतराव होळकर यांस धरून आणावें या इराद्यावर रवाना केलें. त्याची याची एक दोन वेळां झुरमट होऊन, येथें आपले पाय टिकत नाहींत असें समजून, तेथून जुझार नाइकास न समजतां रातवा घेऊन शेंपन्नास माणसानिशीं निघून बडवाणीचे आसपास गोवर्धन नाइकाची हट्टी होती तेथें जाऊन विसावा घेतला. तेव्हां गोवर्धन नाइकाचे पोटांत पाप उत्पन्न झालें कीं, याजला हस्तगत करून सेदव्यास पावते करून आपण सरफरास व्हावें. यांतील गुणगुण समजताच आपलें माणसानिशीं शाबुतीनें निघून बडवाणीपाशीं नर्मदा उतरून धर्मपुरीस बेटात आले. काहीं दिवस तेथें राहिलें. बेटातून निघून आठा-चौदिसां महेश्वरास येऊन शहरात फिरून जावे असें केलें. त्यांत एके दिवशीं महेश्वरी किल्ल्यात येऊन फडनिसाच्या वाडयात जाऊन दाणे मागितले तों माणसानीं झिडकाऊन दिल्हें मग तेथें तात्या आळेकर यांनें आपले येथें घोडयाचे दाण्यातून ओंजळभर हरभरे घेऊन यशवतराव महाराजास घातले. ते दाणे घेऊन निघून गेले.

(८३) सेदव्याहून भिकाजी होळकर यानीं भारमल दादास लिहिलें कीं, यशवंतराव होळकर नागपुराहून पळून, खानदेशात सुलतानपूर, नदुरबार परगण्यात येऊन जुझार नाईक भिल्ल याचे आश्रयाने राहून पाच चारशें माणसाचीं जमियत करून परगण्यात लूटलुबाडी केली आम्हास समजल्यावर आनदराव होळकरास पाठवून तेथून हुसकावून दिल्हे तेथून नर्मदा उतरून पार गेलें. इतकें वर्तमान आम्हास ठाऊक आहे. तेथेहि जमियत करून तुम्हास उपद्रव देतील. यास्तव त्याची आगाऊ चौकशी ठेऊन हस्तगत करावें. त्याजवरून भारमल होळकर यानीं चौकशी केली. तर धर्मपुरीचे बेटात ठिकाण लागला. तेथें काहीं उपव्दाप करावा तों यशवंतराव होळकर यास समजून तेथून निघून धारेस येऊन आनंदराव पवार याजपाशीं चाकर राहिले. तीनशे माणसाचा तैनात जाबता केला. बाळाजी कमळाकर हळशी किनास (?) आहेत. हे धर्मपुरीचे बेटात सोबती जाहले. धारेस हजीरी देऊन काहीं दिवस राहिले. तेथें आनदरात्र पवार व रंगराव वोढेकर दिवाण. दिवाण सरदाराची लढाई झाली. त्यात पत्राराची जामियत स्वार पायदळ हजार बाराशें. एक तोफ रंगराव वोढेकर याचे बरोबर. तीन हजार स्वार पेंढारी-

---

(८२) **झुरमट** – झटापट, लढाई. **रातवा घेणे** – रात्रभर चालून मजल मारणें. **सरफरास होणें** – सन्मान पावणें.

(८३) **लूट लुबाडी** – लुटालूट. **उपव्दाप** – उपद्व्याप, उद्योग, यशवंतराव होळकरास पकडण्याचा. **हळशी किनास** – ?

यांचा त्याचा मुकाबला होऊन धारकरांच्या जमियतीचे पाय उठले. मग यशवंत-राव होळकर यांनीं, खंडेराव होळकर याचे नावाचे शिक्के खोदले ते अक्षयीं कमरेस राहात होते मनात विचार केला कीं, या शिक्कयात कांहीं सामर्थ्य आहे नाहीं पहावें. म्हणून याचे खासगत जमियतीपैकीं पाच पन्नास माणूस याचे भिडेवर होते त्यास हामराहा करून तोफेंत आपले हातें बार भरून पाच गोळे मारले. ईश्वर इच्छें करून, पेंढारी स्वार मरतो कशास ? गोळ्याचा भरावा येताच स्वार पेंढारी

(८३) **धारकराच्या जमियतीचे पाय उठले** – धारकराच्या सैन्याचा टिकाव लागेना, ते पळू लागले. **हामराहा करून** – त्यास साक्षीस ठेवून **पेंढारी स्वार मरतो कशास ?** – पेंढाऱ्याचें लक्ष मुख्यत्वें लुटीवर, त्याची आशा नसेल तर पेंढारी जीव धोक्यात कधींच घालीत नसत. म्हणूनच शिपाई, शिलेदार, बारगीर निराळा आणि पेंढारी निराळा. " मराठ्यांच्या लष्करातील प्रचंड घोडदळाबरोबर त्यांच्या सैन्यात पेंढारी घोडेस्वाराची पथकेंहि फारच असतात. या पेंढाऱ्या पथकाना पगार वगैरे कांहीं एक नसतो पेंढाऱ्याचे नायक मुख्य सरदाराकडून लूट करण्याचा लेखी परवाना मिळवतात म्हणजे झालें. हे पेंढारी जाळपोळीची व लुटीची इतकी कमाल करतात कीं विचारावयाची सोय नाहीं. पगार देऊन ठेवलेले लष्करसुद्धा शत्रूच्या मुलुखाचा माणसा–काणसाचा नाश करीत नसेल इतका हे करतात. पेंढारी शिपायाचा सारा डोळा लुटीवर असल्यामुळें त्याचा प्रत्यक्ष लढायाच्या कामास कांहींच उपयोग नसतो. लुटीचा लग्गा मिळण्याची आशा नसेल तर हे पेंढार आपला जीव धोक्यात घालण्याची आशा नको पेंढाऱ्याच्या सैन्याची छावणी ज्या लष्कराचे ते असतील त्या लष्कराच्या शेजारींच पण स्वतंत्र असते. म्हणजे होळकरांचें पेंढार असलें तर त्याचा तळ होळकराच्या तळानजीक कोठेंतरी असावयाचा. माझ्या पहाण्यांत आले ते बहुतेक पेंढारी सारे मुसलमानच दिसले. तथापि मुसलमानाचा धार्मिक कडवेपणा किंवा कडक आचारपालन दिसलें नाहीं. मला मुख्यत्वें-करून या पेंढाऱ्यात मुसलमानाचाच भरणा दिसला, तरी इतरहि जातींचे लोक पेंढाऱ्यात असातात. या पेंढाऱ्याची वस्ती मुख्यतः माळव्यांत आहे व शिंदे–होळकराच्या लष्करातच यांचा भरणा फार. हे पेंढारी लोक सामान्यत. भिकार भणगच असतात. एखाद्याला दैवयोगानें बरीच लूट मिळाली, तर ती पुंजी संपेपर्यंत तो पेंढारी लष्करात दिसावयाचा नाहीं. या पेंढाऱ्याचीं घोडीं– घोडीं कसलीं तट्टें–फारच काटक असतात व त्याना साज–सामानहि फारसें कांहींच नसतें. या दृष्टीनें लष्करांतील लढवाई घोडदळाच्या मुकाबल्यास तीं टिकण्यासारखीं नसतातच. कसेंहि असो, या पेंढाऱ्यांच्या उपद्रवाचा सर्व प्रांतांना मोठा धाक आहे. किंबहुना यांच्या भीती-

पळाले. रंगराव जातीनें मर्द पांच पन्नास स्वार पागेचा होता तो घेऊन एक दोन परतण्या केल्या. परतु तोफेपुढें जुमस न खातां पाहून निघोन उज्जनीस गेले. नंतर यशवतराव होळकर तोफ घेऊन धारेस आले. आनदराव पवार यांची भेट घेऊन वोंळबा दिल्हा कीं, अशा जमातीच्या भरवशावर लढाई घेत असता कीं काय ?

( ८४ ) अशा भावीं बोलून बिऱ्हाडास आले. तोच शामराव माहडीक पिंपळोद्यास होते ते नागो जिवाजी याजकडील कारकून दुंदरनेक याजपाशी इदुरी होते. त्याजपाशीं येऊन काहीं पोटापाण्याची सोय पहावी या उद्देशे आले होते बहुत हालाकीत तेथे सोय बनून आली नाहीं आणि यशवतराव होळकर धारेस आहे हें वर्तमान समजलें तेव्हा इंदुरीहून निघून धारेस गेले यशवतराव होळकर याची भेट घेतली. बहुत निषेध केला की, " तू तुकोजी होळकराचा लेंक, आणि पवाराचे घरीं पायदळींत चाकरी करितोस, लाज कशी वाटत नाही ? 'साहा देशी परदेशी चोरी.' असें राहणे तुजला योग्य नाहीं हाजारों हाजारो कोणी वाचत नाहींच. शभराचे आत कारभार यांत एकदा मरणे खरें ते पक्षी अचाट बुद्धि खेळवून बळेंच लक्ष्मीस हात घालावा. त्यात ईश्वर साह्य होऊन साध्य झाल्यास नीटच आहे. " अशा भावी धैर्य देऊन उमेद वाढविली. मग यानीही शिक्याचें वर्तमान सागितलें.

( ८५ ) त्याजवर आशादुराशा उत्पन्न होऊन काहीं उद्योग करावा असा निश्चय

---

(८३) मुलेंच लहान सहान खेड्यानीसुद्धां गांवकुसे घातलेली असतात व गावकुसवाआंत मध्यास गढी किंवा बालेकिल्ला बाधलेला असतो. (१७९५ सालीं मॅलेटनें खडर्यांच्या तळावरून लिहिलेल्या पत्रातील उतारा ) **भरावा** – मार, सोसाटा. **परतणी** – उलटणी, उलटून केलेला हल्ला. **परंतु तोफेपुढे जुमस न खातां पाहून निघोन उज्जनीस गेले** – हें वाक्य उघडच गलथानपणाचें आहे वास्तविक " परंतु तोफेपुढें जुमस खाऊन निघोन उज्जनीस गेले " असें वाक्य मुळांत असेल, किंवा " परतु तोफेपुढें आपले स्वार जुमस खातांना पाहून निघोन उज्जनीस गेले. " असें तरी असावें. **जुमस खाणे** – दहशत खाणें, घाबरणें. **वोंळबा देणे** – दोष देणें, ठपका ठेवणें, उणें काढणें, टोमणा देणें.

(८४) **दुंदरनेक** – Dudrenec दुद्रनेक या युरोपियन विशष नामाचा मराठी अपभ्रंश. हा फ्रेंच सरदार होळकराच्या पदरी होता. **पायदळींत** – पायदळ शिपायांत. **'साहा देशीं परदेशीं चोरी'** – ! **हाजारो हाजारों** – हजारों वर्षें, किंवा हजार हजार वर्षें.

(८५) **आशा दुराशा** – लोभ, महत्त्वाकांक्षा.

ठरवून पवाराचे घरीं धरणें देऊन तीन हजार रुपये बाकी निघाली ती घेऊन, चारपांचशें माणसाची जमियत होतीच, शेंदोनशें स्वार त्या जिल्ह्यांतील नौकर ठेऊन लाला भवान शकर व शामराव माहडीक व बाळाजी कमळाकर असे जमेतीसह निघून देपाळपुरावर येऊन पडले. तेथें शेंदोनशें घोडे पागेचे व रोकडहि ईश्वर इच्छेकरून पाचपन्नास हजार हातीं लागली. तेथून कलमजारी चालली जमियत करून जावरा बरडावद या मैदानात गेले. तेथें जावऱ्यास गगाराम कोठारी मामलतदार होता त्याशी लढाई होऊन तेथेंही पाय ठरला नाही त्यानेंहीं आपलें महालातून काढून दिले यानी बरडावदचे आलीकडे फरणाजीस येऊन, बोहरा बेपारी पन्नास हजाराची बनात घेऊन जात होता त्याजला लुटून, पन्नास हजाराचा ऐवज हातीं लागला वजीर हुसेन येऊन तेही सामल झाले त्याजला थुराळास पाठवून स्वार सरंजाम आणविला त्याने जाऊन मीरखान याजला घेऊन ( तो ) आला प्रथम हजीरी एकशें अठरा स्वाराची झाली तेव्हांपासून कलमजारीची शहारत पडून स्वाराऱ्या चुगी येऊ लागल्या मग लिहिण्याचे कामावर विनायकराव सदाशिव उज्जनीस होते त्याजला समजल्यावर येऊन सामल झाले. भेट घेऊन मी फडणीलाकडील कारकून आहे. शामराव माहडीक याचीहि सोनओळख होती त्याने रुकार दिल्हा मग दप्तराचे काम त्याचे हवालीं केले. फीर फीर महतपुरावर आले त्यानींही ठिकाण लागू दिला नाहीं लढाईस उभे राहिले यशवतराव होळकर याजपाशीं काहीं बैरागी होते त्यानीं तलबे विषयी धरणें दिलें. हें वर्तमान महतपुरी वाघास समजून त्यानें बहिरागयाशीं पैगम लाविला कीं, "तुम्ही धरणें निकटीचे देऊन यशवतराव होळकर आमचे हाती द्यावा" हे वर्तमान यशवंतराव

(८५) **देपाळपुरावर येऊन पडले** – देपाळपुरावर हल्ला केला. **कलमजारी** – सैन्याची जमवाजमव, सैन्यभरती **जमियत** – जमाव. **बोहरा** – बोहरी. **बनात** – कापड **शहारत** – शाहरत आवाई, बोलवा, जाहिरात. **चुंगी** – टोळी. **लिहिण्याचे कामावर** – कारकून शिलेदाराच्या कामावर. शिलेदाराच्या पगाराचा हिशेब ठेवणारा कारकून तो कारकून शिलेदार. **सोन ओळख** – तोंड ओळख. दसऱ्याच्या दिवशीं सोनें देण्यास ओळख पुरते तितपत. **रुकार दिल्हा** – आपली विनायकरावाची ओळख आहे असें सागितले **फीर फीर** – फिरत फिरत. **त्यानींही ठिकाण लागू दिला नाहीं** – महतपूरकर दबले नाहींत, शरण जाऊन ठाणें हवाली करीनात. **तलब** – पगारापैकी मिळावयाची राहिलेली बाकी. **पैगम** – सूत्र, बोलणें. **निकटीचे धरणे देणे** – पक्के धरणें देणें, व देणेकऱ्यास जागचे जागीं हलूनहि न देणें.

होळकर यास समजताच बैरागी धरणें न बसता त्याजला बोलावून हिशेब करून पैका रोख पदरीं घालून काहाडून दिल्हें. यावर महतपुरकराशीं कांहीं द्यावें घ्यावें असें बोलणें होतें त्यास तऱ्हे देऊन अर्धरात्रीं कूच करून चालले. हें वर्तमान वाघास समजल्यावर पाचशें स्वार पाठवून घेराघेरी करून यशवंतराव यास सांपडविलें. धरून घ्यावे, ( यांत ) तथा राहिली नाहीं. परतु पुण्याची ती दशा. कोण्या कलास उंट बसतो. तेव्हा तऱ्हे देऊन निघोन गेले. यशवतराव महाराज हंडे हार्याचे सुमारें आले.

( ८६ ) यशवंतराव जमल्याचें वर्तमान पुण्यास कळल्यावर तेथून बापू होळकर यास रवाना करावें हा मनोदय बाळासाहेब याचा परतु मुत्सदी याचे मनात बापू होळकर गेले असता कार्यास खोट नाहीं परतु बापूस कोणे आकळावें ? तेव्हा नागो जिवाजीची सिद्धता करून शिलेदार, बाराशें स्वार पागा व फुलणसाहेब निसबत दुदरनेक याचे पलटण पुणें मुक्कामीं होते ते दिल्हें. चांदवडा आलीकडे धोंडोपंत गोडबोले श्रीमताकडून होते त्याशी कईकबाडावरून कटकट झाली. ते चढून आले. यानी मुकाबला केला स्वार सरंजाम होता परतु फुलणसाहेबानें अग्रसर होऊन स्वार सरंजामाचा जाबता ठेऊन पाचा गोळ्यात लढाई खतम केली. मग तेथून दरकूच नागो जिवाजी महेश्वरीं नर्मदा उतरून इदुरास दाखल झाले.

---

**(८५) बैरागी धरणे न बसता** – बैराग्यांनी धरणें धरून बसावयाच्या आधींच **महतपूरकराशी काहीं द्यावे घ्यावे इत्यादि** – महतपूरकरालाहि तुम्हीं काहीं पैका दिला पाहिजे असें बैरागी शिपाई अडवू लागले होते. **तऱ्हा देणे** – थाप मारणें, सबब सागणें, भूल करणें. **सापडविले** – पकडले **तथा** – बाकी, शिल्लक. **परंतु पुण्याची ती दशा. कोण्या कलास उंट बसतो** – परतु पुण्य किंवा दैव तारणार असल्यावर ते कोण्या प्रकारे तारील ते कसें सागणार ! उट जसा कोणत्या कलावर बसेल हे सागता येत नाहीं. तसाच दैवाचा प्रकार असतो. ते तारणार असलें म्हणजे कसेंहि तारतें.

**(८६) यशवतराव जमल्याचे** – यशवतरावाजवळ सैन्य जमल्याचें **कार्यास खोट नाहीं** – कार्य बिघडणार नाहीं. **आकळणे** – मन वळवणें **कई कबाड–कई** – धान्य. **कबाड** – लाकूड-फाटा. सैन्याला लागणारें धान्य व लाकूडफांटा. सैन्याबरोबर एक टोळी असते ती असपासच्या प्रदेशांतील धान्य लुटून व घरें मोडून लाकूडफांटा आणते. तीस 'कई' अशी संज्ञा आहे. **चढून येणे** – हल्ला करून येणें. **खतम केली** – समाप्त केली. फुलणसाहेबानें तोफेची फैर झाडताच धोंडोपत गोडबोल्याचें सैन्य पळून गेलें.

( ८७ ) तों इकडे यशवंतराव महाराजांनीं पांच हजार फौजेचा जमाव करून नेमावर हांडे हादें लुटून खरगोणचा सुमार धरला. तों इकडे इंदुराहून नागो जिवाजी यांनीं पांचशें स्वार शिलेदाराचे बापू पिंगळेबरोबर देऊन, एक पलटण त्यांत ज्यानसाहेब फिरगी, असे नर्मदा उतरून कसरावदेवर आले. तेव्हा यशवंतराव महाराज यांनीं अवघड वाटून डागरकराडा धरावा अशी मसलत शामराव महाडीक यांसी बोलले. तेव्हा महाडिकानें शिव्या देऊन स्पष्ट बोलला कीं, "गाडींत शेंपूट घातल्यानें हरतऱ्हेनें हस्तगत करून, तू धनगराचे बीज आहेस, पोटास भाकर, आगास वस्त्र, बसावयास घोडें मिळेलच. परंतु आम्हासारख्याचे मस्तकीं मेखसूची योजना होऊन राडापोरें ढाणकास वाटतील. तुझे मनात धैर्य नसल्यास पाठिंबा ठेऊन हें पलटण तरी उडऊन टाकू यात जय अपजय ईश्वर देईल तसें पाहून घेऊ. विना एक वेळ दाती दिल्याखेरीज नक्षा जमणार नाहीं" हाच मनसुबा सिद्ध करून मीरखा वगैरे रिसालदार बोलावून आणून, त्याची खातरतसलीम करून हामराहा केलें. तेच समयीं तयारी करून पलटणचे सुमारास आले तों इकडे पलटणें कूच होऊन खरगोणचे सुमारें जात होतीं. तितक्यात यशवतराव होळकर सडा घोडा राऊत दोन हजार येऊन पोहोंचले. पलटणचा किल्ला बाधून होते. हें पाहताच घोडे घालून माणसें जाया करून जानसाहेबास धरून घेतले. स्वार सरजाम महेश्वरींच होता. यानीं पलटणें गुडाळून जावडाचावडी नर्मदेस घोडे पाणी पाजून पुन्हा मुक्कामास आले. मावशीबाई व भारमल होळकर याचे मात्र मिळाले होते. जावडाचावडीस मुक्काम ठेवून मावशीबाई उतरून जाऊन घेऊन

(८७) ज्यानसाहेब – जीन बॅप्टीस्ट. डागर कराडा – डोंगर कठडी. डागर कराडा धरणे – डोंगर कठडीचा आश्रय घेणें. हस्तगत करून – हस्तगत करून घेतील. तू लपून डोंगराचा आश्रय घेतलास तरी तुला पकडतील. धनगराचें – येथें अर्थ थोरल्या मल्हारराव होळकराचे. मेखसू – तंबू, राहुट्यांच्या मेखा ठोकण्याची मोठी लाकडी मोगरी. ढाणक – महार, मांग ढाणकास वाटणें – शिरच्छेद करण्याकरता मागाच्या हवाली करणें पाठिंबा ठेऊन – पाठिंबा ठेव. म्हणजे माझ्या पाठीशीं मुकाट्यानें बैस. दाती देणे – दाताडावर हाणणे, तोंडांत मारणें. नक्षा – कीर्ति, वरचष्मा, जरब. खातर तसलीम – खात्री. हल्ल्यांत काम करून दाखविलेंत तर तुमचे अमुक अमुक उर्जित करू, अमुक तमुक बक्षीस देऊ असें त्यांस आश्वासन देऊन. किल्ला – व्यवस्थित अशी सैन्याची शिस्तशीर रचना. धरून घेतलें – पकडले, हस्तगत केलें, कैद केलें. मात्र – 'आंत्र' असें पाहिजे. मावशीबाई व भारामल होळकर हे आतून यशवतराव होळकरास फितूर झाले होते.

आली. ते मावशीबाईचे वाड्यांतच होते. किल्यावर शिबंदी भिकाजी जमादार खानदेशी व टकापा कर्नाटकी वगैरे बाईसाहेबाचे हातचे होते. त्यांचा विश्वास न पडे. सबब त्यांशीं बोलणें लाविलें कीं, तुम्हीं किल्याखालीं उतरून भवानीपाशीं राहावें तुमचा हिशेब तुम्हास चुकवून देऊ असे बोलणें करून किल्यावरील शिबंदी दरोबस्त काहाडली आपले बरोबरील मेहेरबानसिंग हजार बाराशें माणसे किल्यावर घालून चौकीपहारे नेमिल्यावर खासास्वारी किल्यावर दाखल जाहली नतर शिबंदीचे तलबेविशीं बोलणे पडले तेव्हा त्यासी उत्तर केलें कीं, मी होळकर होतो म्हणून तुम्हीं आपले तलबेकरिता किल्ला माझे हवाली केला. दुसरा कोणी येता त्याजलाही असे करिता कीं काय? हा दोष त्याजकडे लावून हुसकून दिल्हे तलबेपैकीं कवडी दिल्ही नाही मासपक्ष महेश्वरीं राहून कलमजारी चाललीच होती.

( ८८ ) तों इदुराहून नागो जिवाजी बमय फौज पलटणसुद्धा समेरूढचा घाट उतरून कलाहई आखेपुरा छकडा बावडीचे सुमारे आले तों हेही महेश्वरीहून सरंजामसुद्धा मुकाबल्यास गेले तेथें पलटणाशी पाय न टिकता महेश्वरास आले. किल्याचे दरवाजे लावून पाहरे चौक्याची मुस्तकी करून दरखदार मडळी बोलावून बाईसाहेबाचा जामदारखाना फोडला त्यात किमती भारी, वजनात हलके, अशी रकम काहडून घेऊन काहीं चादी काही सोन्याची भाडीं बर्तन माफक भार बर्दारी ओझ्याचा अजमास घेऊन त्याक्षणी बाहेर पडले तारापुराचा घाट चढून किल्ले माडवास आले. त्याचे मागे आबाजी रणसोड व भारमल होळकर वगैरे निघून गेले नागो जिवाजी व दुदरनेक यानीं मागोमाग येऊन किल्ला घेतला असता

(८७) **बाईसाहेबाचे हातचे** – अहिल्याबाईच्या पदरचे, वेळचे. **मी होळकर होतो म्हणून . . असे करितां की काय?** – यशवतराव होळकर त्याना म्हणाला, " किल्याचा कबजा मीं घेतला तो काहीं तुम्हा शिबदींतील लोकाशीं करार करून नव्हे ' माझा करार काय असेल तो तिसऱ्याशींच होता. पण मी होळकरापैकींच आहे असें पाहून तुम्हीं आता आपल्या पगाराची बाकी माझ्याकडे मागता काय? दुसऱ्या कोणी किल्ला असा बळकावला असता तर तुमची त्याकडे बाकी मागण्याची प्राज्ञा होती काय? व त्यानें तरी ती दिली असती का? तेव्हां तुम्हांस काही एक मिळावयाचें नाही. चालते व्हा!

(८८) **मुस्तकी** – खबीरता **रकम** – ऐवज, जिन्नस, वस्तु, नग. **बर्तन** – भाडें **भाडीबर्तन** – भाडींकुंडीं. **माफक भार बर्दारी** – भारबर्दारी माफक– ओझ्याच्या वाहनास झेपेल इतकें. **भार बर्दारी** – ओझें वहाण्यासाठीं बैल, तट्टे वगैरे.

महाराजास मसलत कठीण पडती. हें त्याजपासून न घडता अडीरात देऊन प्रहर दिवस चढताना आले. इतक्या अवसरात त्याच्यानें जें घेववलें तें घेऊन किल्ला मोकळा टाकला. तों ते येऊन आत येऊन शिरले. यानींही मासपक्ष किल्यात राहून राहिलें साहिलें बरबाद करून महाराजाशीं रहबार लाविला कीं, " आपण जमविलें हे नीटच, परतु शिक्का काशीराव याचे नावाचा चालवून कारभार मुक्त्यारीनें करावा " असें बोलणे हैबतराव हमीर व निळोबा साठे निसबत पवार धारकर याचे विद्यमाने होऊन हैबतराव हमीर हे बोलण्याचे दरम्यान त्याजकडून किल्यातील श्रीरामजीच्या तुळशी उचलून देऊन नागो जिवाजी याचे मनातील सशय दूर होऊन भेटी जाहल्या नतर दहापाचा रोजानीं नागो जिवाजी धरून पायात बिड्या घातल्या सोळा सस्कार करण्याचे ते केले दुदरनेक याचे बोलणे पडले की, " आम्हीं चाकर ते पक्षी सागर्तील ( ती ) चाकरी करू आमचे भेटावयाचे प्रयोजन ते काय ? तेव्हा लिंग अडीच शेर पाहून लखबा दादावर जगन्नाथराम जयपूरचे शाहाघर होते त्याचे मदतीस रवाना करून किल्ले रामपुरा ही जागा बसावयास दिल्ही. त्यास लखबादादास सामल होऊन जयपुराची लढाई मारून फिरून रामपुरास येऊन बसला. इकडे किल्ले माडव येथून कूच करून इदुरास आले. मावशीबाईचा काळ माडवावर झाला भारमल होळकर याजला महेश्वरास रवाना करून खरगोण वगैरे महालचा बदोबस्त केला. नतर इदुराहून कूच करून सुजपालपूर, सारगपूर व अष्टें पाच महाल याचा परामर्ष करून शिरोजेस गेले तेथून पुढे मीरखान सुभा करून सागर प्रातीं रवाना केला त्याने सागर लुटून मावारा शिरोजेस आला. मग फिरत फिरत राघोगडावरून समेरूढचे घाटावरून महेश्वरास आले. महेश्वरीं आल्यावर पदरचे गोरगरीब बाईसाहेबाचे लोभातील होते त्याचेही अगी भूतदया खरीच,

---

(८८) **अडी रात देऊन** – अडवी रात देऊन. रात्र आड करून. भावार्थ त्यानी रातोरात कूच करून जावें, तसें गेले नाहींत. रात्रीं मुक्काम करून दुसरें दिवशी आले. **रहबार** – वाचनाची चूक. रहदार असें असावें. रहदार म्हणजे राबता जा ये. येथें अर्थ बोलणें, सूत्र. **सोळा संस्कार** – येथें अर्थ पूर्वी कैद्याचा छळ करण्याचे जितके प्रकार होते तितक्या तऱ्हेने त्याचा छळ केला. **लिंग अडीच शेर पाहून** – 'शेठ सवाशेर आणि लिंग अडीच शेर' भावार्थ मालकापेक्षा नोकर शिरजोर. लिंगायत लोक गळ्यात शिवलिंग घालतात. तें पुष्कळ वेळां मोठें व जड असते. यावरून वरील म्हण प्रचारात आली. **मीरखान सुभा करून** – मीरखानाला सरसेनापतीपद देऊन. **त्याचेही अंगीं इ०** – यशवतराव होळकराच्या मनांत. भावार्थ, अहिल्याबाईच्या पदरच्या गोरगरीबानाहि लुटण्याचे यशवतरावाच्या जीवावर

परंतु फौजेचा जमाव होऊन खर्चाच्या अडचणीकरिता आपपर विचार राहिला नाहीं. कसेंही करून पैका उत्पन्न करून फौजेस द्यावा, हेंच लक्ष. गोविंदराव भगवंत व काशिनाथ आपाजी वगैरे मामलेदार होते ह्यांजपासून ठोकून पिटून चार रुपये घेतले. मग फौजेसुद्धां इंदुरास आले. मग देशीहून लाडाबाईचें वर्तमान आले. मग प्रपंचाची बुद्धि धरून गोतपात (पाहून) नंतर भिवाजी फणसे यांचे कन्येशीं विवाह केला. लग्न झाल्यावर केसू बाहूर परगणे धार येथें छावणी झाली. तेथें आनंदराव पवार वगैरे याच्या भेटी जाहल्या. एका खवाचे गहू चार महिने सारे फौजेने खाल्ले.

(८९) पुढें कपू भरण्याचा इरादा (होऊन) फुलणसाहेब याजला कपू भरण्याचा हुकूम देऊन, विठ्ठल महादेव कारकून फडणिसाकडील बराबर देऊन, जावरें व देपाळपूर वगैरे महाल खर्चास लावून देऊन, कंपू भरण्यास पाठविलें. त्याच मुक्कामीं शिंद्याकडील बाया सेदव्याचा घाट चढून पुढें महाराजास पत्रें आलीं कीं, आम्हीं उज्जनीस येतों, तुम्हीं आम्हास अनुकूल असावें, त्याजवरून पुन्हा इंदुरास येऊन शामराव महाडीक याची रवानगी बायास घेऊन यावें याजकरितां सरजाम बरोबर देऊन वाटे लावले नर्मदेचे जवळ महाडीक याच्या व बायांच्या भेटी जाहल्या. बोलणें चालणें परस्परें होऊन दरकूच इंदुराजवळ घेऊन आले. याच्या त्याच्या भेटी जाहल्या. बाळाभाऊ कारभारी याचीं बोलणीं परस्परें झालीं कीं, तुम्हीं आम्हास अनुकूल असावें तुम्हास उज्जनीस पावल्यावर खर्चास दरमहा बोलल्याप्रमाणें देत जाऊ. परस्परें बेलभंडार होऊन बायांबराबर स्वारी उज्जनीस गेली. तेथें गेल्यावर बायानीं लखबादादा मेवाडात होते त्याजकडे पत्र पाठवून त्याजला बोलाविलें तेही दरकूच अगरकानडचे सुमारे येऊन त्याचीं पत्रें बायास

(८८) आलें. परतु करतो काय ! फौजेचा खर्च वेळच्यावेळीं भागलाच पाहिजे. म्हणून मिळेल तेथून मिळेल त्या उपायानें त्याला पैका उभारावा लागला व म्हणूनच त्यानें वरीलप्रमाणें अहिल्याबाईच्या पदरच्या लोकांना छळून त्यांजकडून मिळेल तेवढें द्रव्य काढलें. **प्रपंचाची बुद्धि धरून** – लग्न करावें अशी इच्छा होऊन. **गोतपात पाहून** – मुलीचें कुळशील जुळते कीं नाहीं तें पाहून. **खवाचे** – मोडी वाचनाची चूक दिसते. मूळ शब्द 'पेंवाचे' असा असावा. धारेस सुबत्तेची कमाल होती. तेथें इतकीं प्रचड पेवें होतीं कीं, त्यापैकीं एकाच पेवातील गव्हावर याच्या फौजेची चार महिनेपर्यंत गुजराण झाली.

(८९) **कपू भरणे** – कवायती कपूत शिपायांची भरती करणें. **पर्याय** – प्रकार.

आलीं कीं, होळकरापाशीं कबूल केलें त्यापैकीं एक पैसा देऊं नये, आम्हीं येऊन पोंचल्यावर जें करणें तें करूं. ही बातमी महाराजांस कळतांच गावांत स्वारी बायांकडे गेली. तेथें बोलण्याचा पर्याय दुसराच पहाण्यांत आला. कारभारी यांचीं बोलणीं चढाचीं पाहिलीं, तेव्हां महाराज स्पष्ट बोललें कीं, "तुम्ही आम्हाला सामल केलें. साप्रत बोलण्याचा विचार तुमचा दुसरा दृष्टीस पडला. त्यापक्षीं आमचीं तुमचीं बोलणींप्रमाणाच्या गोष्टी जाहल्या त्या तुमचे तुम्हापाशीं आमचें आम्हापाशीं. तुम्हांस कळेल तें तुम्हीं करावें, आम्हांस कळेल तें आम्हीं करूं." असें बोलून पानसुपारी, अत्तर-गुलाब काहीं न घेता आपले लष्करात स्वारी आली. तों मागें बाया शहरातून निघून उडोशाच्या तळावर त्याजकडील फौज पडली होती तेथें येऊन राहिल्या.

( ९० ) इकडे महाराजानीं रात्रौं शामराव महाडीक व चिमणाजीपंत भाऊ व मीरखा बोलावून सल्ला केला कीं, लखबादादा व बाया सामल झाल्यावर आपणास जड पडतील यास्तव बायावर जरब द्यावी असा मथितार्थ होऊन फुलणसाहेबाचा कंपू व माखणलालशिंगाचा कंपू या उभयतास ताकीद करून उडोशाचे तळावर बायाकडील फौज पडली आहे त्याचें रुखे तोफा लावून मागील दोन घटका रात्र राहता तोफा सुरू करणें मग त्याणीं फौजेचें रुखें तोफा लावून मागील दोन घटका रात्र राहता गोळा सुरू केला. फौज लुटून घेतली. ज्याला सवड फावली तो शहरात निघून गेला. बाया सद्धा निघून लखबादादाकडे गेल्या. हें कळल्यावर फौजेचें कूच करून सडी स्वारी त्यांचे मागें गेली लखबादादांचे व इकडील पाचा कोसाचे अंतर राहिलें.

( ९१ ) मग लखबादादाकडील भला मनुष्य पेगाम घेऊन आला. बोलणीं झालीं "परस्परें ऋणानुबंध वडिलोपार्जित त्याजवर नजर देऊन झाली गोष्ट ही भविष्यावर टाकून आपण आपला उद्योग करावा. आम्ही आपले उद्योगास जातो." ही गोष्ट इकडे सोयकर पडली. माघारीं कूच केलें. तों बातमी आली कीं, सत्वाशाकडे शिंद्याकडील तोफा पलटणें, देवजी गौळी, चिंतो आत्माराम वगैरे सरदार आले काहीं पलटणें मुकाबल्यास आलीं. तेव्हा फौजेचें कूच करून

---

(९०) **बायावर जरब द्यावी** – शिंदे बायाच्या सैन्यावर हल्ला करावा. **मथितार्थ** – मसलत.

(९१) **भला मनुष्य** – मुत्सद्दी, वकील, बोलणें चालणें करण्यासारखा वजनदार मनुष्य. **झाली गोष्ट भविष्यावर टाकणे** – घडलें तें अदृष्टातच होतें म्हणून नाईलाजानें घडलें अशी सपादणी, बतावणी करणें. **सोयकर** – सोईस्कर.

तिकडे चालले. सताजी लाभाते व कृष्णाजी मुकुंद बक्षी याजला त्याचे तोंडावर पुढें रवाना केलें. त्यानें नेवरीजवळ पलटणें घेरलीं. त्याची याची गोळागोळी झाली, तो मागून स्वारीं दाखल झाली. पलटणें लुटून तसेंच माघारीं घाट उतरून सत्वाशाजवळ फौजेचा मुक्काम करून पलटणें व स्वारी रेवे पावेतों गेली. इकडून रेवा पार होऊन शिंद्याकडील जिनसीचे गोळे चालले. लढाई मातबर झाली. देवजी गौळी कामास आले. जागा अडचणीची, मैदानची जागा गाठ पडल्यावर पाहून घेऊ असा विचार करून नर्मदेचे काठीं आपल्या तोफा सोडून माघारी आले. कुशाबा बक्षीवर क्रोध केला की, तोफा सोडून माघारी आलास लाज कशी वाटली नाहीं ? मग कुशाबा बक्षी यानीं जीव झोकून पाच हजार स्वार मराठा घेऊन तोफेवर जाऊन बसला आणि लोकास बोलला कीं, "मजला तरी मराव-याचें आहे. तुम्हास होळकराचे निमकापासून आदा होणे असल्यास घोडीं सोडून तोफा काढाव्या. हे न करिता मागे गेल्यास होळकर प्राण घेईल, सोडणार नाहीं. त्याचे हाते मरावे याजपरीस येथे मरावे यात लौकिक व पुण्य पुरुषार्थ आहे." मराठा लोक, अबरू तलम. घोडीं सोडून तीस तोफा दराबीवर धरून तीन कोस आणिल्या. तो पावेतो कारखान्याचें माणूस बैल रसा काही एक नाहीं. झाडींत असल्यास लागून होते कारखाना जैयद, तेव्हाच मेळामेळ होऊन तोफा काढून आणल्या. मग सरकार प्रसन्न होऊन कृष्णाजी मुकुद याजला बक्षीस जाहली कीं, आज पावेतो तुजविशीं पाप-पुण्य मनात होते ते टाकून समाई जाहली. हे वाणी बक्षीने श्रवण करून चिरंजीव तऱ्हेतील कुरणिसा करून हात

(९१) **जिनसी** – तोफखाना **कुशाबा** – कृष्णाजी मुकुद बक्षी **जीव झोकून** – जीवावर उदार होऊन. **निमक** – मीठ **निमकापासून आदा होणे असल्यास** – खाल्लया मिठाची उत्तीर्णता करून दाखविणें असल्यास, खाल्लया मिठास जागणें असल्यास. **मराठा लोक अब्रू तलम** – मराठे लोक अब्रूला फार जपतात. तलम वस्त्र जरा कोठें खोंबारा लागला तरी फुकट जातें. त्याप्रमाणें अब्रूची गोष्ट आहे, असे मराठे मानतात व ती जाऊ नये यासाठीं प्राणहि देतात. **दराबी** – तोफा वहाण्याचा खटारा. श्री. साने 'दराबीचा' अर्थ– तोफेखालचा फडपैय्या म्हणजे 'Stand' असा देतात. **रसा** – दोरखड, दोर. **समाई** – निखालसता. **चिरंजीव तऱ्हेतील कुरणीसा करून** – राज लोकाना निरनिराळ्या दर्जाच्या लोकांनीं सलाम किंवा मुजरा करण्याच्या निरनिराळ्या रीति ठरलेल्या असतात. सरदारानीं विशिष्ट तऱ्हेनें मुजरा करावयाचा. राजघराण्यातील लोकांनीं किंवा राजपुत्रांनीं काहीं विशिष्ट तऱ्हेने मुजरा करावयाचा अशा रीति ठरलेल्या असतात.

जोडून विनंती केली कीं, " दागिने-वस्त्रें देतां ती खाऊन फाडून टाकितों. हे देणें माझे प्रालब्धानें झालें."

(९२) ऐशीं बोलणीं होऊन पलटणसुद्धां कूच करून शाहाजापुरावरून घांस-दाणा करीत इंदुरास आले. तो शिंद्याकडील फौज-पलटणें चिंतो आत्माराम घेऊन उज्जनीजवळ दाखल झाले बातमी समजल्यावर उज्जनीजवळ आले. क्षिप्रेनजीक मुक्काम करून पुढे छबिन्यास कुशाबा बक्षी व कृष्णाजी माहडीक व चिमणाजीपंत याजला त्याचें लष्कर गोगाशाचे टेकडीपुढें उज्जनीचे गावकुसाशीं लगत पडलें होतें, त्याचे तोंडावर पाठविले हे वर्तमान चिंतोपंतांस कळतांच त्यानीं फौज तयार करून त्यांचे मुकाबल्यास आले. त्यांची याची गोळागोळी सुरू जाहली दिवस थोडा राहिला सबब चिंतो आत्माराम मुक्कामास गेले म्हणून बक्षीचा निरोप खाशांस येताच स्वारीही छबिन्याजवळ आली रात्रींचा विषय सबब एक्या टेकडी-वर जाऊन खासे तमाशा पाहण्यास बसले. तो मागून फुलण व माखणशिंगा-कडील पलटणे येऊन पावलीं मग शिंद्याचे फौजेन्या सुमारें मोर्चेबंदी आंगपाता-कडे मीरखा वगैरे पठाणाकडील याजला आज्ञा जाहली कीं, तिकडून मोर्चेबंदी करावी. रात्रौ खाशाचा व मीरखानाचा संकेत जाला होता कीं, दिवस उगवल्यावर तोफा सुरू करून हल्ल्याचा विचार होईल ते समयीं एक बाण इशाऱ्याचा सोडूं, म्हणजे तुम्हीं उठावणी करावी. मग दिवस उगवताच तोफा सुरू करून पलट-णाच्या बाजूस पागा हुजुरात व बक्षी, चिमणाजीपंत वगैरे होऊन तोफा दाराबीवर धरून संकेताचा बाण सोडताच आगपाताचे दरवाजाकडून मीरखानाची उठावणी जाली. चहूंकडून फौजच फौज, तेव्हा शिंद्याचे लोक घाबरून गावात पळूं लागले. चिंतो आत्माराम कामास आले. लढाई खतम जाली नंतर आठ पंधरा दिवस तेथेंच मुक्काम होता

---

(९१) येथें बक्षीनें होळकरास आपण त्याचे जिवलग कुटुंबीयच झालों असे दर्श-विण्याकरितां त्या पद्धतीनें कुराणिस म्हणजे मुजरा केला. **दागिने, वस्त्रें देता तीं इ०** – बक्षी म्हणाला, " तुम्ही बक्षीस म्हणून दागिने किंवा वस्त्रें दिलीं असतील तर तीं अंगावर घालून केव्हा तरी फाटून गेलीच असती. परंतु तुम्ही आतां हें जें कृपेचें किंवा शाबासकीचें बक्षीस मला दिलेत तें मला अक्षई पुरेल."

(९२) **घास दाणा** – सैन्याच्या घोड्यासाठीं दाणावैरण मिळवण्यासाठीं मागितलेली खडणी. **छबिना** – सैन्याच्या छावणीभोंवतीं रखवालीस ठेवलेला स्वारांचा फिरता पहारा. **स्वारीहि** – यशवंतराव. **तमाशा** – लढाईचा तमाशा.

( ९३ ) या अवसरांत शिंदे यानीं सरजेराव बाबुखां वगैरे सतलजसाहेब याचा कपू बराबर देऊन हंड्याचे घांटे चढून इंदूरचे सुमारें चाल केली. हें वर्तमान महाराजास समजतांच उज्जनीहून कूच करून खजराण्यास इंदूरनजीक मुक्काम केला. तों शिंद्याकडील फौज येऊन पोहोंचली. मग सडी स्वारी होऊन त्याचे तोंडावर गेली. पहिले दिवशीं इंदुराहून पाच कोश तेथून ऐवज आगून याचे पदरीं घालावा आणि यानीं कूच करून चालावें. हें वर्तमान दुदरनेकास समजून मोहोनलाल यास कंपूत्रे समजादिशीकरिता बावीस रवाना केले. मशारनिले कपूत येऊन, नवमाही तलब आम्ही देतो तुम्हीं कूच करून रामपुऱ्यास चलावें. कबूल करून ऐवज पदरीं घातल्यावर कूच करून साहेबापाशीं येतों, ऐसे कबूल करून मोहनलाल रामपुऱ्यास दुंदरनेकापाशीं येऊन सर्व वर्तमान सागून ऐवज मागू लागला. तेव्हा दुदरनेक याने मुद्दा घातला कीं, माहडिकाकडील दोघे गृहस्थ आहेत ते आमचे स्वाधीन केल्यावर ऐवज देऊ ही बातमी कंपूत गेली. कपूवाल्यांनीं क्रिया दिल्ही होती. ते म्हणू लागले, ग्यारमाही तुम्हीं द्याल तर तुम्हाबरोबर येतो. नाहींतर तुम्हास कोट्याचे दरवाज्यात पावतें करून देतों, म्हणजे आम्हीं क्रियेपासून मुक्त झालों. हें साकल्य उभयतानीं शामराव माहडीक यास लिहिलें. त्यांनीं ग्यारमाही कबूल करून उभयतास लिहिलें. पत्रे आलियावर कुमेदानाशीं ग्यारमाहीचें बोलणें करून त्याची दिलजमाई होऊन पूर्वीं वचन कथन जाहलें होते त्याची बळकटी केली. खाळाखालीं उतरून पार गेल्यावर वाटणी सुरू करू. प्रात:काळीं कपूचें कूच जालें, खाळाखालेचे काठीं गेले. तेथे टाकून गाडे उतरावयास वाट करितात हें वर्तमान दुदरनेकास समजल्यावर स्वार रवाना करून कपू लुटून घ्यावा, ते स्वार दिखाई देताच कुमेदानानीं तोफा फिरवून स्वारास गोळे मारले स्वार आले होते ते उधळून गेले.

( ९४ ) नदी आहे तेथें मुक्काम शिंद्याकडील फौजेचा जाहला. त्याजकडील पेंढारी आलीकडे येऊ लागले. हें कळताच महाराजाची स्वारी पोहोंचून त्याजकडील

( ९३ ) **अवसरात** – या अवधींत. **चाल केली** - चाल करविली. **नवमाही तलब** – नऊ महिन्याचा पगार, पगाराची बाकी. **क्रिया** – वचन. **ग्यारमाही** – अकरा महिन्यांचा पगार. **कुमेदान** – कमाडट या इंग्रजी शब्दाचा मराठी अपभ्रंश. कुमेदान हा कपूचा कमाडर किंवा सेनापति. **वचन कथन** – आणक्रिया. **खाळाखाली** – नदीचें नाव आहे. **तेथे टाकून** – तेथें या शब्दापुढें कांहीं तरी शब्द गळाला असावा असें वाटतें. तो काय असावा हें उमगत नाहीं. **दिखाई देतांच** – दृष्टिपथात येताच, दिसू लागताच.

व हिकडील लोकांची झटपट जाली. पाच पंचवीस माणूस जायां झाले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं शिंद्याकडील फौजेचें कूच झालें. तेव्हां तोंडावर महाराजांची स्वारी उभी राहिली. त्यानीं पलटणें व तोफाचा पन्हा बाधून बुणग्यांची रव पलीकडील आंगीं घालून चालले. दोन प्रहराचे समयीं इकडील फत्तेसिंग माने व हुजुरात पैकीं बार-गीर यानीं त्याचे स्वारावर करवन्या केल्या. त्याचा व हिकडील जमाव पडतां खांशानीं पाहताच आपला घोडा पुढें केला. तों त्यांचे बराबर सारेच लोक उठले. तों तोफखाना सुरू जाहला. त्याचे उठावणीस तोफा घेऊन पुढें गेले. ते दिवशीं इकडील तिकडील श पन्नास माणसें कामास आलीं. त्याचे फौजेनें तीन कोशांचें कूच करून मुक्काम केला. तिसरे दिवशीं इंदुराहून एका कोसावर मुक्काम शिंद्या-कडील फौजेचा आला. पाहून खासे व मीरखा यांनीं विचार करून फौजेची तोड राखावी या करिता माने व शिलेदार व हुजुरात जागजागां ठेऊन गांवानजीक तोफा पलटणे याचे मोर्चे लविले आश्विन शुद्ध ८ अष्टमी सन १२११ ते दिवशीं लढाई झाली. ते काळी मीरखानावर झिंबड पडली म्हणोन खासे इकडून मीर-खानाकडे समाचारास गेले. तों फौज जागां जागा मोर्च्यांवर होती ते महाराजाचे बराबर गेली. मग सुने रान पाहून शिंद्याकडील फौज पलटणें यांनीं चालून घेतलें. मग महाराजाकडील पेंढारी यानीं पळ काहडला. लढाई हारले. मीरखानाकडून खासे येतात तों इकडील फडशा जाला. तेव्हा तसेच अस्तमान पावेतों स्वारी उभी राहून रात्रौ जाबेस गेले.

(९५) जाबेस तीन चार दिवस राहून लोकास हुशार करून दसऱ्याचे मुहूर्तें पुन्हा डेरे इंदूरच्या रुखें दिल्हे. पाच रुपये स्वारी खर्चास वाटून नवलाईस शामराव माहडीक जुंजरनेकाचा वपू घेऊन आले. त्याजला सामल जाले. पूर्वी शामराव माहडीक काहीं कामाकरिता कोव्यास पाठविले होते. नंतर इकडील अडचण पाहून शामराव यास पत्रें लिहिलीं होतीं कीं, जुंजरनेकास सरमजामसुद्धां घेऊन तुम्हीं यावें. याजवरून शामराव माहडीक यांनीं रामपुऱ्यास जुंजरनेकास पत्र पाठविलें

(९४) पन्हा – पन्हा, भिंत, राग. रव – राग. बुणगा – सैन्यांतील वाणी, वणूज, व्यापारी, दुकानदार, बिन लढाऊ लोक. करवन्या – मूळात कल-थन्या असें असावें. कलथनी – हल्ला, उलटून पडून केलेला हल्ला. जमाव पडता – भिडतां, दोन्ही सैन्यांची गांठ पडतां. फौजेची तोड राखणें – तोंड राखणें. तोंडावर फौज म्हणजे घोडेस्वारांचें सैन्य ठेवावें असा विचार करून. मीरखानावर झिंबड पडली – मीरखानाच्या टोळीवरच शत्रूचा सर्व हल्ला आला. ते – ती. सुनें रान – मोकळें रान.

त्याचीं उत्तरें बयाद लावून येत गेलीं. मग माहडीक यानीं कृष्णा लक्ष्मण, बाळाजी रघुनाथ जुंजरनेकाकडे रवाना केले. त्यांस सांगितलें कीं, साहेब आल्यास उत्तमच आहे. घेऊन यावें. नाहीं तर त्याजकडील कंपूमध्यें शकटभेद करून कंपू घेऊन यावें. उभयता मशारनिलेची व जुजरनेकाची भेट होऊन बोलणीं झाली कीं, कंपू बिघडला आहे. त्याची समजूत करून मागाहून येईन. ऐसे बोलून उभयतास रवाना केलें. हें जुजरनेकापासून रामपुऱ्याहून निघून कंपू बावीवर होता तेथें आले. कंपूतील कुमेदानासी देण्याघेण्याच्या गोष्टी बोलून हिंदु याची गगाजळ व मुसलमान याचें कुराण याप्रमाणे वचन कथन घेऊन शामराव यास पत्रें लिहिली. अस्तमानी खाळपार आले. ग्यारमाहीची वाटणी सुरू केली एक्या पलटणाच्या गोलदाजास ग्यारमाही दिल्ही दुसरे दिवशी कूच करून दोन चार कोश आले. मुक्कामीं येऊन वाटणी चालली एक पल्टणीची वाटणी जाली ऐसें करीत करीत बुंदीस आले.

( ९६ ) इकडे राजे जालमासिंग याची पत्रे जुंजरनेकास गेली कीं, पत्रदर्शनी स्वार होऊन येणें. हे पत्र अस्तमान जाल्यावर दोन घटका रात्रीस रामपुऱ्यास पावलें चित्तास गोडसे वाटून निघाले लाखेरीस आले. तेथे हेरून चमेली तीरास आले. चमेली भरपूर, नाव चालेना, यास्तव पाल्यावर दोन चार मुक्काम होते. नतर पार उतरून कोट्यास हवेलींत दाखल झाले काही एक विसावा खाऊन दोन प्रहरचे अमलात शामराव याचे वाड्यावर शें–दोनशें लोकांनिशीं चाल करून गेले. वाड्यात येऊन दरवाजे लाविले शामराव याची माडी चढून गेले तो शामराव याणीं चौफाळ्यावर निद्रा केली होती. त्याजला पाहून उठून बसले. जुजरनेक शामराव याची माडी दाबून बसला होता. ते नागवी तरवार हाती पाहून शामराव बोलू लागला कीं, तुझे मनांत जें असेल ते कर. त्या संधीस शामराव याजकडील खिजमतगार कौलांवर चढून शेजारियाचे वाड्यांत उडी टाकून राजा जालमसिंग यांजपाशीं धावत गेला. वर्तमान झालें तें सांगितले. मग जालमसिंगानें भाईबेटे

---

( ९५ ) **बयाद लावणे** – सबबी सागणें. **साहेब** – स्वतः जुजरनेक. **शकटभेद** – फितूर. **गंगाजळ व कुराण** – हिंदु होते त्यांनीं गगाजळ घेऊन शपथ केली, व मुसलमान होते त्यांनीं हातीं कुराण घेऊन शपथ घेतली.

( ९६ ) **भरपूर** – पूर आलेली, पुराने भरून चाललेली. **चौफाळा** – झोपाळा. **माडी दाबून बसला होता** – उठून उभे राहतां यऊ नये म्हणून मांडीवर गुडघा देऊन बसला होता. **जालमसिंग** – हा कोट्याच्या राज्याचा कारभारी. **भाई बेटे** – जीवाचे विश्वासू लढवय्ये शिपाई.

पाठविले. तो हवेलीचा दरवाजा बंद. मग शिड्या लावून हवेलींत उतरून शामराव व फिरंगी होता तेथें पावले सर्व दृष्टीनें पाहून फिरंग्याचा हात धरून एकीकडे केलें. तलवार हिसकून घेतली. प्रतिष्ठेनें धरून जालमसिंगाकडे नेत होते. तों तेथून आज्ञा आली कीं, हवेलींत नेऊन कैद करणे. आणि सरजाम सर्व लुटून घेऊन शामराव माहडीक याजकडे पावता करणें. त्याजवरून जालमसिंगाचे आज्ञे-प्रमाणें त्यांचे लोकानी हवेलीवर चौक्या बसवून, त्याचे बराबरचे लोकांचीं हत्यारें घेऊन, शहराबाहेर काहाडून दिल्हें. कपूचे वर्तमान समजलें की, साहेबानी शामराव धरून कैद केला. कपूत चार होराचे चार चोराचे होतेच, जे साहेबाचें साधन ठेऊन होते त्यानी खुषी मानली उभयता कारकून हवालदील जाले, वास्तविक वर्तमान ( न ) समजल्यामुळे मुजरत हलकारे जोडी रवाना केली. ती जोडी प्रहर रात्रींनंतर नदी उतरून हवेलींत गेले. पत्रे पाहून हलकारे यास इनाम देऊन त्या वेळेस जाबसाल लिहून पदमसीचे गुमास्त्याकडून खर्चाची बेगमीची चिठ्ठी घेऊन दुसरे हलकारे रवाना केले. ते सूर्योदय झाल्यावर दुसरे दिवशीं घटिका दिवसास दाखल झाले पत्रें पाहून दीलजमाई होऊन कपूगाले कुमेदान अवघे बोलावून पत्रें वाचून दाखविलीं आणि साखरा वाटल्या. खर्चीची चिठ्ठी शहरात सावकाराचे येथें पाठवून सही केली. ऐवज आणून तावडतोब वाटणी सुरू करून दो महिन्यात अवघा फडशा केला. वीस रोजही आगाऊ दिल्हे. भाद्रपदमासीं शामराव कोठ्याहून निघून ताल्हेड्याचे मुक्कामीं कपून येऊन सरजाम सर्व अवलोकन केला. पंधरा दिवस तेथें मुक्काम होता. तेथून कूच करून शिंगोळीचा घाट उतरून खालीं आले. मागें जुजरनेकास लालाजी बल्लाळ व राजे जालमसिंग यानीं बहुतच फजीत केलें

(९६) प्रतिष्ठेने — मुसक्या न आवळता सरदारास शोभेल अशा रीतीने. **कपूंत चार होराचे चार चोराचे होतेच** — कपूत काहीं या बाजूचे तर कांहीं त्या बाजूचे असे होतेच. **जे साहेबाचे साधन ठेवून होते त्यांनीं खुषी मानली** — जे लोक जुजरनेकाशीं सधान ठेवून होते त्यांना जुजरनेकाने शामरावास कैद केली या वार्तेनें आनद झाला. **उभयता कारकून** — मागच्या परिच्छेदांत उल्लेखिलेले कृष्णा लक्ष्मण व बाळाजी रघुनाथ. **वास्तविक** — खरें, सत्य. **मुजरत** — तावडतोब. **हलकारे जोडी** — हलकऱ्यांची जोडी, जासूद जोडी. **खर्चीची चिठ्ठी सही केली** — सावकारास खर्चा देण्याविषयींची चिठ्ठी देऊन ती सावकारा-कडून मान्य करविली. **सही** — बहाल, खरे, बरोबर असा अर्थ फार्शी कोशांत पटवर्धन देतात. **वीस रोजहि आगाऊ दिले** — पुढील महिन्यांतील वीस दिवसांचा पगारहि आगाऊ दिला.

कीं, "तुम्हांस बोलाविलें कशास आणि तुम्ही केलें काय ? तुमचें व शामराव यांचें मेळ करून देऊं हरामखोरीचा डाग तुम्हांकडे न लागतां महाराजांची भेट घेऊन तुम्हांस निरोप देववावा, अशा करिता तुम्हास बोलाविलें. तें आमचे आम्हांपाशीं राहून तुम्ही आपली अवखाद बाहेर काढून हरामखोरीचा मदसद परिधान केला. तुम्हास महाराजापाशीं पावतें करावें, परतु आम्ही रजपूत आमचे इराद्यास खामी येती. बाकी तुम्ही आपल्याकडून कसर केली नाहीं." या भावीं दोष पदरीं देऊन रामपुऱ्यास रवाना करून त्याचे माथा आसान केलें माहडीक कपू घेऊन माळव्यात आले. यजमानाचीं पत्रें, रात्रींचा दिवस करून यावें, प्रसग अडचणीचा, म्हणून लिहीत गेले. इकडून लिहीत गेले कीं, आम्ही आल्याशिवाय लढाईचा मुकाबला करू नये. परतु होणार भविष्य आश्विन शुद्ध अष्टमीस लढाई शिकस्त जाली. पुढें जाबेऱ्या मुक्कामीं फौज समेटून नवलाईवर आले. तेथून माहडीक कंपूसुद्धा सामल झाला. पुन्हा कपूसुद्धा खासरोदेस येऊन आणखी चार रुपये घेऊन रतलाबेस आले. तेथील तसनस करून मागती खासरोदेकडेच आले, तों सरजेराव घाटगे व पेंढारी वगैरे याचा मुक्काम उज्जनीस होता. महाराजानीं गजा कुंवर कामास येऊन (?) कृष्णाजी माहडीक याजबरोबर सरमजाम देऊन इंदूरचा बंदोबस्त करावयास रवाना केले. तों शिंद्याकडील पेंढारी व फौज येऊन आश्विन वद्य चतुर्थीचे दिवशीं लढाई जाली. गजा कुवर कामास येऊन कृष्णाजी माहडीक याजला जखमा आल्या शिकस्त होऊन पेंढारी यानीं इंदूर जाळून निघून गेले. काहीं वस्ती जुने इंदुरास मात्र राहिली. हे वर्तमान स्वारींत येताच कपूसुद्धा इंदूरचे मुक्कामीं कार्तिकमाशी आले. शहर बेचिराख, तेव्हा लोकास दिलदिलासा देऊन बदोबस्त केला. नजीक इंदूर येथे मुक्काम होता.

( ९७ ) तों काशीराव होळकर पुण्याहून निघून दरकूच देवाशास आले. ( त्यानीं ) तेथून पाडुरग शंकर व आनदराव माधव निसबत बुळे उभयतास खर्चाचे अडचणीमुळें महाराजाकडे पाठविले. उभयतांच्या भेटी जाहल्यावर, पाडु-

---

(९६) **अवखाद** – अवकात, जोर, शक्ति. **मदसद** – मुखवटा. **इरादा** – बाणा. **खामी** – कमीपणा. **घेऊन** – 'देऊन' असें पाहिजे. **आसान** – मूळ शब्द 'येसान' म्हणजे यहासन असा असला पाहिजे. **यहसान** – कृपा, उपकार. **लढाई शिकस्त जाली** – लढाईंत पराभव झाला. **शिकस्त** – पराभव. **समेटून** – गोळा करून. **तसनस** – लुटालूट. **दिलदिलासा** – धीर, भरवसा.

( ९७ ) **उभयताच्या भेटी जाल्यावर** – जाहल्यावर या शब्दापासून पुढें मनांत वागून या शब्दापर्यंत स्वतत्र क्लॉज आहे. 'जाहल्यावर यांचा सत्कार

रंग शंकर यांणी तुकोजी होळकर गादीचे मालक जाल्यावर पूर्वींच्या खटल्याचे दिवाण हे, यांणी विठोबा व यशवतराव होळकर व काशीराव होळकर याजला, रखमाबाई होळकर सुभेदारांची स्त्री इची जलाली फार मोठी, तेव्हां सुभेदार यांनीं त्रिवर्गाची सोय पाडुरग शंकर यास करून प्रगणें कायथें पूर्वी मोठे सुभेदार याणीं तुकोजी होळकर सुभेदार यास जाहगीर लावून दिल्ही होती, तो महाल सदरहू अन्वयें याचे खर्चास लावून देऊन, काशीरायाचे नावे सरदारीचा सरळ शिक्का कायम ठेऊन, मशारनिल्हे याणीं बाईच्या जरबेंत त्रिवर्ग माजराचें पिलासारिखें पोटाशीं धरून, लहानाचे मोठे करून, नावारूपास आणिले. ती क्रिया महाराजाचे मनात वागून याचा सत्कार केला. याचे समोर हुक्का पिऊ नये, गैरशिस्त भाषणें करू नये, याप्रमाणें वहिवाट घातली याचे सागितल्याप्रमाणें काशीराव होळकर यांजला खर्चास पाठवून महेश्वरीं दाखल जाहले जालें वर्तमान फौजेंत आलियावर यांचे भेटीस महाराज सडे महेश्वरीं गेले फौजेंत माहडीक होते. खासे महेश्वरीं जाऊन बाईसाहेबाचे छत्रीपाशी उभयताच्या भेटी जाहल्या. उभयताही श्रमी जहाले. नतर बाळासाहेब व महाराज किल्लयात आले सलामीच्या तोफा जहाल्या. भोजन इत्यादिक न होता महाराज निघून विठोबाचे देवळीं बाड होतें तेथें गेले.

(९८) दुसरे दिवशी नर्मदेचे दक्षिण तीरास गोपाळराव चिटणीस दहा हजार फौज व चार पलटणे घेऊन आले. तेव्हां काशीराव होळकर यांजकडील सरमजाम महेश्वरीं होता त्याच्या मुकाबल्यास खुशालसिंग जाधव व हरजी काळगावडा पार उरतले. वासक शिद्दी जमादार दोन हजार मनुष्य याजप्रमाणें पार उतरून मुकाबला गोपाळरायाशीं जाला. लढाई सुरू होऊन तरवारीशीं गाठ पडली. ईश्वर सत्तेनें गोपाळरायाचे पाय उधळले. तो शिदी काहीं ज्वारीच्या शेतात व काहीं नाल्यात. हें गोपाळरायास ठाऊक नाहीं इकडील फौजेनें त्याजवर घाला घातला. त्यानीं दोन तीन तासेरे दिल्हे. त्यानें गोपाळराव याची खराबी फार झाली. मग

---

(९७) केला.' असें आधीं वाचावें व मग पाडुरग शकराच्या माहितीचा परिच्छेद वाचावा. **पूर्वींच्या खटल्याचे** – तुकोजी होळकराच्या पहिल्या कुटुबाच्या ससाराकडे दिवाणगिरीचें काम करण्यासाठीं पाडुरग शकर होते. **जलाली** – तामसी वृत्ति. तुकोजी होळकराची बायको रखमाबाई अत्यत कजाग व दुष्ट असल्यामुळें तिचें मुलाशींहि बिलकूल पटत नव्हतें. **ती क्रिया** – ती बजावलेली कामगिरी. **जाले** – 'आले' असें पाहिजे. अर्थात् काशीराव. **उभयताहि श्रमी जहाले** – दोघांनाहि फार वाईट वाटले. **बाड** – जनानखाना, कुटुबकबिला.

(९८) **शिद्दी** – सिंदी असेंहि होईल.

हरनाथ याचे बरोबर चार पलटणे देऊन पार उतरून अबाजी खंडेराव याजकडे सुभ्याचें काम सागितलें. तेही पार उतरले. दुसरी लढाई मुळठाणचे आसपास अड-चणींत प्रसंग पडला. इकडील पलटणांत गोरा होता त्यानें नाल्याचें अवसान न पाहता एक तोफ व चार कपन्या घेऊन कोणास न पुसता त्याचे स्वार वाहडले होते त्याजवर गेले. मारीत चालला त्या स्वारानीं पाठीवर घेऊन कंपन्या पावेतों तोफा खोऱ्यात येताच स्वार सरंज.म एकीकडे होऊन त्याची पलटणें खोऱ्याचे वर होती त्याचा व कपन्याचा मुकाबला पडला. तेव्हां त्यानीं त्याची चाळीस तोफ उमाट्यावर हे बदखलींत, इकडील स्वाराकडील मदत तोफाऱ्या माऱ्यास्तव न जाल्यामुळे चार कपण्या पावेतों फौज मारली गेली. गोपाळराव यांस बऱ्हाणपुराहून शिंदे याचे बोलावणें आल्यामुळे तिकडे गेले. हेही महेश्वरास आले.

( ९९ ) उभयता बधूचे खलबत जाले त्यात हाशील कारभाऱ्यानीं मजला सुख फार दिल्हे. त्याचे उसने ( झाले ) म्हणजे माझा सतोष होईल तेव्हा यशवत-राव महाराज यानीं दूरादेश पाहून विचार केला की, वडिलानी आज्ञा केली हा याचा जातीस्वभाव ब्राह्मण टाकून काय मिळणे हे आपल्यास ठाऊकच आहे. परतु फौजेचा पसारा मोठा. त्यात इंदूरच्या शिकस्तीपासून फौज हवालदील पैक्या वाचून याची दीलजमाई होत नाहीं. यास्तव मुत्सद्दी लोक कैद करून पैक्याची तोड करावी यात फौजेस आधार वाटून वडिलाचाही सतोष होईल. असा मनसोबा सिद्ध करून खंडो महादेव व दिवाणाकडील कृष्णराव भाऊ व श्रीपतराव व रामराव व आबाजी व पाराजी पंत व सखाराम जगजीवन व दिनकरराव पागनीस व दाजी मुनसी व स्वारींतील बाळाजी कृष्ण फडणीस इतक्या असाम्यास कैद करून ( आणिल्या ) आज्ञेस उजूर सखाराम जगजीवन व दिनकरराव पागनीस

---

(९८) **वाहडले होते** – वाहवून पुढें आले होते. **खोऱ्यात** – खोलगट जागेत. **उमाट्यावर** – उच जागेवर, टेकडीवर. **बदखलींत** – खोल नाल्यात.

( ९९ ) **यशवतराव याने विचार केला की, वडिलानी आज्ञा केली हा याचा जातीस्वभाव** – यशवतरावानें मनांत विचार केला की, काशीरावानें हुकूम केला. तो वयानें वडिलच आहे. आणि शिवाय वाटेल तसे अविचाराचे हुकूम देणे हाहि त्याचा जातिस्वभावच आहे तेव्हां तो मानण्याचें कारण नाहीं. **ब्राह्मण टाकून काय मिळणे** – कारभारी ब्राह्मण आहे त्यांस काढून टाकण्यानें काहीं एक फायदा होणार नाहीं. उलट नुकसानच होईल किंवा "ब्राह्मण ठोकून काय मिळणें" असाहि पाठ शोभेल. व तोच पुढील हकीकतीशी शोभणार आहे. ब्राह्मण मुत्सद्यास तसदी करून फारसा पैसा मिळणार नाहीं असें यशवतरावाचें मत. **उजूर** – विलब, विरोध.

यानीं रदबदल्या विशेष केल्यामुळें यातना फार जाल्या. खडो महादेव व आबाजी पळसीकर यांनीं आज्ञेप्रमाणें, उजूर न करिता, चिठ्या लिहून दिल्या. पाच पन्नास लाखांचा तोदा करून वसुलास गुलाबीखा निसबत मीरखा सरकारपैकीं दयाराम जमादार, याजला ठेऊन, व बाड महेश्वरीं विठोबाचे देवालयापुढील बगल्यांत ठेऊन जातीनें इंदूर मुक्कामीं फौजेंत आले. लोकास दम दिल्हा पाच पंचवीस लाख रुपये तयार केले आहेत वसुलास गुलाबीखा व दयाराम जमादार ठेविले आहेत. दो चौ महिन्यात ऐवज वसूल होतो तोपर्यंत आपण रजवाड्याकडून घास दाणा करू.

( १०० ) अशा हमराईनें इदूर मुक्कामींहून कूच केले. ते तलाबे करून पिंपळोद्यास आले तो शामराव माहडीक केवळ प्रायोपवेशनी यानीं अडचणींचा प्रसग पाहून मागे बाळोजी इगळे पचवीस हजार फौज व पाच पलटणें घेऊन होतेच यास्तव माहडीक तसेच पालखींत घालून बनाता गुडाळून बाहेर काढिले. वाटेतच त्याचा प्राण गेला मुक्कामी जाऊन दहन करून प्रात काळीं कूच करून प्रतापगडावरून मेवाडात होऊन पुष्कराचे स्थान बुदीकोटे एकीकडे सोडून सिऊर आष्टयाचे सुमारे हांर्दे हाड्याचे घाटे उतरून नेमाडात येऊन महेश्वरीं ( आले ) तेथेंही दम न खाता भारमल होळकर जावडाचावडीच्या मुक्कामीं भेटून, मनात विचार केला, याजला देशाचे मोहिमीस जाणे, काशीराव तेथे राहिल्यास आपले जिवास घोर केला, तसे याचेबराबर रवाना करावें. काशीराव होळकर याच्या कड्या विकड्या आचार विचाराच्या गोष्टी सागितल्या. तो पावेतो काशीरायाविशीं महाराजांच्या मनात विकल्प नव्हता. भारमल्लाच्या गोष्टी ऐकून मनात विकल्पाचे पर्वत येऊन उष्ण काळाचे दिवस, मेवाडचा उबाळा, काशीराव होळकर याचा पुत्र लहान, हें काहीं न पाहता बोलावयास कोणी नाहीं, दाबून बोलावयाजोगें मनुष्य पाडुरंग शकर त्याचाही काळ महेश्वरी जाला, चिमणाजी कृष्ण याजला पाठवून तेच दिवशीं महेश्वरींहून जावडाचावडीस खरगोणेस ( आले. ) तेथें बपू व नागो जियाजी फौजसुद्धा धारेचे जिल्ह्यात होते त्याजला आणावयास कोण पाठवावे, ते

(९९) आज्ञेस उजूर – अमुक इतका पैसा द्या, असा जो हुकूम फर्मावण्यांत आला त्याप्रमाणें वागण्यास केलेली दिरगाई. तोदा – Compromise, adjustment, settlement ( wilson ) **दम देणें** – धीर देणें, आश्वासन देणें.

( १०० ) **तलाबे** – तलावे तर नव्हे? **तलावा** – टेहळणी, ज्याच्यावर स्वारी करावयाची त्या ठिकाणाची किंवा मुलखाची टेहळणी. **प्रायोपवेशनीं** – मरणोन्मुख. **तसे** – म्हणून. **कड्या विकड्या** – वेड्यावाकड्या, अनर्गल. **विकल्पाचे पर्वत येऊन** – अतिशय सशय उत्पन्न होऊन. **उबाळा** – उन्हाळा, उष्मा.

नर्मदा उतरले म्हणजे आपण घांट उतरावयाकरिता मुक्काम होते ते नर्मदा उतरल्यावर हे कूच करून सेदव्यानजीक मुक्काम केला. खरगोणचे मुक्कामीं खबर पडल्यावर काशीराव होळकर यानीं भिकाजी होळकर सेदव्यात होते त्याशीं संधान बांधून सेदव्यानजीक मुक्कामींहून निघून सेदव्यास गेले. हें वर्तमान कळल्यावर उपलाणी घोडयावर बसून तेथे आले. जामदारखाना साभाळावा तों दो लक्षाचें कापड हातीं लागलें. बाकी त्याचेबराबर मडळीं होती ती मल्हारराव रामचंद्र फडणीस आदी करून त्यास बोलावून विचारलें कीं, बाळासाहेब कसे गेले ? मंडळीने उत्तर केलें कीं, आम्हास ठाऊक नाहीं आपण आला तेव्हा ( तेव्हांच ) समजलें मग बोलले कीं, " त्याच्या करण्याच्या चाली माझ्या ध्यानात आहेत. त्यानीं केलें ते उत्तमच केले. माझे प्रालब्ध माझेबराबरच आहे तुम्हास जावयाचें कीं राहावयाचें ? राहावयाचे असल्यास येथें बाळासाहेबावेगळें काय आहे ? परंतु गाड घोडयाची मेहनत, डोकें हातावर, मिळेल ते दिवशीं खावें, नाहीं ते दिवशीं उपास करावा, हें तुमच्यानें होणार नाहीं. लेकरें आहात बाळासाहेब दौलतीचे मालक. तुम्ही दरबारचे मालक तुम्हीं त्याजपाशींच असावें तुमचीच मडळीं मजबराबर आहे. जी माझी गत तीच त्याची गत. चागले झाल्यास तुमचेच आहेत, वाईट झाल्यास तुमचे तुम्ही कायमच आहा. दौलत साभाळालच." यानीं उत्तर केलें, आज्ञा होईल तसें करू. असें बोलून गोटात आले मल्हारराव रामचद्र आपले राहुटीस गेले. बाळाजी कृष्ण याजकडून महाराजाबराबर होते त्याचेही मानस असें आलें कीं, काशीराव होळकर मालक याजपाशीं आपण असावे. तेव्हा आग्रह करून अर्थ नाहीं मग कूच होऊन घाट उतरावयास गेले ते समयीं फडाणिसासह कारकून मंडळी हजर जाली. विनती केली कीं, आम्हास आज्ञा काय आहे ? महाराजानीं श्रवण करून साहेब नौबत-शिक्के-कटार बिछीना व आंगावरील पोषाक राहिला

(१००) उपलाणी – खोगीर वगैरेहि न घालता. भावार्थ अत्यंत त्वरेनें. **करण्याच्या चाली** – कपटी वर्तणूक. **येथें बाळासाहेबावेगळे काय आहे** – बाळासाहेबासारखेंच आहे. त्यानीं चालविलें तसेच तुमचे मी चालवीन. **गाड घोड्याची मेहनत इ०** – माझ्याबरोबर सड्या स्वारींत धावण्याची सारखी मेहनत तुम्हास पडेल. घोड्याचा खरारा स्वतः करावा लागेल ( मोतत्दार किंवा महारपोरगा शिलेदाराबरोबर सड्या स्वारींत असत नाही. ) हाताची उशी करून त्यावर झोपण्याची पाळी येईल. **तुम्ही दरबारचे मालक** – तुम्ही लढाऊ लोक नव्हेत. दरबारांत मुत्सद्याचीं कामें करणारे बिनलढाऊ लोक. **लेकरे आहात** – लढाईच्या मामल्याला अज्ञान आहात. **बिछीना** – बिछोना तर नव्हे. **बिछोना**–बिछाना.

होता तो याचेबरोबर इतका सरंजाम देऊन पन्नास स्वार दिल्हे. किल्यापासून पांच कोशावर यांजला सोडून माघारे यावे असे सांगून रवाना करून आपण घांट उतरावयास गेले. व लष्करात धारण रुपयाचे दोन शेर पीठ, खर्चाची अडचण रहात चालली. तथापि हिंमतीचा पुरुष, भाग्यशाली. घांट उतरून थालनेर महाल बमय किल्ला भिकाजी होळकरास जहागीर ( होता ) तीन दिवसात किल्ला खाली करून घेऊन, दरकूच जाऊन जामपूर मोराण्यास छावणी केली. तेथें कपू व नागो जिवाजी येऊन सामल जहाले. तेथील मुक्कामीहून भाद्रपदमासें सन १२१२ ते सालीं कूच करून जनस्थानास वद्य एकादशीस स्वारी दाखल जाली तेथून बाडाबरोबर सरमजाम देऊन चादवडास रवाना केले. काशीराव होळकरास भेटून इंदूर मुक्कामीं फौजेंत जावयाचे समयीं फत्तेसिंगराव माने याजबरोबर फौज व महाराज कपू फुलण ( साहेबाचा ) कपू देऊन देशास रवाना करून, समागमे रामराव आबाजी पळशीकर याजकडे पैका ठरला होता तो वसूल करावा सबब बरोबर दिल्हा. खंडो महादेव व सखाराम जगजीवन व मल्हार दाजी निसबत दादाजी गगाधर हे दरकूच गाळण्याचे किल्ल्यात टाकिले. माने खानदेशात उतरल्यावर श्रीमताकडील सुभा धोंडोपत गोडबोले दहा हजार फौज व पन्नास तोफा होत्या त्याची व मान्याची लढाई होऊन धोंडोपत लुटून घेतले. ते पुढे मोहऱ्यावर होतेच गणपत नारायण दिवाण हे काशिराव होळकराकडून फौज घेऊन खानदेशात होते त्याजबराबर सरमजाम बगस पठाण व हयाद अलीखा व आचमसिंग पुरवय्या, दोन बेडे तीन हजार स्वाराचे, बाकी किरकोळ सिलेदार पागा हे फौजेत फौज मिळवून उभयता बेडेवाल्याची खातरतसलीम करून साहेब नौबद देऊन हमराहा केला. गणपतराव नारायण दिवाण याजकडून कारकून दिवाणागिरीचे काम करीतच होते, त्या कामावर ते मालक ठेऊन त्याजकडे सोप झाली मग जनस्थानी चार रुपये घेऊन, दरकूच आळेखिंडीस आले

( १०१ ) इकडे यशवंतराव होळकर घाट उतरल्यावर श्रीमतास मसलत पडून श्रीमतानीं शिंदे यासी लिहिलें त्याजवरून त्यांनीं सदाशिवराव सुभे पन्नास हजार फौज व एक कंपू समागमें देऊन पुण्यास रवाना केले होते, ते त्याचे अगोदर पुण्यास दाखल झाले होते. महाराज आळेखिंडीस जाऊन, मीरखा नबाब काहीं सरजाम घेऊन, जुन्नराकडे गेले. तिकडे शिंद्याकडील फौज पलटणें होतीं. लढाई

(१००) व – हा शब्द येथें निरर्थक आहे. बमय किल्ला – किल्ल्यासह. जनस्थान – नाशिक. बेडा – बेहडा, दस्ता. ते – यशवंतराव.

( १०१ ) मसलत पडणें – संकट उभे रहाणें. सुभा – सेनापति.

होऊन नबाब स्वारीचा रोख धरून आळेखिंडीस आले. सोबत्याकडील फौज पाठलाग करून खिंडीवर आले. इकडून महाराज सडा सरमजाम घेऊन त्यांचे मुकाबल्यास आले. आश्वीन शुध्द ८ मीस लढाई झाली. पलटणें मागें हटलीं. स्वारीचा कूच होऊन जेजोरीस आले. देवदर्शन होऊन पुण्यानजीक वानवडीचे अलीकडे पाच कोस हडपसरावर फौजेचा मुक्काम झाला. कपू दोन कोश पुढें वाढवून राहिले. श्रीमतापाशीं वकील पाराशर दादाजी व गोपाळराव गानू खासगीवाले होते. पेशजी जामपूर मोराण्याचे मुक्कामीं स्वारी असता श्रीमंताकडील वकील बोलण्यास आले होते. त्यात हासल, तुम्ही सरकार पदरचे सरदार, व तुमचे वडिलावडिलीं दौलतीस जपणे कसे हें माहीत असता तुम्ही लाखो फौजा घेऊन स्वदेश खानदेशात श्रीमताचे महालापासून लाखो रुपये घेऊन लुटीत जाळीत ( आला ) यातील अर्थ काय ? तुमचा मनोधर्म समजला पाहिजे यापूर्वी सवाई मल्हारराव मारले गेल्यावर यशवतराव नागपुराकडे गेले. विठोजी होळकर पंढरपुराकडे गेले. त्यानीं काही जमियत करून दगा आरंभिला. तो पुण्यास कारभारी बाळोजी कुंजीर होते त्यानीं फौज पाठवून विठोजी होळकर याजला हस्तगत करून पुणे मुक्कामीं आणून हत्तीचे पायीं मारून टाकिले. हा द्वेष महाराजाचे मनात मग जामपूर मोराण्याचे मुक्कामी सदहू अन्वये प्रश्न केल्यावर यानीं उत्तर केले कीं, "श्रीमंत आमचे धणी, इष्ट आराध्य. आम्ही सेवक लोक चाकरी झाली न झाली हें कैलासवासी वडिलांस ठाऊक व श्रीमताचे ध्यानात. परतु आमचे ऐकिण्यात कैलासवासी खंडेराव होळकर व मालराव व सवाई मल्हारराव होळकर आम्हां पावेतो कसकशा अनावळ्या श्रीमताच्या राज्यात केल्या कीं, ज्यात लाखों रुपये नुकसान व स्वाधिन होण्यास फौज खर्चीं लाखोंच लागले. परतु हस्तगत केल्यावर अवघ्या गोष्टींचा बंदोबस्त करून हजारो रुपये सरबरा खर्चीं देऊन जेथील तेथे पावतेच करीत आले विठोजी होळकर याजकडून स्वामींची अवज्ञा अथवा अरावळी तादृश केली नव्हती तथापि वाळकाचे चोरीस बुक्याचा मार. आपण धनी, पदरचे माणसास अमार्गाचे मार्गास लावावे यास्तव शिक्षा अन्यायासारखी क्रोध वश्य ? आपले मनांत आलें. यशहो आलें असता आमचे भाऊ बराबरीचे शिंदे, विंचूरकर, नारो शकर वगैरे बरोबरीचे त्यावरही प्रसग पडले तेथें मल्हारजी होळकर, तुकोजी होळकर

(१०१) **सोबती** – शिंदे. **त्यांत हासल** – त्यातील मतलब असा. **अनावळ्या** – वाचनाची चूक. 'आरावळ्या' असें पाहिजे. मूळ शब्द आरवली किंवा आरावली असा आहे. **आरवली** – खोडी, दांडगाई. **वाळकाचे चोरीस बुक्याचा मार** – वाळक, वाळूक – काकडी. भावार्थ क्षुल्लक अपराधास भलतीच मोठी शिक्षा.

यांनीं अन्यायाचें माफक करून घेतलें. वाजता वारा लागूं दिला नाहीं. श्रीमतही मान्य करीतच आले. आमचे प्रसंगीं आमचे भाऊ दालीबद लहान मोठे एकानेंही रदबदली न करितां रंगांत रंग मिळविला व स्वामींनींही आदि पश्चात् विचार न पाहतां बाळकाचे चोरीवर प्राण घेतला. त्यास एक्या खेड्यांत पाटील तरी गांवचा जमीनदार असतो, परतु असामी, पाच पचवीस बिघ्याचा खेडू त्याजवर जोर-जुलूम जाहला असता बेरोम होऊन गाव जाळीत असतो, त्याचेंही समाधान करून झाल्या गोष्टीचा बदोबस्त होऊन जमिनीवर कायम करावा लागतो तेव्हा आम्ही लहान मोठे आपले पायापाशीं उभे राहणार, आमचे समाधान, शातवन खावंदानीं व बराबरीचे भाऊ यांनीं काय केलें ? असे बोलणें पडल्यावर ( पेशव्याचे वकील ) कायल होऊन आज्ञा घेऊन गेले.

( १०२ ) मग महाराज सदरीं लिहिल्याअन्वये बाड चांदवडास ठेवून सडे हडपसर पावेतों आले. नतर पाराजीपतबाबास पत्रे गेलीं श्रीमतास विनती करावी कीं, “ आम्हीं सरकार पदरचे, साहेब चाकरीस काया-वाचे मनःपूर्वक हजर. स्वामींचें दर्शन घेऊन बधूचा अंदेशा व फौजा बाळगून परिश्रम करून करोडो रुपये देण्याचे पेंचांत ( आलो ) इत्यादि मुखेकडून गिरासीनें हे स्वामींचे चरणीं समर्पक करून, दुःखापासून वेगळे होऊन आज्ञा होईल ती चाकरी बजावूं स्वामींचे पायाशीं दुसरा अर्थ काहीं एक नाहीं आम्हीं उभयता शिंदे, होळकर आमचीं जीं वाकडीं असतील तीं आपसात समजून तमाशा आपण पाहवा. ” या भावीं बोलणीं

---

**(१०१) अन्यायाचे माफक करून घेतले** – अन्याय माफ केले **दालीबंद** – दाली – तरवार अडकवण्याचा पट्टा त्यावरून भावार्थ तलवारबहाद्दर **रगात रंग मिळविला** – श्रीमताची मर्जी पाहून त्याप्रमाणें होस हो केलें **पाच पंचवीस बिघ्याचा खेडू** – पाच पचवीस बिघे जमीन कसणारा कुणबी. **कुणबी** – शेतकरी. **जोरजुलूम** – जुलूम. **बेरोम** – मूळ शब्द ‘ बेहरम ’ रुष्ट किंवा साशक. **कायल** – निरुत्तर.

**( १०२ ) घेऊन** – घेऊ. **बंधुचा आन्देशा** – बधूला मारले तसे मला माराल कीं काय हा सशय मनांत येतो **आन्देशा** – दुःख असाहि अथ होईल. **बाळगून** – बाळगल्या. **करून** – केलें. **इत्यादि मुखे कडून गिरासीनें हे** – भावार्थ श्रीमतास कळवावें कीं, आम्ही तुमचे चाकरच आहों निष्ठापूर्वक चाकरी करू स्वामीचें दर्शन घ्यावें ही इच्छा आहे. व बधूच्या नाशाबद्दलचें दुःख निवेदन करावयाचें आहे. आम्ही फौजा पदरीं बाळगल्यामुळें आम्हास करोडो रुपये कर्ज झालें आहे. ते श्रीमतानीं फेडावें म्हणजे पुन्हा निष्काळजी होऊन चाकरी बजावू.

उभयतां बोलले. परंतु श्रीमंतास कांहीं एक विश्वास न पटतां श्रीमंतांनीं सरंजाम सदाशिवरात्र शिंद्यांकडील व सरकारचे विंचूरकर वगैरे फौज वानवडीस आली. इकडील कपू पुढें होतेच. फत्तेसिंगराव माने फौज वंपूमुद्धा बरोलीस होते. त्यांनीं त्याचे मुकाबल्यास जरीपटका व मानकरी पुरधऱ्याचे बरोबर देऊन रवाना केले होते. त्याची लढाई होऊन जरीपटका पुरधरे सांपडले नाहींत. बाकी तोफा आणून फौज लुटून घेतली. मालोजीराव घोरपडे पाडाव करून आणले. फत्तेसिंगानें घोरपड्याची उजूतवाजू उत्तम प्रकारची टेवून जखमाचा जावता करून वस्त्रें देऊन रवाना केले. माने फौजसुद्धा बरोबरच होते त्रयोदशीस रात्रौ लढाई नक्षा झाला

( १०३ ) पुढे तिन्ही कपूची लायन. कपू शेजारी फत्तेसिंग माने. उजवे बाजूस मीरखान बाबा मागे कपूचे पाठीवर महाराज हुजुरात शिलेदार घेऊन उभे. चतुर्दशीस सूर्योदयीं लढाई सुरू जाहली. तोफा चालू जाहल्या. शिंद्याकडील पलटणचा मार जबर पडला फौज थिजली. हें पाहून, महाराज हुशार होऊन, कपू मागें टाकून हुजुरात घेऊन घोडे तोफावर घातले. महाराज उठले पाहून मागें डांव बाजूस माने होते त्यांनींही अनीना उचलल्या. इकडील फौज मीरखान होता त्याजवर ( शिंद्यानीं ) चाल केली तों महाराजानीं तोफाखाना घेऊन शिंद्याची फौज मीरखानावर उठली तिच्या पिछाकडून घोडे घातले. दुरोख अडचण पडल्यामुळें फौज लुटून घेतली. इकडे माने उठले होते त्याचा मुकाबला विंचूरकर यानी चांगला केला. परंतु अवध्या फौजेचा मार झाला तेव्हा त्यानीं हवा पाहून एकीकडे जहाले. श्रीमंताकडील जरीपटका घाशीरामाचे तलावावर उभा होता तो पळून शहरात गेला. तोफा जाऊ पावल्या नाहींत. शिंद्याचे तोफखान्यावर महाराजानीं घोडे घातले तेथें छेऱ्याच्या जखमा झाल्या. लढाई फत्ते झाली. श्रीमत माघारीं पर्वतीस गेले. सदाशिवराव परभारें निघोन ( त्यानीं ) नगरचा किल्ला नजीक केला. श्रीमत पर्वतीस एक घटका ठरून, धीर न निघे तेव्हा निघोन लोहगडाखालीं होऊन महाडास गेले. फत्तेसिंग माने व बाळाजी कृष्ण निसबत फडणीस उभयता श्रीमंताचे मागें पाठविले कीं, आपण जाऊं नये, पुण्यास यावें, यास्तव परंतु त्याणीं यांशीं गांठ पडे

(१०२) **बरोलीस** – बारामतीस असें पाहिजे. कदाचित् हे 'बारशीस' या मोडीशब्दाचें अशुद्ध वाचनहि असू शकेल. **उजूतवाजू ठेवणें** – मानमर्यादा, बडदास्त, प्रार्थना, समाचार घेणें. **जखमाचा जाबता करून** – जखमा वगैरे बांधवून.

( १०३ ) **अनीन उचलणे** – घोड्यास दवडण्याचा इशारा करणें. **अनीन** – लगाम. **पिछा कडून** – पाठीमागून, पिछाडीकडून. **हवा पाहून** – रागरंग पाहून. **जखमा आल्या** – जखमा झाल्या.

न देता निघून गेले. तेही माघारे आले. मग फत्तेसिंगराव माने आपले फौजेसुद्धां पंढरपुराकडे रवाना करून आपण फौजसुद्धां पुण्यावर मुक्काम करून राहिले. मग जुन्नराहून अमृतरावसाहेब येऊन बाबासाहेब फडके व मोरोबा फडणीस असे तीन चार महिने पुण्यावरच होते. काहीं राजकारण करावें असा बेत, परतु श्रीमंतांनीं कंपनीसाहेब याचा आश्रय करून वसलीसाहेब पलटणें घेऊन पुण्याचे सुमारास आले.

( १०४ ) मग यशवंतराव होळकर यानीं मनसोबाचें धोरण पाहून, अमृतराव साहेब वगैरे राजकारण तेथील तेथें सोडून, झाडून कूच करून फाल्गुन शुद्ध ४ स श्रीजेजोरीस जाऊन, श्रीमार्तंडाचें दर्शन घेऊन पारनेरचे मार्गें सगमनेरावरून बेलापूरचे मार्गें पुणताब्यास आले तेथे आठ पधरा मुक्काम होऊन औरंगाबादेस आले. मागे फत्तेसिंग माने फितुरांत येऊन, सरकारचे दरखदार कारकून होते ते कैद करून, फौज श्रीमताकडे घेऊन जाऊ अशा विचारात, सरकारातून फौजा दरोबस्त कहाडण्याकरिता कृष्णाजी लक्ष्मण माने यास आणावयास पाठविलें. त्याजलाही अटकेंत ठेविलें. हे वर्तमान माने याचेबराबर स्वारींत पठाणाचे स्वार दाहा एक्यापैकीं होते त्याजला समजून त्यानीं आपसात विचार केला कीं, हवा बदलून माघारा मान्या चालला आहे. आपले बेड्यांत गेल्यावर मुस्तकीम होऊन आपला बस राहणार नाहीं. ते पक्षीं त्या ठिकाणींच याजला बसात आणून कैद करावा आणि महाराजापाशीं घेऊन जावें. यासाठीं घडेल तसें घडो. असें बोलून मान्याची पालखी घेरली. मान्या निजला होता दहाजणानीं घोडे सोडून भोयांचे खाद्यावरून पालखी उतरून कटीरा लावून बसले त्याचे बेड्यापैकीं कोणीच नव्हते, यानीं याजला घेऊन सरकारी सरमजाम मराठे पागा पठाण वगैरे एकत्र करून हुशार केले. हें वर्तमान मान्याचे खासगत बेडेवाले कृष्णाजी लक्ष्मण व रावजी त्रिंबक याजला घेऊन चालले होते त्याजला हे वर्तमान समजल्यावर उभयतांस सोडून देऊन, मान्याची आशा सोडून, आपण निघून गेले. उभयता ब्राम्हण जाब त्याबरोबर नाहींत. तथापि धण्याचें नाव घेऊन चालले. मार्गांत दहापाच एक दोन असे स्वार लुगारीचे भेटत गेले. तेच बराबर घेऊन, जमाव करून दिवस रात्र चालून मान्यास मिळविलें. मग फौजेची दिलजमाई करून, मान्याचे पायात

---

(१०३) करून – केला.

( १०४ ) एक्या पैकीं – कुटांतले, विश्वासांतले. हवा बदलून – फितूर होऊन. बसात आणून – आवाक्यांत आणून. उभयता ब्राह्मण – उभयतां कारभारी. जाबता – सैन्य, टोळी. लुगारीचे – लुटालूट करणारे.

बेडया घालून, पालखींत टाकून औरंगाबादचे मैदानांत महाराजास सामल जाले. असेच मीरखा पंढरपुराकडे होता तो लुटीचे चालचीवर राहिला होता. पत्रें निकडीचीं गेलीं असतां त्याचें येणें न होय मग तात्या आळेकर याजला आणावयास रवाना केलें. कारण दुधानें पोळलेल्यावर ताक फुंकणें प्राप्त. मान्या मराठा, त्याजपासून हरामखोरी जाली तेव्हां याचा भरवसा तो काय ? त्यामुळें पत मशारनिले पाठवून त्याजला घेऊन आले मागील प्रकार ( नि ) घोर जाल्यावर अवरगाबादेपासून चार रुपये घेऊन फौजेसुद्धा कूच करून वेरुळाजवळ त्रिंबकेश्वरी आले. पुढें घोडपेचे मार्गें चादवडास येऊन बाड बराबर घेऊन कोपरेलीस तापीतीरीं आले पुणें मुक्कामीं भोंसल्याकडील वकील आले होते ते निरोप घेऊन नागपुरास जाते-समयीं बोलण्यात आले की, खडेराव होळकर बाया वगैरे मल्हार शामजीसुद्धा दौलतराव शिंदे याजपाशी आहेत ते तुमचे तुम्हाकडे पाठवून तुमचा त्याचा वडिलोपार्जित स्नेह चालत आला तसा सलोका करून देऊ ते नागपुरास गेले. भोंसले सरमजामसुद्धा वऱ्हाड प्राती येऊन शिंदे ( व ) ते एके ठिकाणीं होते. त्या प्रसंगीं बोलण्याचे भाव शिंद्यास दर्शवून नमूदास आणून महाराजास पत्रे पाठविलीं कीं, शिंदे याशीं बोलून मजकूर नमूदास आणिला आहे. आपल्याकडील मुखत्यार बोलणार पाठवून द्यावा. त्याचें उत्तर लिहिलें की, " शिंदे आम्ही भाऊ. त्यांचा आमचा सलूख तो काय ? सलुख्याचे चालीची निदर्शनें होत गेलीं म्हणजे सलूख अर्थात् आहे. आमचें खटलें आम्हापाशीं आले म्हणजे सहजच सलूख बाकी मूल येथें आलें अथवा तेथ असले सारखेंच आपण लिहिलें ते पक्षी सदहू अन्वये व्यवहार झाल्यानतर कोणास पाठविणे ते पाठवून देऊ " नतर जाताच शिंदे व भोंसले यांजवर वसलीसाहेब अमृतरावसाहेब घेऊन मुकाबल्यास आले. तेव्हा मसलत गालब झाली यास्तव समेट होऊन एकदिली त्रिवर्गाची झालीयावर कठीण पडावयाचें नाहीं या धोरणावर खडेराव होळकर खटल्यासुध्दा शिंदे यानीं रवाना केले. ते नजीक खरगोण सन १२१३ चे सालीं येऊन दाखल जहाले. शिंदे आपण एकत्र होऊन पलटणें काढून टाकावीं ही गोष्ट कारभारी खंडो महादेव बाळाजी कृष्ण सर्वांचे मनास आली. महाराजांचा रुकार पडेना. मग सर्वांनीं हरनाथ याजला पुढें करून महाराजापाशीं बोलाविलें कीं, शिंदे भोंसले आपण एकत्र होऊन मसलत उचलली असता आपलें नुकसान तें काय ? याभावीं मनसोब्याचें धोरण

(१०४) चालची – लालूच. आमचे खटले – होळकरांचा वारस असलेला मुलगा जो शिंद्यानें स्वतःजवळ ठेवला होता तो. मसलत गालब झाली – गभीर परिस्थिति निर्माण झाली

धरून बहुत्ता प्रकारीं बोलला. खाशांनीं उत्तर केलें कीं, " तुजला वाटतें दौलत मी चालवितों, माझ्या भरवशावर महाराज स्वस्थ आहेत. परंतु हरनाथ एक आणि एकुणपन्नास हरनाथाची करामत मी खेळवून तुझा पल्ला राखितों. तुझे भरंवशावर मी आहे ( ही ) गुमराई एकरूप मनात न आणिता सागितलें तितकें काम करून असावें. इतःपर बोललास तर कामास पडणार नाहीं." तेव्हां त्यासी असें जालें कीं, मी याचा वेगळा कसा होऊं. तात्पर्य नासो कीं सुधरो वडिलाचे हातची माणसें होतीं. कोणाचेही माथां भार न करिता सागितलें काम ज्याचे त्याचे हातें घेऊन इतिकर्तव्यता आपली आपण करावी, भरवसा व विश्वास आपला आपल्यास. अशा धोरणावर प्रवृत्ति होती.

( १०५ ) खडेराव होळकर खटल्यासुद्धा दाखल झाल्यावर पूर्व भाषणाचें निदर्शनार्थ मल्हार शामजी व माधवराव गोविंद आळेकर या उभयताची रवानगी शिंद्याकडे केली. आपण कूच करून भाद्रपद शुद्ध १४ स फौज नर्मदेचा घाट उतरून उत्तर तीरास मुक्काम जाला. जातीनें खासा स्वारी महेश्वरीं येऊन आठ दिवस मुक्काम होऊन कुटुंबासुद्धा कूच जहालें. ते उज्जनीनजीक दसरा करून मंदोसरावरून मेवाडात शहापुरास स्वारी आली. दिपवाळी तेथें करून पुढें कूच होऊन फाल्गुनअखेर अजमिरावरून हरमाडास आले. तों दिल्लीहून पलटणें आलीं. हरमाड मुक्कामीं काहीं कहीशीं गाठ पडली. कुटुंबें बरोबर यास्तव जोधपूरचे राजाशीं संधान लावून, त्याचीं पत्रें आणून, तेथून कारकून पाठवून, बाड जोधपुरीं ठेवावें हा बेत करून, पुष्करास येऊन, खटलें खडेराव होळकरसुद्धा काहीं सरमजाम देऊन जोधपुरास रवाना केलें. आपण सडी स्वारी करून हाडोतींतून गंगराडेवरून मंदोसरास ज्येष्ठमासीं अखेरसालीं आले. तेथें एक महिना मुक्काम ( झाला. ) फिरंगी याजकडील पलटणें हरमाडयाचे आसपासून गेलीं तीं नीट कोट्यास गेलीं. कोटेवाल्याची फौज व बापू शिंदे बराबर घेऊन दऱ्याचे मार्गानें उतरून, रामपुरा व हिंगळाजगडाखालीं वगैरे जप्ता बसवून गरोठेनजीक आले. हें वर्तमान मंदोसर मुक्कामीं समजतांच तेथें लोकांची दिलजमाई करून ज्येष्ठ वद्य अमावास्याचे दिवशीं पलटणावर चाल केली. अंतुरचे घाटे चर्मवती उतरून सडा घोडा राऊत ऐशीं हजार स्वाराच्या भरंवशावर तवातोबरा बांधून अग्नीचा कल्होळ असा येऊन गरोठेहून दोन कोसावर मुकाबला जाला. लढाई फार मातबर जाली. फिरंगी लढाई हरून मुकुंददऱ्याचे मार्गें निघाला. कोटेवाल्याची सरमजामाचीं माणसें फार करून कामास

---

(१०४) गुमराई – गर्व. एकरूप – बिलकूल.

( १०५ ) चर्मवाति – चर्मण्वति.

बरकुंम सरदार धरला. एक फिरंगी खासा मुकत्यार बासंत आलीखां बंगस यानें घोडा उठवून हत्तीवर मारला. वरकड गोरे व पलटणें, तोफा, डेरे अथील तेथें राहून सडे निघाले. कोटेवाल्यानीं फिरंग्यास नाव देऊन चर्मण्वती पार उतरून दिल्हे. व मागाहून सडी स्वारी कोट्यास दाखल झाली. कोटेवाल्यावर महाराजांचा दांत कारण फिरंग्यास सामल होऊन त्याजला काढून दिल्हे. आम्हांस मुकुंद-दऱ्याचा दरवाजा लावून अटकाविलें. यावरून कोटे खोदून चमेलींत टाकावें हा ईरादा. परतु मसलतीचें धोरण सोडून इकडे गुंतल्यास फिरंग्यास सोहोलत पडेल, यास्तव कोटेवाल्याचा अन्याय पदरीं त्याचे घालून, काहीं पैका घेऊन चर्मण्वती उतरले. तों बाजीराव बापूजी पदरचे शिलकी चाकर इंद्रगडी होते. लाखेरीचे डोंगराचे माहीतगार. त्यानें सरकार चाकरीवर लक्ष देऊन, भिल्ल जमा करून, जागजागीं नाकीं बांधून पलटणें फार करून लुटून घ्यावी, ( असें केलें ) आगरखे व बंदुका गाडयावर घालून आणले. बुदीचे आसपास महाराजांस येऊन भेटला. मर्जी बहुतच प्रसन्न होऊन टोंक, रामपुरा, लाखेरी वगैरे मामले सांगितले. यांजकडे फिरंग्याशीं गांठ बनास नदीवर श्रावण वद्य ४ स घालून झटपट तेथें बरीच जाली. माणसें किती मारलीं किती नदींत उडया घालून गेले, त्याजवर घोडे घालून पाण्यांत मारले त्या लढाईंत सरशी इंग्रजांचीच झाली. इकडील कंपूचा मालक माणकसिंग मारला जाऊन, तोफा त्यांनीं घेतल्या होत्या परतु महाराज भाग्यवान्, व पराक्रमाची पराकाष्ठा, जातीनें तोफेवर येऊन, छेरे भरून, तोफा आपण चालवून शेकडों माणसें मारलीं नंतर घोडयावर आपण स्वार ( होऊन ) घोडे घातले. याप्रमाणें तीही लढाई फत्ते करून पिच्छावर चालले. नदीस पाणी यामुळें तोफा उतरू पावल्या नाहींत. सडा घोडा राऊत उतरून पाठलाग करून कंपू मागें टाकले. तोफा पलटणास सावर न फावता किल्ले खुशालगड प्रांत धुंडाड जयपुरवाल्याची जागा त्यांत शिरले. बाहेरून महाराजानीं घेरा घातला फिरंग्यानीं ओझें-पाझें आसबाब होता तो तेथील तेथें टाकून सडे माणूस बुदख घेऊन मागील रात्रीस निघाले. तों मुकाबल्यास चिमणाजी कृष्ण याचें पथक होतें. त्याजवर ताशेरा देऊन बाहेर पडले. ते आग्र्याचे मार्गे गेले. स्वारी महाराजांची श्रावण शु॥

(१०५) सोहोलत पडणें – सवड सांपडणें. शिलकी चाकर – जुने कदीम, विश्वासू चाकर. आगरखे व बंदुका गाड्यावर घालून आणले – इंग्रजांच्या बंदुका व त्यांचे युनिफार्मस् इतके लुटलें कीं, त्यांचे ढीग गाड्यावरून घालून आणावे लागले. सावर – अवसर, अवकाश, आश्रय. आसबाब – सामानसुमान. बुदख – बंदुख असें पाहिजे.

१ स शिकारी फत्तेपुरास दाखल झाले. तेथें कांहीं शरीरास बेआरामी जाहली यांजमुळें आठ रोज मुक्काम जाहला.

( १०६ ) फिरंग्याचीं पलटणें झडत पडत आग्र्यास गेलीं. मुख्य साहेब आग्र्याचे किल्यांत होता. आठ दिवसांचीं सवड पडल्यांत लीकसाहेब कानपूरचे छावणींत जाऊन जमियत करून आग्र्यास आला. महाराज फत्तेपुराहून कूच करून मथुरेस आले. तेथें इंग्रजांकडील सरंमजाम होता तो निघून आग्र्यास गेला. तेथून गणपतराव दिवाण, चिमणाजीपंत भाऊ उभयतां सरमजामसुद्धां आग्र्याचे सुमारास पुढें रवाना केले. त्याजवर लीकसाहेब यांनीं छापा दिल्हा. परंतु हेलपटण्यांत न येतां सांवरून उभे राहिले. हें वर्तमान मथुरेस येतांच खुद्द खाशांचें कूच होऊन आग्र्याकडे येऊन लढाईचा प्रसंग भाद्रपद वद्य ३० स आरंभ जाला. तेथून पलटणें मथुरेचे मुक्कामास आलीं फिरंग्याकडील पलटणें चार छापे आले. परंतु प्रथम छाप्यात महाराजांखालीं घोडे एका मागें तीन पडले. शेवटीं खबुतरासारखा जमिनीवर लुबकला होता परंतु खेत सोडलें नाहीं मग रघोजी होळकर यानें पुढें येऊन आपल्या घोड्यावर महाराजास बसवून जबरदस्तीनें काहाडलें. पुढें छापे आणखीही आले, परंतु याचे हिशेबात आले नाहींत मथुरेचे अलीकडे मुक्काम जाला. पलटणें कूच करून दिल्लीकडे चाललीं. यांनींही पाठलाग केला. मार्गांत लढाई होतच गेली. स्वारी कुतबशाचे कोटानजीक मुक्काम करून सोनपत पानिपतावर मुक्काम केला. पलटणें यमुना उतरून चाललीं. तेव्हां त्यांचे मागें स्वारीचें कूच होऊन शामलीचे गढींत पलटणें गेलीं तेथें मुक्कामास आश्विन वद्य ११ स गेले. लढाया तेथेंही जाल्या. कार्तिक शुद्ध १ स पलटणें निघून पुढें चालले. तेव्हां कूच होऊन कोशीस गेले. तेथें शमरूची बेगम होती. तिजकडे गुलामखांस पाठवून तिचें बोलणें जालें मी सामल होते. तीस हजार रुपये बेगमीनें खर्चास पाठवून आतून फितुर कीं, पलटणें मागून यावी पुढें बेगमीनें आडवें व्हावें. हें समजतांच कहीं गेली होती याजकरितां महिपतराव रामचंद्र याजला पांच हजार घोडा राऊत सरमजाम सडा मुक्कामावर ठेवून कार्तिक शुद्ध ७ स कूच सरकारांनीं केलें. ते मागोमाग पलटणें येऊन दाखल जालीं. महिपतराव रामचंद्र यांची व त्यांचीं पलटणवाल्यांची गाठ पडली. यांनीं पलटणाशीं पेंढारी काव्यानें लांडगेतोड करून दारूगोळा फिरंग्याचा बराच खराब केला. कहीं आली ती सांभाळून महाराजांपाशीं येऊन दाखल जाहले. तेथून सोहरभचे सुमारें हासगनावरून आले. पलटणें

( १०६ ) झडत पडत – पडतझडत, दुर्दशा होऊन. सवड पडल्यांत – सवड सापडून. छापा देणें – छापा घालणें. खेत – रणक्षेत्र

मह्य रामपुऱ्याकडे गेली. यानीं हरनाथास कागद लिहून कंपू दिल्लीस रवाना केला. त्यांनीं दिल्लीस मोर्चे लावून लढाई सुरू केली. तों दिल्लीस आवई कीं, पलटणें येतात. या दबाबानें महाराजाची ताकीद आली कीं, बहुत हुशारी राहून खटला सभाळून असावें. गाफलीनें गळफत्र्यात आल्यास कामीं पडणार नाहीं. हीहानवत रजा जाहल्यावर हरनाथ कोणास न पुसता मोर्च्यावर पलटणें होतीं तीं जेथील तेथें सोडून कंपूचें कूच करून गेले. ज्यास समजलें तो मुकाव्याच त्याचे मागें गेला. शिलेदार वगैरे मोर्च्याचे मदतीचे लोक तेही राहिले. मागील प्रहर रात्र राहता सर्वांस समजलें कीं, हरनाथसिंग कूच करून गेला मोर्च्यांत कपूचे कारकून जगन्नाथ राजाराम व चिमाजी यशवंत व सखाराम सदाशिव होते याजला समजताच विचार पडला मग शिलेदारात गमाजी शिंदे व आणखीही चार नावाचीं माणसे होतीं त्याजपाशीं गेले. विचार पुढें कसा करावा ? मग गमाजी शिंदे यानीं विचार केला कीं, हिंमत धरून गोष्ट सांगितली कीं, नक्षा बदनक्षा याचें पुसणें हरनाथ याजला पुसा. तो न पुसतां मोर्चे सोडून गेला तेव्हा आपण राहिल्यावर दिवस उगवता फिरग्यास समजल्यावर आपल्यास वाचूं कशास देतील ? यास्तव मोर्च्याचे जाल तेथील तेथे ठेवून तबूर वगैरे काहीं एक न वाजविता तोफा काहाडून तुम्हीं कूच करून जावें आम्हीं कंपेश पाच हजार स्वार आहों दिवस उगवल्यावर या शहरचीं माणसें बाहेर निघतील यांची ताब्याताबोटी करून तुमचे मागोमाग येऊं. अशी सल्ला ठरून, पलटणें तोफा मुकाव्यानें काढून, सडा घोडा राऊत राहिला. पलटणें दोन अडीच कोस पोंचले तों सूर्योदय झाला. स्वारानीं बुणगे मोर्च्याचे पलटणाबरोबर ( गेले होतेच, हे ) सडे होतेच हुशार होऊन शहराभोंवते अरावळी आरभिली तों हे बातमी शहरात कळली फौज कूच करून गेली तेव्हा तुरुकस्वार काहीं स्वाराचे मुकाबल्यास आले. त्यांची याचीं झुरमट चागली होऊन शहरात घातले. पाच पन्नास घोडे पाडाव करून आणले. मग तोफा मुकाबल्यास आल्या मग टाळा देऊन पलटणें पिछाडीचा सुमार धरला. व मोरच्याचीं पलटणें व स्वार सरंजाम एकत्र होऊन हरना-

(१०६) **गळफत्र्यांत** – गळपट्ट्यांत म्हणजे गळफासांत, पेचात. **हीहानवत रजा जाहल्यावर** – ‘ही हालवत रजा’ असें पाहिजे. मोडींत न व ल सारखे दिसतात. **हालवंत** – जरबेची किंवा सक्तीची, तांतडीची. **मोर्चाचे जाल** – मोर्चांचें सामानसुमान. **तंबूर** – टॅबूरीन या इंग्लिश शब्दाचा अपभ्रंश. टॅबूरीन म्हणजे ताशा नौबतीसारखें एक वाद्य. हें वाद्य युरोपियन – शिक्षित देशी कवायती कंपूत वापरलें जात असे. **कंपेष** – कमीअधिक. **तांब्याताबोटी करणें** – लुटालूट, तोडातोड करणें. **तुरुक स्वार** – ट्रूपसमधले स्वार. **झुरमठ** – झटापट.

याचा मुक्काम नव कोसांवर झाला होता तेथें सामल झालें. मग फिरत फिरत डिगेस येऊन मुक्काम केला. इकडे सरकारस्वारी सोमेंस येऊन फर्काबादवाले पठाण यांज-कडून महाराजांस दगा करावा हेंही सिद्ध केलें सरकारस्वारी कार्तिक शुद्ध १४ स फर्काबादेस आली. तों पठाणाकडील भले माणूस सामोरे येऊन शहरांत चालावें म्हणून अर्जी बहुत केली त्याजवरून शहराचे दारवाज्यापाशीं आले तों शहरची बळकटीसी ध्यानास आली. चाणाक्षही खराच. दरवाज्यातून फिरोन येऊन बाहेर मुक्काम केला. शहरापासून कोसावर फिरंग्याची छावणी होती ती लुटून जाळगोळ केली. मुक्काम जालियावर नबाबाकडून पाच हजार रुपये मेजवानी व एक हत्ती व पांच घोडे नजर आले. आणि वकिलाचें बोलणें पडलें कीं, उदईक मुक्काम करावा. तीन लक्ष रुपये देतों याप्रमाणें बोलणें लावून तिकडे लीकसाहेबास सूचना केली. सूचना जाताच ते महूहून कूच करून माणसास कोसास रुपया देऊन छापा कार्तिक शुद्ध १५ स सूर्योदयीं घातला. स्वारीचा मुक्काम होता छापा येतांच समजल्यावर कूच जालें. सडे स्वार होते. पलटणें मागेंच होतीं. तींही येऊन पोहोंचलीं. त्या छाप्यांत सरकार फौजेचा खराबा बहुत जाला. फौज निवली. कारण जातीनें मागें राहून पलटणवाल्यावर चार उलटण्या केल्या. यामुळें छापा थोपला जाऊन फौजेस सोहलत निघण्यास पडली. पलटणें व जिनसी हरनाथसिंग घेऊन डिगेस राहिला. मथुरेस पलटणें होतीं त्यानीं आपले कपूंन काहीं फितूर फादडा करून कार्तिक शुद्ध ११ स छापा डिगेस घातला. तोफा तलावाच्या काठीं होत्या त्या पाडाव करून नेल्या शिलेदाराचे खटले डिगेस यामुळें लोक बेदील. खाशाची उमेद कान-पूरची छावणी जाळून कलकत्याचा सुमार धरावा. परतु लोकाचें चेष्टित पाहून उमेदीचा अर्थ एकीकडे ठेवून डिगेस आले. तों इकडे तोफा बरबाद जाल्या. बुणगे डिगेंत, सरकार स्वारी गांवात शिरली तों मागोमाग पलटणें कार्तिक वद्य १४ स आलीं आणि डिगेस मोर्चे लाविले. काहीं फितूरही डिगेंत केला. हें महा-राजांस समजल्यावर फौज बुणग्यासुद्धा बाहेर पडून होते तों यानीं डीग घेतली.

(१०६) येऊन — आले. अर्जी — विनति, विनवणी. कारण — चुकीचें वाचन, बहुधा येथें मुळांत 'आपण' असा शब्द असावा. जिनसी — तोफखाना. फितूर फादडा — फितवा. शिलेदाराचे खटले डिगेस यामुळें लोक बेदिल — यशवतरावाच्या सैन्याचें कुटुबकबिले डिगेंत आश्रयास होते. तेथेंच इग्रजाचा छापा पडल्यामुळें यशवतरावाचे शिलेदार बेदिल झाले. व त्याच्या इच्छेप्रमाणें कानपूरच्या इग्रज छावणीवर हल्ला करून जाण्यास नाखूष झाले. चेष्टित — वर्तणूक. अर्थात येथें नाखुषी. बाहेर पडून होते तो — बाहेर पडत आहेत तोंच.

महाराज कूच करून कुंभेरीहून बिगटला तों अकस्मात राजे कूच करून कुंभेरीस आले. मागें पलटणाचा रूख भरतपुराकडे जाला. तेव्हां रणजितसिंग जाट याचें बोलणें लागलें कीं, तुम्हीं मदत असावें. चार रुपये खर्चास देऊं. याप्रमाणें ठरलें. मग महाराज कूच करून शहराबाहेर पडले. पलटणवाल्यांनीं शहरास मोर्चे लाविले. मार्गशीर्ष वद्य पक्षीं लढाई सुरू जाली. बाहेरून महाराज आतून जाट. पांच महिने लढाई जाली.

( १०७ ) त्यात कौतुक एके दिवशीं जालें त्यात महाराजानीं शहरात स्वस्थ निद्रा केली ( होती. ) दोन प्रहरची वेळ. त्या समयीं फिरंग्यांनीं हल्ला केला. जाट आपलाले मोर्चावर सावधच होते फौज महाराजाची मुक्कामावर जेथील तेथें हल्ला येऊन बिगटला. तों अकस्मात गैबी फौज, दिसण्यात महाराज, राणोराण फौजच फौज होऊन हल्यातील एक माणूस जाऊ पावले नाहीं. किल्यातून जाट आपले डोळ्यांनीं पहातात. महाराज उलटून उलटून बासडे करितात. किल्यावरून जाट ( व ) फिरंग्याचे लोक बोलतात कीं, " वाहवारे महाराज ! खूब बासडे लगाता है " ऐसें वर्णन अवघे ऐकितात. पहातात. ही गुल महाराज होते तेथवर आली. तेव्हां जवळ बसणार कृष्णाजी लक्ष्मण व बाळाजी भिकाजी, चार मराठे व धनगर व पठाण आश्चर्य करूं लागले कीं, " महाराज आपण तरि पलगावर निजला ( आहां ) आम्हीं तर येथेंच आहों. फौज तरि आपले ठिकाणावर आहे. हे काय ? " तेव्हा महाराजानीं उत्तर केलें कीं, हे कृत्य मार्तंड जाणो. तुम्हास काय सांगावें ? बोलोन सत्वर घोडयावर स्वार होऊन अवघ्या खाशासुध्दा बाहेर आले. तों पलटणाचें खेत पाहिलें. तों पलटणाचा शेणसडा जाला. दरम्यान मराठा घोडा राऊत एकही नाहीं. मग गोटात होऊन पुन्हा शहरांत आले लष्करांतही सर्वत्रास हेंच आश्चर्य. शहरात येतां दरवाजावरील लोक व कोटावरील सर्व महाराजास रंग देतात. महाराजानीं श्रवण करून मनात हासतात कीं, ईश्वराचें कौतुक अगाध

(१०६) बिगटला – सटकला. अस्मात – अकस्मात असें पाहिजे. राजे कूच – रोज कूच असें पाहिजे. महाराज कूच करून येथपासून कुंभेरीस आले येथपर्यंत – या वाक्याचा अर्थ कळत नाही. कुंभेरीहून कूच करून पुन्हा कुंभेरीस आला हें काय ! शहरास – भरतपूर शहरास, भरतपुरास.

( १०७ ) कौतुक – ईश्वरी चमत्कार. बिगटणे – येऊन भिडणें. गैबी – गुप्त. बासडा करणें – भाल्याची फेंक करणें. गुल – दगा, गडबड, ओरड. पलटणाचे खेत पाहिले – पलटणें रणांगणावर मरून पडलेलीं पाहिलीं. रंग देतात – रंग देऊ लागले, अभिनंदन करू लागले.

आहे. हेंच आश्चर्य. फिरंग्याचे अठरा हल्ले जाले, अठराही हल्ले आंतून आणि बाहेरून महाराज असेच मारून काढिले. भरतपुरावर माणसेंही मोठीं मोठीं कामास आलीं. सोमाजी लाभाते, केवळ कळीचा अर्जुन, तेथेंच सपले. आणखी दहा पांच माणसें गणनीय कामास आलीं.

( १०८ ) पेशजी मेवाड प्रांतांतून खंडो महादेव यांची रवानगी शिंदे याजकडे समेटाकरितां जाली होती शिंदेही अजिंठयाचे घाटची लढाई वसलीसाहेबाची खाऊन पुर्कस गळाठयात आले. तेही अडीरच होते. पंत मशारनिल्हे कारस्थानी रसायण घालून हरदु तर्फेचे फिलाफाचे पर्वत मनात, त्याचें मार्जेनें शिंद्याकडील समक्ष व महाराजाकडील कागदी पत्रीं निखालसता करून शिंदेसाहेबापाशीं घेऊन आले. फौज लढाई हरली त्यात पैशाचे कमर्तामुळे बुभुक्षा मनस्वी. येतांना मार्गांत सागरास सनाथ केले. ( नतर ) दिवे लावणीचा कौल दिला तेव्हां कांहीं सुदरून सबळगडास आले तेथें मुक्काम होऊन सरजेराव व खंडोपत बाबा पुढें महाराजाकडे आले हें सधान जाटानें पाहिलें कीं, होळकराचेच सल्लेनें आपला जीव नाकास आला आता दोन्ही सधानें गळा पडल्यास टपली राहणार नाहीं. शत्रूचें पारिपत्य होईल तेव्हा होवो. पुढील धोरणे ध्यानास आणून फिरंग्याचा सल्ला करून महाराजास जाब दिल्हा. नतर यशवतराव महाराज कूच करून वैरेस गेले. व सर्जेराव, खंडोपत बाबा भरतपूरनजीक पोहोंचले तेथें समजलें कीं महाराज कूच करून वैरेस गेले. तेव्हा हे भरतपूरचा सुमार सोडून वैरेस येऊन महाराजाच्या भेटी जाहल्यानतर कूच करून हिंडाणे केरोळी या मार्गें सबळगडचे सुमारें आले चर्मण्वती उतरून चैत्र वद्य पक्षीं सन १२१४ चे सालीं भेटीचा बेत ठरला. शिंदे यानीं जागा मैदान पाहून बिछायत करून, पाच हजार खासा

(१०७) कळीचा अर्जुन – कलीयुगातील अर्जुनच असा योद्धा.

( १०८ ) पुर्कस गळाठ्यात आले – फार नुकसानी झाली. अडीर – अडील. अडील – ईर्षेचे, हटवादी किंवा आडीर म्हणजे अडलेले, अडचणींत सापडलेले असाहि अर्थ होऊ शकेल. मशारनिल्हे – वर उल्लेखिलेले. रसायण घालून – बोलणें लावून, वाटाघाटी सुरू करून. हरदु – दोहीकडील. त्याचे मार्जेनें – त्याचीं मार्जेनें. सागरास सनाथ केले – सागर शहर लुटलें. दिवे लावणीचा कौल देणे – मुलूख उध्वस्त केल्यानतर पुन्हा वसाहत होण्याकरतां अभय-पत्रें देणें. कौल – आश्वासन-पत्र, अभय-पत्र. सुदरून – सुधरून, कांहींशी स्थिति बरी होऊन. जीव नाकास येणें – जीवावर बेतणें. टेकीस येणें, टपली – (आंगाची) कातडी, साल बिछायत करून – बैठक करून.

बदिमाख पोषाख येऊन बसले. नंतर महाराजांची स्वारी आली. साठ हजार स्वार, त्यांत महाराजांचे आंगांत दहा शेर रुईचा डगला, सफेत शेल्याचा धाटा, ढाल तरवार, बासडा खांद्यावर, गांठची गांठच ( आले. ) ह्यांत महाराज कोणते हें ओळखवूं येईना. येतांच गराडा फिरवून देऊन दोन हजार खांसा उतरला. तिकडल्या हिकडल्या तोफा चालल्या, चार घटिकापर्यंत कोणाचा शब्द कोणाचे कानीं पडेना ही व्यवस्था जाली. दौलतरायाचे तोंड सुकून गेलें. एक दोन रोजांत बैठकी होऊन सफाईचीं बोलणीं चालणीं जालीं. उभयतांचा एक विचार होऊन तेथून कूच कोव्याकडे जालें. सोलापुरावरून इद्रगड खानोर्लीचे मार्गें पाव्याजवळ चर्मण्वती उतरून मुक्काम जाला. पुढें तालब्यावरून बुदीचे मार्गें राळ्याचे मढीकडे कूच जालें. अंबोजी इंगळे याजपासून पैका घेऊन उभयतां सरदारांनीं वांटून घेतला.

( १०९ ) पुढें शिंद्याकडील ज्यान बत्तिसाचा कंपू यात हुसेनी जाली. कांहीं एक दिवस राडा राहिला मग महाराजांनीं सांडण्यावर पन्नास हजार रुपये रोकड घालून पांच पन्नास स्वारांनिशीं कंपूत गेले चादणीखालीं बसोन ज्यान बत्तीस वेगळा करून अवघे आपसर बोलाविले. तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटलें कीं, सरदार खावंद यांजला म्हणावें. छाती वाढून एकला आपल्यांत आला. आपसर बोलावून त्यांजला प्रश्न केला कीं, “ तुम्ही चाकर आमचे ( कीं ) ज्यान बत्तिसाचे ? आपसरानें विनती केली कीं, “ आम्हांस ज्यान बत्तीस व सरकारची बटीक दोन्हींही सारखेच. ज्याचे ताबेदारीस लावून द्याल त्याचे हुकमानें चाकरी करू. इतकाच अर्थ. बाकी आम्ही चाकर सरकारच. ” “ उत्तम आहे. आम्ही आज तुमची वांटणी सुरू करितों. ज्यान बत्तिसापासून कितीक सरकारी जाब समजून घ्यावयाचे ( आहेत, करितां ) त्याजला आमचे स्वाधीन करून द्यावें. ” आपसरानीं मान्य केलें. वांटणी चालू करावी आम्ही त्यांसी आणून हजर करून देतों. ते वेळेस मुत्सदी

---

(१०८) बदिमाख – दिमाखासह, भारी भारी पोषाख घालून बसले. रुइचा डगला – रूभरी चिलखत. धाटा – पागोटें पडूं नये म्हणून पागोट्यावरून व हनवटीखालून कपड्याचा पट्टा आवळतात त्यास धाटा म्हणतात. गांठची गांठ – टोळीच्या टोळी. जमावानें. गराडा फिरवून देऊन – ? व्यवस्था – अवस्था. जाले – जाणें झालें. सोलापुरावरून – ?

( १०९ ) जान बत्तीस – जीन बॅप्टीस्ट. हुसेनी – यादवी, दगल, आपसांत कत्तल. आपसर – ऑफिसर्स, कपूतले. छाती वाढवून – छाती करून, धाडस करून. वांटणी – पगार वांटणी. मुत्सद्दी – कारकून.

बोलावून वांटणीस कंपनी आणली पन्नास तोडे टाकून दिले. त्यांनीं ज्यान बत्तीस आणून हजर करून दिल्हे. त्याजला घेऊन महाराज कंपूंतून निघोन शिंद्याचे डेऱ्यास आले. नंतर दौलतरायास वर्तमान समजलें. यानीं ज्यान बत्तीस त्यांचे स्वाधीन केले " पन्नास हजार रुपये चांदणींत टाकून वांटणी सुरू करून आलों. हा ज्यान बत्तीस तुमचा हरामखोर अथवा सामखोर त्याशीं समजून काय घेणें तें घ्यावें. " असें बोलून आपल्या डेऱ्यास आले.

( ११० ) आठा चौ दिवसानीं दौलतरायाचा गूढसंदेशा आला कीं, " अंबोजी इंगळ्यापासून आम्हाकडून पैसा निघत नाहीं, कारण रदबदल करणार फार. यास्तव तुम्हीं याजला आपले येथें नेऊन पैक्याचा ठराव करून हस्तगतही करावें. हें वर्तमान समजताच यादवराव भवानी निसबत पीलखाना याजबरावर पांचशें स्वार हुजरातीचे देऊन, हातचिठ्ठी शिंदे यांचे नावें लिहून पाठविली कीं, अंबोजी इंगळे याजकडील पैका ठरावून उपयोग घडत नाहीं त्यास तुमचे लष्करात बळोत्तर. त्याजवर फौजेचा गुजारा. इकडे उत्पन्न जाहल्यास तवातेबरा, न जाहल्यास फाका या अडचणीमुळ मशारनिल्हे पाठविले आहेत इंगळे याचे स्वाधीन करून द्यावे. या भावीं मशारनिल्हेची रवानगी केली. पूर्व संकेत होतांच, मशारनिल्हे जाताच चिठ्ठी पाहून इंगळे याचे स्वाधीन केले आपल्या जवळ आल्यावर समक्ष येऊ न देता हरनाथाचे स्वाधीन करून दिल्हे त्यानें हुजरातीचे चौकींत कापडाचें गदेल्यावर बसवून पुढें हात जोडून उभा राहिला आणि विनंती केली कीं, " आपण शिंदे होळकर याचे येथील साहेब सुभे, मी हरनाथ तीन कवडीचा खास बारदार. फार वाईट आहे. तर झटकन बोलावें. माझा वाईटपणा उजेडात आणू नये. त्याचें बोलणें तीन चार पाच ( लाख ? ) श्रवण करून दहा पांच गालिप्रदानें शेलकीं समर्पक करून तगाद्याचीं आयुधें आणविलीं. तेल, तोबरा, खाट, जेरबद आणून टाकिले. कोळसे शिलगावले. मग इंगळे बोलले कीं, उदईक

---

(१०९) तोडा – एक हजार रुपयाचा एक तोडा होतो. चादणी – राहुटी. हरामखोर – गुन्हेगार. सामखोर – हरामखोरच्या उलट म्हणजे मित्र.

( ११० ) गूढ संदेशा – गुप्त निरोप. बळोत्तर – बलवत्तर. तबा-तोबरा – उपजिविका, घोड्यांची व शिलेदारांची. फाका – उपवास. गदेला – मोठी गादी. साहेब सुभे – मोठे अधिकारी. खास बारदार – हुजऱ्या. तगाद्याचीं आयुधें – छळ करण्याचीं हत्यारें. तेल – पलिते पेटवून अगास लावण्याकरितां. खाट – खाटेवर बांधून घालून ती खाट उभी करून कमचानी मारीत असत. त्यालाच खाट मार असें म्हणत. जेरबंद – चाबूक, चामड्याचा चाबूक.

जाब ठरावांत आणू. उत्तम आहे, म्हणोन आयुधें जेथील तेथें रवाना केलीं. तेव्हा दिवशीं रात्रीं पन्नास ठरले व सहा महाराजाचे खासगत याप्रमाणें जाब ठरून पैका आणावयासि बाळाराम शेट आगरवाले कोट्यास रवाना जाले. दौलतराव शिंदे यांजला सांगून पाठविलें कीं, पन्नास ठरून बाळाराम आगरवाले ऐवज आणावयास कोटयास रवाना केले. तेव्हा शिंदे यांस व त्यांचे मंडळीस आश्चर्य झालें. आपले येथें महिनाभर होते व महिनाभर आणखी राहते तथापि पूर्व दिवसच बिना निर्भिडतेखेरीज पैका निघत नाहीं असें आश्चर्य केलें. पैका आल्यावर पंचवीस त्यास दिले एकतीस आपण घेतले

( १११ ) हें वर्तमान त्यासी समजल्यावर किलाफाचें बीजारोपण पुन्हा जालें भेटींत बोलण्यात व्यवहारांत महाराजास समजल्यावर शिंदे याजला तळाचे तळावर ठेवून आपण कूच करून अजमीरनजीक पुष्करावर आले. तेथून बाडचा खटला पुन्हा मारवाडात रवाना करून जातीनें मंडा घोडा राऊत घेऊन सेखावटीचे मार्गें हरियाण्यातून दिल्ली उजवे बाजूस सोडून पटाळ्यास कार्तिक शुद्ध १२ सन १२१५ त मुक्कामास आले. तों दिल्लीकडून फिरंग्याकडील सरजाम पलटणें वगैरे मालकिनसाहेब पटाळ्याचे सुमारे आले. मग शिखाशीं सधान बांधून सतरज उतरावयास काठास आले. पाणी अक्षोभ उतार नाहीं तेव्हा मार्तंडाचें स्मरण करून, गंगेचें पूजन करून बेलाशक हत्ती गंगेंत घातला. त्यास हत्तीच्या गाशाचा पदर न भिजता पार उतरून गेले. ते दिवशीं शिलेदार व शिलेदाराचीं राडापोरें एकाचे गळा एक पडून रडण्याचा कोल्हाळ ( झाला ) तेव्हाच उतरून पार गेले व व्यास नदी उतरून मार्गशीर्ष वद्य षष्ठीचे दिवशीं अमरसरास गेले तेथें शिकाची खासू व गुरु याशीं स्नेहाची पकायत करून त्याचे विद्यमानें रणजितसिंग शिकाच्या भेटी जहाल्या समज गंगेनें ठाव दिल्यावर या मागाहून पलटणें तावडतोब येऊन पोहोंचलीं तों त्यानीं पाणी अक्षोभ, ठाव नाहीं ( हें पाहून ) मग लाचार होऊन, माहितगार आणून, घाट ठिकाणीं लावून उतरले. तेव्हा गंगेचे काठीं आले. सरकार शिखासुद्धा अमरसरावर मुक्काम तेथें मलकणसाहेबाकडील पैगाम सलुखा-

(११०) सहा महाराजाचे खासगत – इंगळ्यानें पन्नास लक्ष शिंद्याला व सहा लक्ष गुप्तपणें यशवंतराव होळकराला देण्याचें कबूल केलें. बिना निर्भिडितेखेरीज – भीड सोडल्याखेरीज, निष्ठुर झाल्याखेरीज. २५ त्यास दिले ३१ आपण घेतले – शिंदे होळकरांची वाटणी पूर्वीपासून ठरून गेलेली होती.

( १११ ) त्यासी – कोणाशी ? इंग्रजास ? अमरसर – अमृतसर. सत्रज – सुतलज नदी. पकायत – दृढता. मलकण – मालकम.

विषयीं मीरखान याजकडे आला. मग बाळाराम शेट व नवाब यांनीं मसलत करून दुसरे दिवशीं महाराजांचे कानावर घातलें त्याचेंही अंतःकरण होतेंच. मग बाळाराम शेट हरनाथसिंग साहेबाकडे पाठविले. त्यांचें बोलणें होऊन भेटीचा बेत ठरला. साहेबांकडून दोन साहेब आले. महाराजांची भेट जहाली. दोस्ती ठरल्यावर साहेबांचें कूच होऊन दिल्लीकडे गेले.

( ११२ ) दरम्यान रूमशामचे पादशहानें येशवंतराव महाराजांचे प्रतापाचा व जुवामर्दीचा जुलूष ऐकून तेथून खत व हत्ती, घोडे आले त्याजवरून सलूख जाला. खत आल्यापासून खंडेराव होळकर याचे नावाचा शिक्का महकूब करून जातीचा शिक्का ऐवजीं हरफाचा चालू जहाला सलुखा जहाल्यावर फौजेची तारीख बंद हिशास्त टाकली. अमरसराहून माघारीं उलटल. तेथून हरनाथसिंग याजबराबर सोडचिठया स्वदेशन्या देऊन अमलफैल करून स्वदेश नेमाड माळवा येथील ऐवज फौजेचे समजाविशीं करिता जमा करावा म्हणून रवानगी केली व मार्गांत शिखाचे स्वाधीन केले होते ते हरनाथसिंग याजला आज्ञा केली कीं, बाळासाहेबास घेऊन जावें अशी आज्ञा होऊन हरनाथसिंगाची रवानगी जहाली मागाहून खासास्वारीचे कूच जहालें

( ११३ ) पुढे ज्वालामुखी जवळ पाहून फौज सारी मुक्कामीं ( ठेवून ) विसाच कोशाचे आत राज्य टाकून ज्वालामुखीचे राजास पत्र लिहून, उत्तर आणून, दहा हजार स्वार बरोबर घेऊन फाल्गुनमासीं देवीच्या दर्शनास गेले मार्ग बहुत दुर्घट. परंतु तेथील राजाचें समत आणल्यावर दगाफटका न होता सुरक्षित देवदर्शन घेऊन, फौजेंत सावध होऊन, दरकूच बनवाडयावरून जयपूरचे रानात नरावयास स्वारी आली. दरम्यान हैदराबादी पठाण अग्रसर होऊन, तमाम फौजेचा आतून एका होऊन तलबेकरिता बैदा जाला. फौज आपले ठिकाणीं साशंकित, सरदार आपले ठिकाणीं साशंकित, त्या प्रसगीं ताबूत मोहरम आला. तेव्हा फकिरी मागावयास हैदराबादी पठाण आले. वीस हजार नागवी तलवार ( त्यानीं ) वस्त्रें प्रावर्णें सोनें चांदी जवाहीर देणे ( असें मागणें केलें ) महाराजाचे ( मनीं हा ) अग्नीचा कलोठ असे

( ११२ ) खत – पत्र. महकूब – तहकूब, रद्द. जातीचा शिक्का – स्वतःच्या नांवाचा शिक्का. ऐवजी हरफाचा – हरफ – अक्षरें. मोहरे वर अक्षरें काढलेला फौजेची तारीख हिशास्ते – ? अमल फैल करून – आपले अधिकारी नेमून.

( ११३ ) फौज सारी मुक्कामी वीसाच कोशाचे आंत राज्य टाकून — ज्वालामुखीच्या राज्यापासून वीस कोसांवर फौज ठेवून. बैदा – दंगा.

येऊं द्यावें न येऊं द्यावें असा विचार पडला. मग धर्मोजी शिंदे वगैरे मराठे धनगर यांनीं सल्ला दिल्हा कीं, " महाराजानीं कोणाचेंही वाईट केलें नाहीं. घर दौलत कांहीं एक न पाहतां झालें उत्पन्न तें अगोदर फौज मग काय असेल तें असो. असे आम्हींच खुशामत करितों असें नाहीं. लहान मोठे सर्व फौज ( म्हणत ) आहे. आता हे कलुष सर्व पोटाचें आहे. याचा मार्ग निघाल्याचे पोटीं सर्व तुझे चरणीं प्राण समर्पून आहेत तेथें सशयाचें कारण मनात आणूं नये. ज्याचे घरीं पात भाजावयास खापर नव्हतें ते हत्तीनशीन करून दिल्हे. त्यांजपासून अन्य विचार काय व्हावयाचा आहे ? व दुसरे दक्षणात्य प्रकरणीं श्रीमंत, भोंसले, दाभाडे, गायकवाड, मोंगल, शिंदे व तुमचे वडील सर्वांनीं पराक्रम करून दौलत वृद्धिंगत केली, परतु ही शोभा ( दिसली नाहीं ) फौजेंत बैदा तथापि आज वीस हजार तरवार नागवी, लोक एकापरीस एक, आफलावून, फकीर होऊन मागावयास आले ही शोभा कोणेही ठिकाणीं पाहिली नाहीं. हेंही एक नाव आहे " असें समत घेऊन डेऱ्यास यावें अशी परवानगी जाहली. तों लोकानीं येऊन गराडा घालून अबीर खडोगणती उडाला. शोभा अमोलिक झाली. लाख रुपये फकीरी देऊन विदा केले. दुसरे दिवशीं आपण फकीरी घेऊन तीस हजार नागवी तरवार जातीनें फकीरी दिक्षा घेतली त्या प्रमाणें अलंकार सहा हजार फकीर, वरकड सामान, अशा थाटानें आपणही त्यान्या गोटात फकीरी मागावयास गेले त्यात समजताच तीस हजार रुपयाचीं फुलें चादी सोन्याचीं करून, गोटात आले तेथून उडवीत डेऱ्यात नेले. तेथें लाख रुपयांचा चौत्रा बैठकीस करून पांच लाख रुपये फकीरी बद्दल पावती दिली. गोडीगुलाबीनें फकीरी घेऊन आले. नतर त्याचा हिशेब करून जयपूरवाले जोधपूरवाले याचा अपसात सोयरिकीचा दगा पडून लढाईचा मनसोबा, तेव्हा दुतर्फा महाराजाचें अगत्य. याचे पोटीं कांहीं पैका जयपूरवाल्यापासून घेतला. कांहीं जोधपूरवाल्यापासून घेऊन बाराट फौज होती तिचा फैसला करून, उभयतांचें रहस्य करून देऊन, या इतिकर्तव्यतेस दिवसातर लागलें. यास्तव खंडेराव होळकर, गणपतराव दिवाण व फडणिसाकडील कारकून त्यांचे गोटांत येऊन हिशेबाचा आकार करून पैका देणें अवशिष्ट राहिलें यामुळें शिपायी तर आहेतच कोणी कोणी

(११३) ते अगोदर फौजेत – उत्पन्न आलें तें अगोदर फौजेच्या पगारांत खर्च केले. कलुष – कपट, ढोंग. पात – एक जातीचा मासा. आफलावून – आपलेहून, आपण होऊन. त्यांत – 'त्यांस' असे पाहिजे. चौतरा – चबुतरा, उचवटा. बाराट – ? रहस्य करून देऊन – रहस्य करून दिलें. इतिकर्तव्यतेस – हें काम उलगडण्यास. दिवसान्तर – कांहीं दिवस.

असेंही बोलो लागलें कीं, येशवंतराव आहे कोण ? धणी दिवाण फडणीस आम्हापाशीं, आम्हीं जे पाहिजे तें करूं. ही गोष्ट मनात लागून रात्रीचा दिवस करून फौजेचा फैसला होऊन खंडेराव होळकर वगैरे मंडळी आपली आणोन घेतली. पठाणाचा फडशा जाहल्यावर वेगळे होऊन कांहीं दिवस जयपूरवाल्यांनीं चाकर ठेविले. महाराज कूच करून हारमाडयाचे मुक्कामास आले. तेथें खंडेराव होळकर याचे प्रकृतीस विकृत ज्हाली. सन १२१६ माघ शुद्ध ७ देहावसान होऊन, तेथें कांहीं दिवस मुक्काम होऊन कोटयाचे सुमारें चर्मण्वती उतरून पाटणास मुक्काम जाला. तेथें मराठयाचे फौजेची समजावीस होऊन, सन १२१७ अवल सालीं आषाढ शुद्ध १ स भानपूर मुक्कामीं आले. तेथें पलटणाचा दगा होऊन महाराजास तेलग्यानीं पालखींत घालून पलटणात घेऊन गेले. तेथें काशिराव होळकर होते. तेथें भाषणें अवाच्य पूर्व ( व ) त् ऐकिलीं. लाचार ( ? ) बाळाराम शेट कारस्थानी पन्नास हजार रुपयाचे तोडे नक्त आणून वाटणी सुरू केली. आपण जातीनें तेथें राहून महाराजास काहाडून दिल्हे. भानपुऱ्यास येताच काशिराव होळकर कुटुंबसुद्धां होते त्याजला चिमणाजीपंत भाऊ बरोबर देऊन सरकार बिजागडचे किल्ल्यावर पाठविले. दरम्यान सेंदेवाडयात दादमखान वगैरे हजार बाराशें स्वार पागेचे व दोन पलटणें होतीं. त्यानीं आपसात विचार करून काशिराव काहाडून नेऊन बंड करावें हा इरादा केला. वाहदअलीखा बंगस खानदेश प्रातीं रावेरीस होता त्याजकडे दादमखा यानीं पैगाम लावून तेही आपल्यात सामल केले. दवड करून खरगोणापर्यंत गेले. काशीराव हातीं न लागता चिमणाजीपंत यानीं बिज्यागडचे किल्ल्यावर दाखल केले. मग दादमखा घाट उतरून रावेरीस आले. पाच विश्वे भारमल होळकरही यात होते. परंतु उघड जाले नाहींत. यावल साकळीस होते. पागा वळवून बंड केलें. सबब भानपूर मुक्कामीहून सदरदीन हावलदार दोन हजार हुजुरात घेऊन त्याचे पारिपत्यास रवाना जाले. तें दरकूच बहारपुऱ्यावर आले. हें वर्तमान बंगस दादमखां यांसी समजल्यावर यानीं पहिलवानखां पठाण पाचशें स्वारानिशीं त्याजवर रवाना केले. त्याची याची तरवार चालून चार घटिकाहि मोहरा न साभाळता हावलदारांनीं पळ काढला. तों महेश्वर पाहून भानपुऱ्यास दाखल झाले. शेवटीं तें बंड पागा पलटणें वगैरे फिरंग्यानीं अमळनेरावर बुडविलें.

( ११४ ) महाराज पंजाबाहून स्वारी फिरल्यावर परतंत्र व्हावयास प्रारंभ जाला.

---

(११३) तेलंगी — मद्रासी शिपाइ. दवड — दौड. मोहरा संभाळणें — हल्ला सोसणें, हल्ला थोपवून धरणे, तोंड सभाळणे.

( ११४ ) परतंत्र — बेहोष, अमली पदार्थाच्या सेवनामुळें.

हा इरादाच कीं कलकत्ता पहावा. भानपुऱ्यास आलियावर तोफा सरंजाम कमती. तोफा वोतावयास कारखाना लाविला. चवऱ्यांशीं तोफा लहान मोठया वोतल्या. त्या कारखान्यांत कोव्याचा वकील तोंडीं लागला होता. लार्डे लार्डे बोलावयास गेला कीं, "आता हा श्रम कशास करितां? उष्ण या प्रकारचें." अशा भावीं अवीच्य बोलणें बोलावयास गेले. त्यास ताव दिल्हा कीं, "कोटेवाले फिरंग्याचे गाडीस शिरून माझें करोडों रुपये नुकसान केलें कोटे ढुढून खोदून चमेलींत टाकावयाचें आहे. घाबरा का होतोस?" तो बेहोष होऊन जालमसिंगास मजकूर लिहिला तेथें जरब पडून पाच लक्षांच्या हुंड्या मुकाट्याच आल्या. (कीं) हे नजर करून सरदारांची मर्जी संपादन करावी पाच लाख रुपये सहजात आले तात्पर्य जरबवान पुरुष आहे त्याचे तोंडांत दौलत आहे! दिवसादिवस परतंत्रता गालब होत चालली. तोफाचा कारखाना आटोपल्यावर महालाचें पाहणें पाहूं लागले. परतंत्रतेच्या अनुसंगानें मनस्वी जमा वाढविल्या त्यांच्या व्यवधानात गगाराम कोठारी यानें स्वारी पंजाबांत गेलियावर मागें माळव्यांत सरदार कोणीच नव्हता, शिंद्याकडील वगैरे परराष्ट्रें वगैरे आलीं, परंतु जुंमस खाऊं न देता सरकारनक्षा राखून सरकारी जिल्ह्यांस तोशीस लागूं दिल्ही नाहीं यामुळें खर्चाखालीं मुबलख आला. तथापि हमरहा केला असता आणखींही चार रुपये घावयाजोगा. ते न करितां एक लुच्चा कारकून राजाराम शिवराम कोव्याचे शिफारशी असामी रामपुऱ्यास पाठविली होती, त्याचें न चालविल्यामुळें रामपुरा वगैरे माहालानिहाय तीन साला विसां लक्षांचे तक्रारीचा सौदा करून समजाविलें. कोठारी याचे प्राणाशीं गाठ घातली.

(११५) त्या प्रसंगीं महिपत बाबा गोसावी ढोलीबावा भानपुऱ्यास आले होते. त्यांचे ठायीं आस्ता बसून उपदेश घेतला तेव्हा त्यांनीं ब्राह्मणभोजन, देवपूजा, मंत्र, जप करण्याचें सांगितलें. त्याप्रमाणें क्रम चालला. त्यात आश्विन वद्य ४ स १२१८ ते दिवशीं रात्रौ आरती करीत होते. आरती करता वेळेस प्रकृति बेवस

---

**(११४) तोंडीं लागला होता** – प्रियपात्र बनला होता. **ताव देणें** – जरब दाखविणें. **बेहोष** – घाबरलेला, होष उडालेला. **गालब** – दृढ, वृद्धिंगत. **परतंत्रतेच्या अनुसंगानें मनस्वी जमा वाढविल्या** – व्यसनाधीन झाल्यामुळें कारभाऱ्यानीं वाटेल तसा कारभार करून कर्जे करून ठेवलें. **खर्चाखालीं मुबलख आला** – फार खर्च करावा लागला.

(११५) **आस्ता बसून** – भक्ति बसून. **बेवस** – मोडी वाचनाची चूक! **बेहोस** – बेहोष असे पाहिजे. किंवा **बेवस** याचा बिघडलेली, बिथरलेली असाही अर्थ होइल.

होऊन अनिर्वाच्य शब्द वगैरे चेष्टा करण्यास प्रारंभ केला. तेथें जवळ सखाराम गोविंद निंबत नरतवेला व केशवराव विठ्ठल सारोळकर हे उभयतां जवळ होते. आणखीही शागिर्दपेशा वगैरे मंडळी जवळ होती. परंतु हात लावावयास कोणाची हिंमत न चाले. मग सखाराम गोविंद याची सलग विशेष होती. हा बोलला कीं, "बेटे हो आतां महाराज कशाचे ? धरा बळकट. सोवळें फेडून, चोळणा घालून, बाडांत नेऊं" असें बोलून कवळींत धरलें. महाराजांस चौ माणसांचें बळ. सखाराम गोविंदास आटेपेना ज्याचे हातचा भाला तरवार ज्यास लागली त्यानें पुन्हा पाण्याची वाट पाहिली नाहीं ! मग केशवराव विठ्ठल यानीं कंबर धरिली. मग हुजरे शागिर्द बिलगले सोवळें फेडून चोळणा नेसवून बाडांत नेऊन घातलें त्या नेण्यांत दहा पांचास चापटा लाथा मारल्या ते दो दो चौ चौ रोजानीं सुदरले. बाडांत जाऊन तेथेंही दगा केला. बायकास लपता हाल जाले मग बाळाराम शेट व चिमाजीपंत भाऊ कारभारी होते त्यांनी दौलतीस आळ घालून, महाराजाचे बाड वेगळें देऊन, जाबता केला हुजरे व गोलंदाज यात दाडगा, ज्वान, बळकट अशीं माणसें निवडून पाहरे नेमून देऊन, दरखदाराकडील एक एक कारकून पाहाऱ्यावर ठेवून बाळाराम शेटाचे परवानगी खेरीज कोणी आंत जाऊं नये. सन १२१८ माघमासीं मानपुऱ्याहून कूच करून मलासी रामपुऱ्याजवळ गेले. हें वर्तमान मीरखानास समजल्यावर समाचारास सडे आले. महाराजाची प्रकृति विलक्षण पाहून ते दिवसापासून ऐवजास अभिलाष उत्पन्न होऊन, दहा लक्ष रुपये घेऊन कारभार बाळाराम शेट यांनींच करावा असा तुळसाबाईचे विचारें ठरवून गेले आपल्याकडील गफ़ुरखां बराय मसलत ठेवून गेले. जातीनें फौजसुद्धा नागपुराकडे जाऊन महाराजांचा इरादा होता तो पूर्ण करावा या धोरणावर गेले

(११६) इकडे सरकारांत धर्मांकुवर याजकडे पलटणें दामदस्त याची वहिवाट होती. फौजेची मालकी कमी पडल्यामुळें बाडासभोंवता पलटणाचा गराडा घालून रहावें अशी चाल टाकली. सर्वांवर पलटणी छाप ठेवून कारभाराची मुखत्यारी आपले देठीं आणली. बाळाराम शेट रसायनी, बाहेर दुजागीं दिसू न देता क्रम चालविला. फाल्गुन मासीं भीमाबाई, गोविंदराव बुळे याजला दिली. लग्नसमारंभ उत्तम प्रकारचा जाला. इंदुरास मुक्काम आला. तेथें तुळसाबाई व मल्हारराव

---

(११५) सलग – सलगी. ज्याचे हातचा भाला – ज्याचे – त्याचे. बराय मसलत – मसलतीसाठीं.

(११६) चाल टाकली – पद्धत ठेवली. आपले देठीं – आपल्या हातांत. दुजागीं – द्वैतभाव.

महाराज वर्तमान यांची गोतबात जाली. पुढें इंदुरास आले. छावणी महूस ज्येष्ठ मासीं सन १२१९ चे अवलीस जाली. दिवसोंदिवस धर्मांचें आक्रमण विशेष पडत्त चाललें. राजे महिपतराम निसबत नबाब हैदराबादवाले काली बेगम इच्यातर्फे जें राजकारण घेऊन आले त्यांतील आशय हैदराबादवाल्याचे दौलतींत नबाब मृत्यु पावल्यावर कारभाऱ्याचा काली बेगमेचा फाट पडून जागजागां वोढाताण होऊं लागली. सबब बेगमीनें मुखत्यार राजे महिपतराम करून पाठविला कीं, तेथील प्रसंगानुरूप जें बोलणें ठरणें तुमचे विचारें येईल तें आम्हास कबूल. परंतु यशवतराव होळकर याजला बमय फौज घेऊन यावें. या प्रीत्यर्थ कोटी रुपयाची भलावण सावकारी मशारनिल्हेबरोबर देऊन रवाना केले. याचे निघण्याचे प्रसंगीं स्पर्धी कारभारी होते, त्याजला कळल्यावर त्यानीं याजला लुटून घ्यावें सबब फौजा आडव्या रवाना केल्या. परतु राजे महिपतराम याजबराबर सरमजाम साहेबजोपेशीं पांच हजार स्वार पायदळ होते. कितीएक ठिकाणीं प्रसग पडला (तेथें) शिद्दीनीं जुवामर्दी करून मशारनिल्हेस घेऊन आले. महाराजाची भेट होऊन ते परतंत्रच, परतु कारभारी यानीं त्याची दिलजमाई चांगली केली. बाजदबरसाद तुम्हीं सागाल त्याप्रमाणें मनसोब्याची पैरवी होईल. अशा भावीं हुषारीनें ठेविले होते. पुढें धर्माचा बस चालल्यावर राजे महिपतराम भोसल्याकडील वकील उमाजी पाटील या उभयताचें माथा ताम्राकडील फितुराचा आरोप ठेऊन जिवें मारून टाकिलें. गोठ लुटून घेतला. करोड रुपये महाल मुलूख द्यावा हें धोरण अल्प समजण्याचे माणसाचा सर जाल्यामुळें मसलत गावखुद जाली. गफूरखा मीरखानाकडील होते, त्याजला लष्करातून काहाडून दिल्हें नतर धर्मानें आपल्या करण्यास जो कोणी प्रतिकूल त्याचें पारिपत्य करावें हा इरादा धरिला. बाळाराम व विठ्ठल महादेव व महिपत गोमाजी वगैरे लहान मोठे आपलाले ठिकाणीं साशंकित कोणे समयं काय अफत येईल तुळसाबाईचाही बस राहिला नाहीं. पुढें इंदूर मुकामींहून कूच करून मेवाडात आले. धर्मानें हुकुमाची प्रवृत्ति महाराजासारखी चालविली. शिलेदार पागा मुत्सदी वगैरे कोणी असो, तफावत पडल्यास पा (२५)

(११६) **गोतबात** – गोतपात. जातींत घेण्यासाठीं एका पक्तीस जेवावयास बसावयाचा समारभ. **भलावण सावकारी** – सावकारी निशा, भरणा करून दऊ अशी सावकारांनीं करून दिलेली हमी. **स्पर्धा** – स्पर्धा करणारे, हितशत्रु. **साहेबजोपेशी** – ? साहेबानें जोपासना केलेले ? युरोपियन अधिकाऱ्यानें शिक्षण दिलेलें किंवा कवायत शिकाविलेलें ? **ताम्र** – तांब्र, इग्रज. **बस** – वर्चस्व, हुकमत. **सर होणें** – वरचष्मा होणें. **प्रवृत्ति** – तऱ्हा.

त्याशिवाय दुसरी गोष्ट नाहीं. एकमुखी रुद्राक्ष जाला तेव्हां मीरखान नवाब याजकडे प्रेष गेले कीं, तुम्ही तिकडे काय करितां ? दौलत गुलामाचे घरांत गेली. मग नवाब तिकडील संधान सोडून दरकूच मेवाडांत आले. तों धर्मो फौजेचा बंदोबस्त करून त्याचा चिंचूप्रवेश होऊं दिल्हा नाहीं. नवाब व तुळसाबाई मुत्सदी याचें सूत्र एक. तेव्हां मीरखानास निकराईची लढाई लढावयाचा विचार. त्याजकडील हजार पांचशें स्वाराचा गोळ आला म्हणजे चार कंपन्या, दोन तोफा घेऊन बेलाशक गोळे मारावे. त्याना टाळा देणें प्राप्त हाच मग. त्यानीं पलटणाची गाठ पडू न देता फौजेची घेराघेरीं आरंभिली. रसद, चारा भरून आला म्हणजे चारा उतरून घ्यावा. घोडे माणूस हाकून द्यावें असें करूं लागलें. याने लष्करांत चारा व धान्य न येऊं पावल्यामुळें लष्कर बेदील जालें पलटणें भोंवतालीं घालून दरम्यान फौज असे तीन चार कूच करून आला. नजीक निंबाहेडा चलू नदीवर मुक्काम आला ते दिवशीं मीरखानाचे अडचणीमुळें मुक्कामीं येण्यास काही रात्र जाली. ते दिवशीं रात्र होऊन अंधार पडला असता एकही मशाल लावूं दिल्ही नाहीं. हलकें माणूस पुण्य थोडें. अंतःकरणातून दौलतीचा अभिलाष उत्पन्न होऊन, बाडात नागवी तलवार घेऊन पालख्यांत बाडाच्या हिंडू लागला. मग त्याचे अंतःकरणीं काय असेल तें असो ! हें वर्तमान सदरदीन हवालदार हुजरातीचा मालक याजला समजताच रऊ पाटील खास तबेलेवाला याजबरोबर पाच सहाशें बारगीर तोडे सिलगाऊन देऊन बाडाकडे पाठविला. त्यानें येऊन धादल केली 'पराय राज्यांत आणून प्रहर रात्र जाली, अद्याप डेरादाडा, दिवाबत्ती नाहीं हें काय ? धर्मदादा कोठे आहेत ?' असे तोडाने मात्र बोलून मशालची व फरास (यास) धोपटाधोपटी करून मशाला लावून डेरेबाड उभें केलें. ते दिवशीं त्याचे मनातील धर्म काय असतील ते महकूब जाले यांतील विषय पलटणांत समजून त्याचे अंतःकरणास गोड न लागता अवघे कुमेदान आपसर वगैरे एकत्र होऊन कौसल केलें. आपण विदेशी. धन्यानें एक आपला इमान शाबूत पाहून लाख फौजेचा मोहरा मारावा, या मरातब्यास आणून लाखों रुपयाची दौलत आपले जिमेस केली व लाखों रुपये

---

(११६) एक मुखी रुद्राक्ष जाला – एकट्याच्या हातीं सर्व सत्ता केंद्रित झाली. ज्यास एकच तोंड आहे अशा रुद्राक्षास एकमुखी रुद्राक्ष म्हणतात. **गुलाम** – सेवक, हुजऱ्या. **चिंचूप्रवेश** – चचुप्रवेश. **गोळ** – गोल, जमाव. **हाच** – ? **हलकें माणूस पुण्य थोडें** – हलकट मनुष्य त्याच्या हातून पुण्यकारक गोष्ट कशी घडणार ? त्याच्या हातून पापकृत्येंच घडावयाचीं. **पराय** – परक्या. **धर्म** – हेतु.

आपल्यास चारले. ती क्रिया एकीकडे ठेवून गुलामाचे नादीं लागून धन्यास अपाय करावा यात कोणी जाल्यास आपले सहा रुपये आपले कपाळीं आहेतच. ते पक्षीं ज्याचा शेर खातों त्यास सामल असावें ही नेकसल्ला. असा निश्चय करून हिंदूनीं गंगा व मुसलमानानीं कुराण ( उचलून ) एकदिली करून तमाम आपले आपले पलटणात वरदी फिरवून दिली हे वर्तमान विठ्ठल महादेव यास समजल्यावर त्यांनीं बाळाराम शेटाकडे जाऊन सवी पाहून विचार केला कीं, पलटणवाल्याची व आपली एकदिली करून गुलाम मारून टाकावा असा निश्चय करून कुमेदान बोलावून त्याशीं बोलणे लाविलें. त्यानीं एकच उत्तर केलें कीं, " धन्याने आमचें घरदार काहीं एक पाहिलें नसता आमचा इमान अंकित करून दौलत आमचे हवाली केली मुसलमानाचे पारिपत्याविषयी भरोसा आमचा तेथे आम्ही गुलामास सामल होऊन धण्याशी हरामखोरी करू यांत ईश्वर आम्हास काय जय देणार ? पुढे विदेशी माणसाची पत जाऊन शिंदे, होळकर, मोगल, फिरंगी कोणीहि पायपुसापाशी उभे राहू न देता लाखो माणसाचे अन्न उठेल आमचे तलबेचा कोणीही जिम्मा करावा. जे या फितुरांत अहेत तितक्यास धरून आपले स्वाधीन करून देतों पाहिजे तें करावे. " तेव्हा बाळाराम शेट खरे, परंतु दौलतीचे कारभारी विठ्ठल महादेव पहिलेपासून सावकारी करीत होते. अलीकडे हा रोजगार जाल्यावरही सावकारीचा भ्रम विशेष वाहाडला. देण्याघेण्यात बोलण्यांत सावकारी चाल हे सर्वांस माहीत. तथापि बाळाराम शेट यानीं छातीस हात लाविला की, तलबेचा आमचा जिम्मा त्यानीं उत्तर केलें कीं, द्याल आपणच जे होणे ते आपल्याच हातून होईल परंतु जिम्मा सावकारी पाहिजे. मग तात्यानी छातीस हात लाविला कीं, तलबेचा जिमा माझा. आपण राजी जाले. मग महिपत गोमाजी बोलावून वाडापाशीं जाऊन तुळसाबाईस हा कार समजावून आपसराची खातरी तसलीम व तात्याचा पैक्याविशीं जिमा पक्का करून प्रातःकाळीं जे या कुभाडात तितके धरून आमचे स्वाधीन करावे. आजपासून आठा दिवसा तुमची वाटणी चालू करू असा नमूद सिद्ध होऊन प्रातः-

---

(११६) **यांत कोणी जाल्यास इ०** – यात कोणीहि विजयी झाला तरी आपल्या कपाळची महा रुपयांची नोकरी काहीं सुटत नाहीं. आपणास काहीं मोठा फायदा होतो असे नाहीं. म्हणून आतांपर्यंत ज्याचा शेर खाल्ला म्हणजे ज्याचें अन्न खालें त्याची बाजू धरावी हा उत्तम मार्ग. **आपण राजी जाले** – स्वतः जिमा घेण्यास तयार झालें. **कार** – कारस्थान, मसलत. **खातरी तसलीम** – खातर–तसली, खात्री.

काळी सूर्योदयात्प्राक पलटणात गुल करून धर्मा व सोभाराम व गपूसिंग व बाजूसिंग चौघे धरून देवडीवर आणून तुळसाबाई समक्ष शेटजीचे स्वाधीन केले. डोकीं मारावी असा निश्चय झाला नबाब मीरखानही येऊन सामल जाले. मग तृतीय प्रहरीं फाल्गुन वद्य ११ सन १२१९ धर्मा व सोभाराम यांचीं डोकीं मारिलीं. गपूसिंग व बाजूसिंग एक वस्त्रानिशी काढून दिल्हे. नबाब बराबर होतेच

(११७) एकलिंगजीस कोणी तेलग ब्राह्मण एकलिंगजीचा पुजारी याजकडील प्रेष आला की, महाराज या टिकाणी मजपाशीं आल्यास दोन दिवसात वृत्तीवर आणीन या दुराशास्तव ठरवूच एकलिंगजीस जाऊन तेथें उपाय केला. कांहीं अतर पडले नाही ब्राह्मण पळून उदेपुरास गेला. नंतर माघारे रासमीचे मुक्कामी आले मीरखानाबराबर तात्या आळेकर होते मीरखान तुळसाबाईचा विचार होऊन तात्या आळेकर यानी कारभार करावा असे ठरलें तात्या आळेकर याचा सप्रदाय त्यारे आपून करावे परतु माथ्यावर घेणारा वेगळा पाहिजे त्याचे मागे आपण असावे बाळाराम शेट याजला काही चरित्र दाखवावे यास्तव नबाब मीरखान यानीं फैल घातला की, आम्हास दोन कोट रुपये लोकाचे व सावकाराचे देणें याचा मार्ग काय काढिता ? असे बोलणें घातले तेव्हा तुळसाबाई यानीं तात्या आळेकर याचे संधानें बाळाराम शेट याचे गळ्यात हात घालून, "दादा कसे करू ? नबाबास येथून काहाडावे." तेव्हा यातील चिन्हें बाळारामासी समजली प्राण जाण्याचा समय आहे तथापि छातीचा पुरुष. नबाबाशी मेळ करून निभाऊन घ्याल तर सोईसोईने तुम्हास पेचातून काढील. त्यानी उत्तर केलें की, माझ्या तरी छातीस कटारा लागल्या आहेत याची शकल काय ? बाळाराम अगरवाले यानी उत्तर केले की, चौ महिन्याचे कराराने चिठया मजवर कराव्या आपण

---

(११६) **गुल करणें** — दगा करणें.

(११७) **वृत्तीवर आणीन** — वेडांतून बरे करीन. **संप्रदाय** – रीत, पद्धति **आणून** — आपून म्हणजे आपण असे पाहिजे. **माथ्यावर घेणारा** — जोखीम पत्करणारा, जबाबदारी स्वीकारणारा. **फैल घालणे** — कुरापत काढणें. **अतर** — फेर. **ब्राह्मण पळून उदेपुरास गेला** — बोलल्या प्रमाणे गुण आणून दाखविला नाही याबद्दल प्रायश्चित्त मिळेल या भीतीनें. **आपून** — आपण स्वतः जातीनें. **माथ्यावर घेणारा** — अधिकृत जबाबदार मनुष्य **चरित्र दाखविणें** — चमत्कार दाखविणें, इगा दाखविणें. **फैल घालणे** — बोलणे घालणें **काढील** — काढीन असें पाहिजे. मोडी वाचनाची चूक **शकल** — मार्ग, युक्ति.

उदेपुरास जाऊन काहीं ऐवज घेऊं. पुढें कोटयास जाऊन सावकार पाहून फैसला करून देऊं. मीरखानाचेही गळीं उतरलें. मग काहीं शिलेदार पागा पलटणें बरोबर घेऊन नबाबाचा भराव समागमें तसेंच उदेपुरास आले. तेथें कांहीं ऐवज घेऊन ज्याची लाखाची चिठी त्यास शभर रुपये दिल्हे. नबाबानीं चिठया दीड कोटीच्या केल्या. त्याची खातरी शेटजीनें करून हवाला घेतला. उदेपुरास लाखीं शंभर या अन्वयें काहीं दिल्हें, काहीं देतों दिलावितो ऐसें करून कोटयास येऊन जालमसिंगास वर्तमान समजाऊन तात्या आळेकरही त्याप्रसगीं आले. त्रिवर्गांचा विचार होऊन शेटजीस गागूरोणीचे किल्ल्यावर लपविले तेव्हा नबाबाचे देण्याचा राडा बहुतेक पडला. मग जालमसिंग दरम्यान पडून लाखीं साडे बारा ठरविलें त्यात उदेपूरचा वसूल मजरा घेऊन बाकी चुकवून द्यावी हे रुपये साहा महिन्याचा करार साहा महिन्यानीं व्याज चार रुपये शेकडा कबूल करून घेऊन बाकी द्यावी अशा तऱ्हेनें लाख पन्नास हजारात दीड कोटीच्या फारखत्या घेतल्या नबाब आपले मार्गें टोक रामपुऱ्याकडे गेले. गफुरखा बराय मसलत हुजूर राहिले

(११८) मग तात्या व बाळाराम शेट लष्करात येऊन सरकार फौज राहिली या व्यवस्थेची तरकीब काढिली. बापू विष्णू याजबरोबर दोन पलटणे, चार हजार शिलेदार, पाचशे हुजुरात ऐसे समागमें देऊन पोट भरावया मार्गस्त केले. तसेंच रामदीन व जगनाथ राजाराम याजबरोबरही सरमजाम देऊन रवाना केले इतक्यात तिन्ही सुभ्यात रामदीन याजकडे माहाल महतपूर, सावेर, रावेर, प्रतापगडचा टाका इतकी जागा मुबादल्यास होती याजमुळें त्याचे फौजेचा गाबावाबा हेरले बाहेर सुदरून, काळ काहाडला. केवळ माहालचा ऐवज अकलेश पदरीं पाडून हातावर फौज चालविली. सरकारात बोभाट येऊ दिला नाहीं लोकांशी आचार याजकडे माहाल आहेत चिंता काय ? रुपये आपले येतील अशा भावीं गुजारा चालत गेला. बापू विष्णू यानीं सोळा महिने गुजारा केला.

---

(११७) **भराव** – जमाव. **लाखीं शंभर** – लाखाच्या ठिकाणीं शभर. लाख द्यावयाचे तेथें शभर दिले. **देतो दिलावितो** – देतो, देववतो **राडा** – दगा. **बहुतेक** – बहुत-कांही, फार. **मजरा घेणे** – हिशेबात वळते करून घेणें.

(११८) **सरकार फौज राहिली** – सरकार फौजेच्या देण्याची तोड काढणे तेवढी राहिली. **तरकीब** – योजना, उपाय. **गाबावाबा हेरले बाहेर सुदरून काळ काहाडला** – ? **हातावर फौज चालविली** – फौजेस रोजचे रोज तात्पुरतें खर्चास देऊन फौजेंत असंतोष होऊ दिला नाहीं.

( ११९ ) पुढें पलटणाचा बैदा सागर प्रांतींहून माराकुटी झाली. मग त्याची तगीरी करून केशवराव माहडीक बदोबस्तास पाठविले. सरकारातून मदत कांहीं कापड बाळारामशेट याणीं दिल्हे त्या कापडावर शिलेदार याची समजूत केली. पलटण पागा याजला नक्त रुपये पाहिजेत तसेच जगनाथ राजाराम यांणीं बांस-वाडा वगैरे चार दिवस काळ काडला तेथेंही पलटणाचा बैदा होऊन तेही पलटण-वाल्यांनीं माघारीं आणले. सरकार स्वारी भानपुऱ्यास आली. तेथें उभयता सुभे जगंनाथ राजाराम व केशवराव माहडीक येऊन दाखल झाले. पलटणचा बैदा त्यात जगंनाथ राजाराम याजकडील पलटणवाले यांनीं चालून घेतले मग तुळसा-बाई आदी करून खटल्यास काढून रामपुऱ्यास रवाना करून, बाळारामशेट व तात्या आळेकर व विठ्ठल महादेव हे भानपूर मुकामीं पलटणचे मुकाबल्यास राहिले. मग पलटणवाल्यास कायल केले, "तुम्हीं सरकार चाकर, पोटास मागावें तें न करितां वाडावर चालून घेतले याचे प्रयोजन काय ?" मग पलटणवाले कायल होऊन सागितलें कीं, आम्हांस लक्ष्मीचा पेगाम आला कीं, तुम्हीं चालून याल तर पैका मिळेल. म्हणोन आम्ही आलो यात काहीं फितुरसा उत्पन्न झाला. मग लक्ष्मीस कैद करून इदुरास पाठविले. दोन हुजरे तोफेचे तोंडीं दिल्हे. पलटणचे कुमेदान कैद करून शिपाई फोडून तलब वाटितों म्हणून गणपतराव दिवाण व कुशाबा बक्षी तीन हजार स्वारानिशी तलब वाटितों म्हणून पलटणात गेले. दोन दिवस राहून गोड गुळचट बोलून विश्वास देऊन बेफाम केलें. तिसरें दिवशीं सूर्योदया-त्प्राग तयारी करून पलटणें लुटून घेतलीं. तोफा बंदुखा टाकून निघून गेले. यांणीं तोफा बदुका गोळा करून आणल्या. दुदरनेकाचे हातचा कपू त्यांतील पल-टण जयद बरबाद झाली तोंहि मागसेही पुनः मिळालीं नाहींत व पलटणेंही भरलीं गेली नाहींत ! ही जरब केशवराव माहडीक याचे बरोबरील पलटणावर पडून, त्यात पाच पन्नास दगाई होते ते काहडून दिल्हे वरकडाचा फडशा केला. असा त्यानीं करून घेतला.

---

(११९) **माराकुटी** – माराकूट, अत्यत त्रास. **तगीरी** – बडतर्फी, कामा-वरून काढणें. **लक्ष्मीचा** – बाईसाहेबांचा, तुळसाबाईचा ? **पेगाम** – प्रेष, निरोप **बेफाम** – बेसावध **जयद** – ? **दगाई** – दगा करणारे, फितुरी.

# मल्हारराव होळकर ( तिसरा )

(१२०) पुढें सन १२२१ कार्तिक शुद्ध ११ स्वारी भानपुरे मुक्कामीं असता यशवंतराव महाराजांचा काळ झाला. दिवस करून मल्हारराव महाराज गादीवर बसण्याचे प्रसंगीं जालमसिंग कोटेकर व लालाजी बल्लाळ आदि करून आले होते. समारंभ होऊन त्यांस बिदा केलें. नतर ढाबळ्यावर छावणीस गेले. तेथून दोन पलटणें दोन पागा समागमें देऊन राजेश्री बाळोजी इगळे याची रवानगी खेचीवाड्यात केली. फौज पलटणें यांची समजूत काढून पुन. छावणी कोहोळ्यास येऊन केली तेथें महाराजांस देवी निघाल्या. नतर अग्निसंस्कार छावणीस झाला त्यात वडिलोपार्जित कागदपत्र व काहीं जवाहीर दग्ध जालें नुकसानी गोष्ट फार मोठी झाली. तेथून कूच करून नजीक भानपूर इद्रगडाखालीं मुक्काम झाला तेथें तीन रोज मुक्काम झाला होता. त्यात महामारीचें उपद्रवानें शेकडों माणसे गारद झालीं. त्रासरूप होऊन तिसरें दिवशीं अर्ध रात्रीस कूच केले शामगड तालुके गरोट येथे छावणीस आले. प्रावृट्काळ चार महिने तेथेंच काढले. त्यात तात्या आळेकर यानी हवा पाहून तीर्थरूपाचे भेटीस जातों, महाराजाचे प्रतापेंकडून मूलबाळ दृष्टीस पडलें आहे, देवदर्शन करून आपल्याला काम पडल्यास बोलावाल ते वेळेस हजरच आहो, अशा भावीं साकर पसरून मैनाबाई अनुकूळ, तेव्हा तुळसाबाई अर्थातच, अशा सधींत दौलतींत हिंडल्या वागल्याचा मोहाजबा व बोलपेशासारखा नमोदसिद्ध करून गौरवपुरस्कर निघाले तो उष्ण काळ दिवस मूल लहान ये विषयींचा जाबताही पुसला तथापि कसे घडेल काय घडेल यास्तव तीर्थरूपास पत्रें लिहून महेश्वरास भेटी व्हाव्या असा बेत केला महेश्वरीं भेटी झाल्या तेथे मुलास विकृति होऊन मूल मेलें. यामुळें बहुत उदास हें वर्तमान तुळसाबाईस, मैनाबाईस समजल्यावर याचे अंतःकरणास वाईट वाटून मातगपोसीस, अपशकून जाला, यामुळें माघारी आणावें याजकरितां रेवाजी फणसे याची रवानगी केली. ते महेश्वरीं

---

(१२०) **अग्नीसंस्कार छावणीस झाला** – छावणीला आग लागली. **प्रावृटकाळ** – पावसाळा. **साकर पसरून** – साखर पेरून. **मोहाजबा** – Fig– Acquittal or cleared state तात्या आळेकरानें दौलतींत जो कारभार केला तो सर्व सरकारांत यथास्थित समजाविला व आपण कांहीं एक अफरातफर किंवा गोंधळ केलेला नाहीं असें सिद्ध करून पटवून दिलें. **बोलपेशा** – ? **मातंगपोशी** – मातम पोसी, दुखवटा, समाचार.

आलियावर यजमानाचें गौरवपूर्वक भाषण श्रवण करून, तीर्थरूपास देशीं रवाना करून माघारी यावयाचा बेत ठरला.

(१२१) तों देशीं नथू फणसे याणीं बंड करून महिपतराव होळकर याचा मूल खास व विदूर दोन्ही बगलेंत मारून फौज ठेवून उद्योग आरंभिला. या गोष्टीस पाच विश्वे समत भीतरपेटे श्रीमताचेही होते. त्या आधारावर फणसे मजकूर मुलास घेऊन जेजोरीस जाऊन मार्तंडाचें दर्शन केलें. पुढें पुण्यास जाऊन एखादी मसलत उभी करावी. हे वर्तमान रामगड मुक्कामी सरकारात समजल्यावर त्यास धरून आणावें असा बेत ठरून आळेकर यास पत्रें तावडतोब गेलीं कीं, परशराम होळकर बमय फौज पलटणेंसुद्धा व रघुनाथ आपाजी उर्फ बाबा पागे व रोशन बेग नर्मदेचे आसपास नेमाड प्रातीं त्याजला चार रुपये खर्चाची अडचण असल्यास कार्याकारण मदत करून, फौज हामराहा होऊन, खानदेशात उतरून, नथू फणसे पोरासुद्धां धरून आणावे, असा बेत करून मग तुम्हीं यावयाचें करावें. मग हीं पत्रें इदूरचे मुक्कामीं आलीं. तेथे मास पक्ष मुक्काम करून, सरदाराची व फौज पलटणाची दिलजमाई करून, पचवीस हजार रुपये खर्चास देऊन, सहा आणे पागे मजकूर याचे बेड्यात व दहा आणे परशराम होळकर याचे बेड्यात हा शिरस्ता जातीने खर्चास दिले. पुढे उत्पन्न होईल त्याचा घाट घालून देऊन आपसात हिल्ला हरकत लौकिकी न दाखविता एकदिलीने रवाब जमवून पोरें व फणशा हस्तगत करावे असा बदोबस्त करून देऊन, फौजा तावडतोब सेदव्याचा घाट उतरून तापी तीरास दाखल झाल्या पुढें दरकूच येणार हा इरादा खानदेश स्वदेश यास समजल्यावर मागें जातीनें यशवतराव होळकर मालक असता पृथ्वीचा घाटावरवटा झाला त्याचा अद्याप उश्वास टाकिला नाही. तेव्हा ही फौज आली असता प्राण राहणे कठीण. महाराजाचे प्रतापाचा जल्लष भारी, फौज अनिवार, श्रीमत धैर्याचा व खबीराचा गाढा. फणसे याशीं बोलण्याचे व इरादे एकीकडे ठेवून सरंजाम जेजोरीस पाठवून दोन्ही मुलें व फणसे मशारनिल्हे यास निजलेले हस्तगत करून खडो महादेव याचे जिमेस केले. आणि फौज तापी उतरून जय अशी पत्रे फौजेस व फौजेवाले सरदारास थेट लगत पाठवावीं म्हणून आज्ञा केली मग खंडो महादेव याणी त्रिवर्ग फौजेंत पोहोंचवून पत्रें दिलीं कीं, तुम्हीं तापी उतरत

---

(१२१) विदुर – अनौरस, लेकवळा. घाट घालणे – तोडमिळवणी करणें, व्यवस्था लावणे. खबीर – मूळ शब्द खमीर, निश्चय. जय – फत्ते. 'फत्ते केली' अशीं पत्रे

आपला मुद्दा घेऊन घाट चढून जावें. असाच लेख सरकारातही गेला. तेथूनही आज्ञा आली कीं, तुम्हीं पेरें घेऊन हुजूर यावें. फौज पेरें घेऊन घांट चढून गेली.

(१२२) इकडे शामगडावरून मुक्काम रामपुऱ्यास आला. तेथें शिलेदार याचा बद्दा मोठा जाहला सात दिवस धरणें एक एक बाडासुद्धां जाहलें. पाणी देखील बाडांत जाऊं दिलें नाहीं. त्याची काहीं तोडजोड होत आहे तों मीरखान येऊन दाखल जाहले. तेव्हां मोठाच राडा पडला. मग नबाबाची समजूत गुगलछब्रडा व निंबोहाडा दोन महाल लावून दिल्हे. त्यांत गुगलछब्रडा किल्ला मातबर. कुटुंबें ठेवावयास म्हणोन दिल्हा. आणि निंब्रोहडा मामलत म्हणून सांगितली. नबाबाचें कूच झालें. राहिले सिलेदार त्याजला दम दिल्हा. तुम्हास रोडगडावर शह देऊन तुमचा फैसला करून देऊ असें बोलण्यांत आणून रामपुऱ्याहून कूच करून नजीक म्हसरोडगड मातेसरीस मुक्काम झाला पुढें महाराजाचे लग्नाकरिता इदूरास ताबडतोब जावयाचें. फौज तलबेविशी बेबहा. आळेकर लष्करात ग्वालेरीस गेले. शेटजींचे जिवावर अवघी करामत तोड-जोड फौज पुढें जुमस खाईना. तेव्हा मराठी फौज यासी कळविले कीं, "तलब आज अथवा उद्या मिळावयाची तशी मिळेलच परतु धनी बाळराजा, बायकाशीं गाठ, लग्न ये वर्षी न झाल्यास पुढें होईल, परंतु जन्मभर ठोंसरा तुम्हावर राहील कीं, आमचे सोयरेधायरे आप्त यानीं पैक्यावर नजर ठेवून मुलाच्या लग्नात वेध पाडला. महाराज असता असें कोणीं केलेंच नाहीं, बायकामाणसें पाहून ओळख सोडली याचा मात्र विचार करा तेव्हा मराठमडळ यास अदेशा पडून, मेळ आपसात विचार करून, कूच करावें असें ठरले पठाण याची समजूत झाली नाहीं. मग सरकारचे कूच होऊन दरमजल इंदुरास आले. शेटजी पठाण मडळ घेऊन भानपूर मुक्कामीं राहिले नित्य धरण्यापारण्याशीं गाठ तथापि शेटजी ( ची ) माया विशेष मास पक्ष फोडा भागून दम देऊन लग्नाचे पहिले दिवशीं येऊन दाखल झाले. वैशाख शुद्ध सन १२२४ चे सालीं ( लग्न ) झालें. सोयरीक त्रिंबकराव देशगावडे यांचे कन्येशीं झाली समारभ फार मोठा झाला.

---

( १२८ ) शह देऊन – शह देऊ (जुन्या ऐतिहासिक कागदपत्रात कित्येक वेळां अनुस्वाराबद्दल पुढें ( न ) असें अक्षरच लिहण्याची पद्धत असे. येथें शह देऊन म्ह. शह देऊ शह – हवाला. दम देणे – आश्वासन किंवा धीर देणें बेबहा – बेबद, विथरलेली ठोसरा – आरोप, शब्द. बायका माणसें पाहून ओळख सोडली – कोणी कर्ता पुरुष राहिला नाहीं. फक्त बायका माणसें उरलीं असें पाहून त्यांना नडविण्यास सुरुवात केली असा बेईमानाचा आरोप तुमच्यावर येईल. फोडा भागून – ?

( १२३ ) नंतर सन १२२५ चे अव्वलीस आषाढमासीं कूच करून धनवडचे मुक्कामीं आले. दरम्यान कळशास मुक्काम झाला होता. तेथें गांववाल्यांनीं गोळी वाजविली. याजमुळें स्वारी चालतां चढे घोड्यानिशीं हल्ला केला. कांहीं रांगडे पळाले. कांहीं राडापोरानिशीं धरून आणले. धनपटेस आल्यावर सिलेदाराचा बड्डा पुन्हा झाला. तात्या आळेकर शिंद्याचे लष्करातून शिंदे याचेविशीं सावकार घेऊन आले होते, ते परभारें कोव्यास राहिले. लष्करात आले नाहींत. त्यासी आणावयासी विठ्ठल महादेव व शामराव पांडुरंग प्रथम गेले. याची दाद न लागता फिरून आले मग मैनाबाई जातीनें गेली. हिनेंही बहुत प्रकारें समजाविले. तथापि न येता मैनाबाई फिरून आली तात्याचें येणे न होय ही गोष्ट तुळसाबाईचे मनात वाईटशी वाटून गणपतराव नारायण याचे हातें कामकाज घ्यावे, ऐसा भितरपेव्या कार ठरला. हा मैनाबाईस टाकून सचणी होऊ लागली ही गोष्ट तिजला असाह्य होऊन पलटनचे काम मैनाबाईकडे, पलटणात बैदा होताच, त्याचे समजुतीस जातें असे म्हणून पलटणात गेली रामदीन मैनाबाईचे पेंच्यात, तेव्हा खूळ करावें अशा करण्यात प्रवर्तक होऊन, बाईस समजल्यावर रामदीनास परभारें कैद करून पलटणवाल्याची खातरतसलीम करून मैनाबाईस कैद करून बिजलपुरास पाठविलें.

(१२४) तात्या आळेकर याजला कसेंही करून आणावें आपले कृत्यास विपर्यास होऊ पावणार नाहीं. असा निश्चय करून कपूरखा याजला व मिरसेदुदीन सारंगपूरकर पठाणमंडळपैकीं शहाणा माणूस व जमियतीचा धनी आणि प्रामाणिक उभयतांस पाठवून, भुलथाप देऊन, तात्यास घेऊन आले इकडे विठ्ठल महादेव व गणपतराव नारायण याणी कारभार करावा असे खचीत ठरून, तात्या आळेकर याजपासून पैका घ्यावा, असे उकाल निघू लागले. तेव्हा आळेकर कपूरखाचे गोठात जाऊन राहिले. त्याचे मुनीम माधवराव गणेश हे खासगीचे कामात याजवर हुजुरात वगैरे याची धरणींपारणीं होऊ लागली त्यात बाळाराम शेट व माधवराव गणेश याणीं शक्कल ही काढली होती कीं, ज्यात दौलतीचा बंदोबस्त प्रतिकूल त्याचें पारपत्य पारंपरी बोधास उचीत अशी शक्कल. परंतु आळेकर

(१२३) कार – करार. **मैनाबाईस टाकून** – मैनाबाईस न कळवितां. **खूळ करणें** – दगा करणें, बंड करणें. **बाईस** – तुळसाबाईस. **खातर तसलीम करून** – खात्री करून, आश्वासन देऊन, अर्थात् तुमचा पगार वेळेवर देऊ, व बंड केल्याबद्दल तुम्हास शासन करणार नाहीं अशा अर्थाचें आश्वासन देऊन.

(१२४) **उकाल** – ओकाऱ्या भावार्थ तात्या आळेकरास लुबाडावें असे पोटांतलें भावगर्भ बाहेर येऊ लागले.

इवालदील होऊन रुकारात आले नाहींत. याजमुळें ती पैरवी मनचे मनात राहून विठ्ठल महादेव व गणपतराव नारायण यांणीं पर्याय काढला. शिलेदार पलटणाची निकड सतल बसावी असा ठिकाण दिसेना. सबब गगरोडचे किल्यावर जाऊन फौजेस जाब द्यावा. असा नमूद भितर पेटे सिद्ध करून, जावयास निमित्त सरकारांत पाच रुण दुमजला बाधले होते, त्याजवर दिवाभीत येऊन बसलें, तेव्हा येथें राहणें चागले नाही, गगरोडास चालावें, असा निश्चय करून कूच केलें. गगरोडास येताच बायाच्या पालख्या व महाराज किल्लेदाखल झाले. त्या सधीत आळेकर टाळा देऊन कोट्यास गेले. पुढे फौज तरंगली शेटजीसुद्धा व कारभारीसुद्धा शहरात दाखल. फौज शहरात येण्याची परवानगी नाही फौज बाहेर, हे आत असे चार महिने निघोन, पुढे पलटणवाल्यानीं कट करून, काही पहारे किल्यावर अरदल्ली खाशापाशीं होते, कार्तिक शुद्ध १५ ग्रहण होतें त्या सधींत पाच चारशे माणूस हल्ला करून दरवाजावर आले. गणपतराव दिवाण याजला धरून दरवाज्यावर आणलें. विठ्ठल महादेव सावध होऊन किल्यावर गेले. तों लष्करात जोतिबा नाईक याजला समजताच शभर बारगीर घेऊन दरवाजे अवघे पलटणवाल्याचे स्वाधीन तेव्हा मधीच गावकूस चढून शभर बारगिरानिशी किल्यावर गेला. किल्ला आवळून पलटणचीं माणसें दामदस्त अरदल्लीसुद्धा काहडून दिले पलटनवाल्यानीं गणपतरायास पलटणात घेऊन गेले तेथें तलबेचा फडशा करून घेऊन तोफा बंदुका मुकुदद-याचे आत दाखल झाल्यावर तुमचे स्वाधीन करू असे बोलण्यात आणोन, वाली दोन घेऊन, कूच करून गेल्यावर गणपतराव किल्ल्यावर पोहोचवून दिल्हे. गणपतराव किल्ल्यास आल्यावर हुजूरच्या पलटणीचा बइदा झाला पुढें बाहेरील पलटणे रोशनबेग वगैरे तेही येऊन पोहोचले. तात्या आळेकर तर निघून गेलेच होते. राहिले बाळाराम शेट व माधवराव गणेश, त्यात माधवराव गणेश पाहऱ्यात होतेच राहिले बाळाराम शेट तेही कैद कले मासपक्ष कैद होते. पुढे त्याचे शरीरास विकृति होऊन काळ झाला. तो पलटणे बाहेर तैनातीस होती तीं अवघीं जमा होऊन आलीं. त्याची निकड त्यात मैनाबाईकडील हरीसिग कपतान जिनसींत होता तो कैद करून मारहाण केली. तो माघ शुद्ध १४ स पलटणें चढून आलीं. इकडूनही हुजरात पुढे होऊन बाया निघून भोजखेडीस आल्या. पलटणें व पठाणमडळ व कपूरखां अवघे एकत्र होऊन, गाठ बाधून, रामपुऱ्यास आले भोजखेडीचे मुक्कामीं रामदीन कैद होता. त्याजकडे काहीं ऐवज घेणें ठरला तो

(१२४) **सतल** – पक्की, जाम. **दिवाभीत** – घुबड. **वाली** – वोली असे पाहिजे. **वोल** – ओल Hostage. **जिनसी** – तोफखाना.

विठोबा तात्याकडे भरणा करावा असा करार. त्यात कांहीं देऊन कांहीं देऊं दिलाऊ अशावर काळ काढला. एके दिवशीं जोतिबा नाईक शेंपन्नास बारगीर घेऊन जाऊन ऐवजाविषयीं तगादा रामदिनास सक्त केला. त्यानें चोहों दिवसाचा करार करून रामजी सेडगे वगैरे सिल्लेदार फोडून पळून गेला. तोही जाऊन पलटणात सामल झाला. मग सरकार रामपुऱ्याचे मुक्कामीं येऊन, तेथून विठ्ठल महादेव व जालमसिंगाकडे जाऊन त्याजला दरम्यान घालून, पलटन सिल्लेदार याची तोड काढून, पलटणें सिल्लेदार सरकारास भेटावें असें ठरलें. नंतर तुळसाबाईचा इरादा श्रीमतास जाऊन सामल व्हावे विठ्ठल महादेव याणी जालमसिंगास दरम्यान घालून फौजेचा मार्ग काढला. परंतु पैक्यास ठिकाण कोणता ? तेव्हा ठाकूरदास याचे विद्यमाने दिल्लीचा फिरगी लोणी अक्त्यार याजकडील पैगाम आणिला कीं, " तुमचे फौजेचा हिशेब होऊन पैका निघेल तो आम्हीं देऊ, व तुमचा मुलूख तुम्हाकडे आहे, तो आहेच. दहा लक्षाचा मुलूख तुम्हाकडे आणखी अतरवेदींत देऊन तुम्हीं माळव्यांत स्वस्थ असावें, श्रीमताकडे जाऊ नये व आम्हाकडेही सामल होऊ नये " असें बोलणें खचीत करून भलावणीची चक्ती जहनसाहेब व मालकणसाहेब पेंढारी याचे पारपत्यास नर्मदा उत्तर तीरास होते त्याजवर आणली हें राजकारण घेऊन विठ्ठल महादेव पाटणचे छावणीहून अहूरचे मुक्कामीं आले.

(१२५) तो गणपतराव दिवाण व तुळसाबाई व जोती नाईक याचा विचार खचीत होऊन इकडे तिकडे मन न कचविता वडिलोपार्जित श्रीमताचे गादीशी क्रिया आहे तिजवरच मुस्तकीम राहून श्रीमताकडे जावें यातच जें होईल तें होवो शिळास बट्टा लाऊं नये. पलटणें फौजेची अडचण आहे, त्यास आपण जाऊन पोंचले असता श्रीमंतही पैका देतील. त्याचेही बोलणे खचीत आहे ते पक्षीं नेक सल्ला हीच विठ्ठल महादेव याणी फिरग्याकडील राजकारण आणलें होते ते काही एक ध्यानास न आणिता आपले इतिकर्तव्यास विठ्ठल महादेव प्रतिकूळ. तेव्हा याजपासून चार रुपये घेऊन पलटण फौजेची थोडीबहुत समजूत करू हें मनात बाळगून विठ्ठल महादेव याणीं पलटण सिल्लेदार यांजला दीड लाख रुपये देऊन सिल्लेदार याशी बोलणें खचीत केलें कीं बाईसाहेबाची भेट झाल्यावर तुम्हाशीं बोलण्यात आले आहे याप्रमाणें उलगडा करून देतील असें बोलोन सिल्लेदारास बरोबर घेऊन आलेच होते. पलटणाचे खातरींत काहीं कसर होती. तों सिल्लेदार

(१२४) **दरम्यान घालणे** – मध्यस्थिस घालणें. **लोणी अख्त्यार** – अख्तर लोनी. **चकती** – पत्र.

(१२५) **इति कर्तव्य** – योजना.

भेटल्यावर रामदीन पलटणांत होते, यांणीं तात्यास सोडून सरकारांत पैगम लावून काहुराहून कूच झालें ते दिवशीं चालते स्वारींत येऊन मुजरे झाले. तोफा खुटल्या. स्वारी पुढें मुक्कामास गेली. मागें पलटणें आलीं तीं कोसा दोन कोसाच्या अंतरानें राहिलीं. तुळसाबाई व दिवाण यांचे मनांत विठ्ठल महादेव यांजविषयीं पाप होतें. सिलेदाराचं ठरावाचें बोलणें ऐकून घेऊन, सिलेदारास आंतून सांगून दिल्हें कीं, तुम्हीं आपले तलबेचा फडशा मशारनिल्हेपासून करून घेणें तेव्हां सोडणें. मग सैदुदीन सारगपूरकर याजला किलेदारानीं पुढें करून विठ्ठलपंत तात्यास देवडीवर बिचोबा देऊन ठेविलें. भंवताले सारंगपूरवाल्यांचे चवकीस पठाण. चालते स्वारींतही त्यांचे पालखी समागमें शें दोनशें स्वार त्यांचेच सरकारचा रामराम झाला. दरकूच महत्पुरास आले तेथेंही पलटणें हीं दाखल होऊन पाठीमागें अदकोसाचें अंतर राहिलें. विठ्ठल महादेव देवढीवर नजरबंदींत महत्पुरास आले. तेव्हा पलटणें फिरंग्यांचीं नर्मदातीराहून उज्जनीस आलीं पुढें लाला सीताराम कायथ सरकारात पाठविला कीं, " तुमचें आमचें बोलणें विठ्ठल महादेव याचे विद्यमानें ठरलें आहे. त्याजवर मुस्तकीम होऊन फौजेचा राडा उरकोन श्रीमंताचा सेवाधर्म कायम ठेवू. कपनीन्या घरचीही दोस्ती सपादावी, आपलाही वोहोमा शाबूत राखावा. " अशा भावीं बोलावयास पाठविलें. श्रवण करून लाला राखावा, त्या सधींत फौजेची तोड पाडून सडी स्वारी घोडा राऊत दोहों दिवसात नर्मदापार होऊन तापीतीर पहावें, आपले पलटणाची समजूत जाल्यावर आबळून सांभाळून मागाहून येतील, असा बेत ठरावून आपल्याकडून बोलण्यास बहिरो अनत सबनीस पाठविले.

(१२६) मशारनिल्हे रवाना केलियावर तिसरे दिवशीं पलटणवाले व हुजरात एकत्र होऊन पलटणवाल्यानीं गणपतराव नारायण दिवाण धरून पलटणांत नेले. महाराज बाडात कचेरीचे जागा खेळत होते तेथून हुजरातवाल्यानीं बाहेर आणोन हातधोंड्यावर बिचोबा देऊन कनात लावून तेथे ठेविले तो मागाहून मुख्य मासाहेब बाहेर पडून महाराजापाशीं आली तुळसाबाईही यावयास लागली तों पलटणाचे आपसर व बारगीर आडवे होऊन धमकाऊन आत घातलें. विठ्ठल महादेव पाहऱ्यात होतेच. त्याजला मार्गशीर्ष शुद्ध ११ स प्रेमसिंग कपतान याणें पलटणांत नेले तेव्हा माणूस कोणी राहिलें नाहीं.

---

(१२५) **बिचोबा** – बिन खांबाचा तबू. विठ्ठलपतास कैद करून एका राहुटींत ठेवलें. **वोहोमा** – बोज, प्रतिष्ठा.

(१२६) **हातधोंडयावर** – हातानें फेकलेला धोंडा जाऊन पडेल इतक्या अतरावर.

(१२७) मग रोशनबेग वगैरे आपसर एकत्र होऊन हुजरातवाले सदरदीन हवालदाराकडील त्यांत कपूरखा कमकसर दोन अडीचशें माणूस मसलतीस बसले. त्यांत विचार होऊन बहिरो अनंत सबनीस दसनसाहेब मालकीणसाहेब याजपाशीं पाठविलें होतें. त्यांजला पत्र ल्याहावें असें ठरून सरकारचे नावें कागद लिहिला कीं, " सरकारात पलटणचा दगा जाला आहे. एक दोन रोजात बंदोबस्त होऊन तिकडील बोलण्याचा क्रम आहे त्यातील हांसल ध्यानास आणोन उत्तर लिहिण्यात येईल याप्रमाणें बोलावें. दोन दिवस महकुबी असावी. " असें पत्र रवाना करून सरकारचा खेळखाना व लष्कर पलटणचे बुणगे सडे झाडून नरवर मुक्कामीं राहिले द्वादशीस रात्रौ तुळसाबाईस काहीं विकृत होऊन देहावसान झालें बहिरो अनत हया पाहून, ताब्रास पुसून लष्करात आले.

(१२८) तो मागोमाग पलटणें मुकाबल्यास आली सरकारचे पलटणपैकी रोशनबेग व रोशेनखा दोघाचीं पलटणे दोन मुकाबल्यास क्षिप्रा आडवी होऊन लयन बाधली. त्याचा याचा अदकोस पाऊण कोसाचे तफावतीनें गोळा सुरू झाला. दोन पलटणानीं असा मार दिल्हा कीं, ताब्राचीं दोन पलटणे बरोबर झालीं. सहाशे गोरा, अठराशें पलटणचें माणूस मारलें गेलें त्यात मुख्य दसनसाहेब कामास आले. महाराजाचें बारा वर्षांचें वय, परतु दोन तरवारा, खाद्यावर बासडा, सडा घोडा घालावा हेंच बोलणे. गोळे चालत आहेत. महाराज उभे त्या ठिकाणीं गोळ्याचा पाऊस होता त्या संधींत श्रीमताकडील दोन हुजरे पत्रें घेऊन आले. त्यांत जेवीत असाल तरी आचवावयास येथें येऊन सामल होणे पत्रें श्रवण करून लढाई ताब्राची शिकस्त होऊन दोन कोस दाखविली. अशा सधीत स्वारानीं हल्ला करावा, फौजही मुबलख, परतु कारभारी याचे आळाबधन नाहीं.

(१२९) दुसरे द्वादशीस रात्रौ चार पाच खासे पठाण मंडळपैकी व मराठ्याकडील पैकीं मिळोन, कारभारी तरी कोणी नाहींच, तेव्हा प्रथम सदरदीन हवालदाराकडे गेले. बोलले कीं, " साज सकाळ लढाईचा इरादा. फिरंग्याशीं लढाई. घोडें माणूस पडेल, जखमी होतील, याचें बोलणें आम्हीं कोणाशीं बोलावें ? आमची बरदास्त कोण करील ? कोणीही कारभारी असता तुम्हाकडे यावयाचें

---

( १२७ ) **सरकारचा खेळखाना** – होळकरांचा धनी बाळराजा होता, अर्थात् त्यासाठी निरनिराळे खेळ बरोबर स्वारीस बाळगावे लागत तो स्वतत्र कारखानाच असे. **ताब्र** – इग्रज

( १२८ ) **बरोबर झाली** – जमिनीबरोबर झाली, जमीनदोस्त झाली. **दोन कोस दाखविली** – दोन कोसपर्यंत इग्रजांची फौज पळवून लाविली.

कारण नाहीं. धनी बालराजा. यास्तव तुम्ही दौलतीचे पुराणे रफीक यास्तव तुम्हांपाशीं आलों आहोंत. याचा विचार आम्हांस काय सागता ? " सदरदीन हवालदारांनीं उत्तर केलें कीं, तुम्हीं चौघेही बेडेवाले तसा माझाही एक बेडा मानावा कारभारी काणी राहिलाच नाही. तेव्हा धनी आपला बारा वर्षांचा, त्याजवर लक्ष ठेवून, सर्वांनीं एकदील होऊन नक्षा राखावा. नक्षाचे पोटी आपला जखमाना मोताना तलब धनी देईल. आपण घेऊ. या समयी बारा अंदेशा काहडले असता आपल्या हातून काही होणार नाही आणि दौलत गारद होईल ते पक्षीं आपले कुळशिळावर नजर देऊन, आज पावेतों कैलासवासी महाराजानी आपल्यास काही एक कमी न करिता लढाईचे प्रसगी जातीने तरवारा मारून आपला बोहोमा ठेवीत होते त्याचे स्मरण आजचे प्रसगी ठेवून, आपला बाळराजा याचे नक्षास्तव आपला प्राण वेचून दौलत कायम राखल्यापोटी आपली अडचण भरून घेऊ व सरकारही देईल. " अशा भावी काव्यादाव्यान्च्या गोष्टी सागितल्या यात सिलेदाराची हिंमत काहीं एक राहिली नाही तेथून उठोन बाहेर आल्यावर अपसात बोलू लागले कीं, सदरदीन हवालदार म्हणजे महाराजानी चिरंजिवासारखा मरातब राखून मागें पुढे वक्त बेवक्त पडल्यास डोकी देईल अशा भरंवशाची माणसें त्यांची शकल तरी ध्यानास आली. पुढे पलटणवाले व कपूरखा याजकडेही जाऊन त्याची उमेद काय आहे ती पाहू. बाकी देणें घेणें सन्मान करणें हा धनीचा धनीच करील. कोणी घरींहून देत नाहीच परतु तोडाचे बोलण्यास याचें काय वेचतें ? असे बोलून पलटणात गेले तेथेंही बारा हुकूम त्यांनींही अशाच गोष्टी सागितल्या. तेथून कपूरखाचे येथें आले त्यानी तरी नेहमींच हिंमत सोडली मोठा भरवसा मीरखानाचा त्याजला मनसोब्याचा आकार ध्यानास आणून सामल होण्याविषयीं हुजरे व पत्रें दररोज रवाना होत गेली. त्याचीं उत्तरें आलो म्हणून मात्र आलीं भविष्यानुरूप बुद्धीस

---

( १३५ ) **रफीक** – स्नेही **बेडेवाले** – बेहडेवाले, एकका स्वतत्र कपूचे अधिकारी. **जखमाना** – लढाईत जखमा लागल्या तर सरकारातून शिपायास औषधपाण्यासाठी मिळणारी रक्कम. **मोताना** – शिपाई मेला तर त्याबद्दल त्याच्या उत्तरकार्याकरिता सरकारातून मिळावयाची रक्कम **तलब** – पगाराची बाकी. **बारा अंदेशा** – नसत्या तक्रारी. **राखल्या पोटी** – राखली तर. **आपली अडचण भरून घेऊं** – आपलें झालेलें नुकसान भरून घेऊ. **बेवक्त** – कठीण प्रसग. **शकल** – विचार **कोणी घरींहून देत नाहींच** – कोणीही स्वतःच्या पदरचे काढून देत नाहीं. सवजण सरकारचा हवाला देतात.

विपर्यास होऊन बधुत्वाचा शिरोभाग केला. इकडे येतों म्हणून उत्तरें येत गेलीं तिकडे कोणी आप्त याशीं मेळ करून त्याची कन्या आपले पुत्रास केली. याप्रमाणें फितूर होऊन सिलेदारास कोणी अग न दिल्यामुळें आपले ठिकाणी बाज खाऊन तांब्रानीं पाठ दिल्यावर कोणीही जीव झोकला नाही

(१३०) इतक्यात हरामखोर होते त्यानी हलकारे पाठविले की तुम्हीं का पळता ? आमचे पळण्याची तयारी झाली. तेव्हा उलटून माघारा ठिकाणास येऊन. पेमसिग सहा पलटणाचा मालक हा फितुरास आला होता, तो क्षिप्रेतीरीं मागें बाजूस होता मग त्यानीं रोशेनबेग व रोशेनखा मुकाबल्यास होते त्याचा मोहोरा सोडून, पेमसिगाचे पलटणातून उतरून, तीन हजार स्वार एकदा तीन हजार पिस्तोलाची देवढ दिल्ही. त्यात सरकारी सरजाम याचे पाय उठले ते समयी महाराजाबरोबर हुजरातपैकी शेपन्नास स्वार व ब्रह्मवृद मडळी इतक्यानिशीं अमेटचा रस्ता धरिला फिरग्यानी तीन कोस पिन्छा केला येणें कडून पार पडले मागे बायका, देव, जामदारखाना, हत्तीचें निशाण अवघे त्यानी समेटलें त्या प्रसंगीं मिराभाई याने हत्तीचे निशाण आणले. बायका काहडून आणण्यात सुलतानजी बाहड व हरिबा होळकर व सदरदीन हवालदाराचा जावई व लालमण होळकराचा पुत्र हिरामण व दलसिंग कुवर इतक्यानी घोडे घालून श्रीमत सौ जिजीबाईसुद्धा काहडून आणल्या. सदरदीनाच्या जांवयास जखम तोंडावर आली परतु बायका काहडून आणल्या बाकी अवघी दौलत गारद झाली.

( १३१ ) सरकार निघून एकटेच चार घटका दम खाऊन अर्ध रात्रीचे समयीं गडगुन्याचे समीप दम खाल्ला तेथे पलटणची माणसे गणपतराव दिवाण व विठ्ठल महादेव याजला घेऊन आले मग तेथून पुढे चालले. तो चर्मण्वती उतरून मुक्काम केला जखमी व घोड्यास चदी मुदबख काही एक नाही. तारोळा एकसारखा. मग मासाहेबानी बाडात कांही ऐवज शिलकेस होता त्यातून कांही ऐवज देऊन चंदी मुदबख केले. मग विचार करून विठोबा तात्या याजला पलटणातून आणून, त्याची खातरी करून, ते दिवशी मार्गशीर्ष १४ स उभयतास वस्त्रें दिल्हीं. तेथून कूच करून सितामहु मदोसर याचे मधीं मुक्काम करून पुढें प्रतापगडावर मुक्काम केला तेथून राजश्री विठ्ठल महादेव सलूखाचे बोलण्यास

(१२९) **शिरोभाग** – शिरोभग. **बाज खाणें** – भीति खाणें.

(१३०) **समेटले** – काबीज केले

(१३१) **चंदी मुदबख** – घोड्यास दाणा व शिपायास जेवण **तारोळा** – तारांबळ

मल्कण साहेबाकडे पाठविले. तेच दिवशीं छापा फिरंग्याकडील आला. परंतु छपेवाल्यांस आज्ञा होती कीं, त्याजकडील पुढें बोलण्यास येऊन मार्गांत तुमची त्याची भेट झाल्यास तुम्हीं त्याशीं खटका न करितां व पुढेंही न जाता माघारीं यावें. असें सांगितलें होतें. तों मार्गांत छाप्याची व विठ्ठल महादेवाची गांठ पडली. मग छपेवाले व मशारनिल्हे पलटणात दाखल झाले नंतर यांची त्यांचीं बोलणीं बहुता प्रकारचीं होऊन कार ठरला. मुकुंदद-यापासून सेदव्याचे डोंगरपर्यंत होळकर बहादर यांचा अमलफैला राहील. त्यात मीरखा व कपूरखा याची जहागीर चालत आली त्याप्रमाणें चालावी. याशिवाय पचपहाड, गगरोड, डग, आहूर हे चार महाल कोटेवाल्यास दिल्हे. दोन्ही डोंगरामध्ये तुम्ही स्वस्थ असावें जेथें रहाल तेथे तुम्हाशीं आमचा गोरा व दोन कपन्या राहतील तुम्हापासून पाच कोसावर दोन पलटणे आमचीं राहतील असा तह ठरून तहनामे यान्या यादी परस्परें जाल्या

( १३२ ) इकडे सरकारचा मुकाम प्रतापगडावर होता. तेथून कूच करून भाऊगड परगणे मदोसर येथे आले. तेथें सिलेदार रामजी शेडगे वगैरे काही पठाण व रामदीन व दीक्षित याणीं विचार केला कीं, विठ्ठलपत तात्या आल्यावर आपला प्रात शुद्ध नाहीं पक्षीं येथे राहून अब्रू मलीन करावी हें चागलें नाही कमकसर पाच हजार स्वार कूच करून श्रीमंताकडे गेले. मागाहून फिरग्याच्या रजबणाही धावल्या. परंतु गाठ पडली नाहीं. हे जाऊन श्रीमतास सामल झाले. मागाहून विठ्ठलपंत तात्या भाऊगडास येऊन पोचले काही ऐवज फौजेचे समजाविसीकरिता मलकण साहेब याणीं दिल्हा मग येथून कूच करून रामपुऱ्याहून मौजे देवरी तालुके भानपूरा चर्मण्वतीचे काठी छावणी झाली येथील मुक्कामी इंग्रजाकडून अग्नीसाहेब उटाच्या रजबणीचा मालक तो रामपुऱ्यास मुक्काम करून होता. तहनाम्यातील कराराप्रमाणें छावण्या जाहल्या. मागाहून मलकणसाहेबही परामर्षास आले. ते मास पक्ष राहून असेरीचे किल्ल्यावर बाजीरावसाहेब होते त्याचे तोडजोडीस गेले. नंतर देवरीहून कूच होऊन भानपुऱ्यास मुक्कामास आले. दसऱ्या पावेतों भानपुरींच होते. सिलेदाराची वगैरे कबजे करून तोड पाडली. महालानिहाय व पागा व सिलेदार पुढील वीस रोज वगैरे धरबंध करून कोणेही गोष्टीचा कज्जा

---

(१३१) **खटका** – खटला, तटा.

(१३२) **आपला प्रात शुद्ध नाहीं** – आपली धडगत लागणार नाहीं. **रजबण** – रेजिमेंन्टचा अपभ्रंश. **कबज** – शिपायाकडून पगार पोंचल्याबद्दल लिहून घेतलेली पावती. **पुढील वीस रोज वगैरे धरबंध करून** – पुढील वीस दिवसाचा पगारही शिपायास अगोदर दिला.

ठेविला नाहीं. दौलतीचा अजमास पाहून सिल्हेदार जितके ठेवावयाचे तितके ठेविले. भाजीभाकर देणें ती समयास ज्याची त्यास प्रविष्ट व्हावी. महालाचा बंदोबस्त रसदेची कवडी न घेता चोहों हप्त्यांनीं ऐवज घ्यावा असा धरबंध करून, भानपुऱ्याहून इंदुरास येण्याचा विचार करून, दिपवाळी उज्जनी मुक्कामीं झाली. कार्तिक शुद्ध ५ स इदुरास दाखल झाले.

(१३३) महत्पूरचे लढाईंत दौलत बरबाद होण्यात कसर राहिली नाहीं. इंदूर मुक्कामीं आल्यावर मलकणसाहेब याणीं श्रीमार्तंडादि देवपूजा मात्र आपले फौजेंत गोळा करून आणून दिली बाकी काहीं एक राहिलें नाहीं. ते विठ्ठल महादेव यांणीं बैठकीचे पोटीं जवाहीरखाना, कापड, हत्तीचें सरजाम, घोड्याचे सरंजाम चांदीसोन्याचे तयार केले. भाडीं बाडात न ताट न वाट्या ( न ) पलग सोहलतीचे पोटीं दौलत पुनः उभी केली. दौलतीचीं माणसे दरखदार मामलेदार वगैरे कोणास उपोषित राहूं दिलें नाहीं. ज्याचें अन्नोदक उठलें त्यास त्यानीं तरी काय करावें ? त्याजला स्थळातर करणें प्राप्त झालें ऐसे थोडे पाच चार असाम्या. वरकड थोड्य बहुतानें स्थापना केली. इदूर मुक्कामीं आलियावर अग्नीसाहेबाची बदली होऊन वलदलीसाहेब आले. मलकणसाहेब होतेच. पुढें चौका वर्षांनीं मलकणसाहेबाचीही बदली झाली. मुंबईस जाऊन मुख्य विलायतीस गेले.

(१३४) इकडे चार हलकीं माणसें धन्याचे तोंडी लागून धनी बाळराजा दूरादेश विचार न होता कांहीं फितूर झाला. साज सकाळ मसलत नमूद व्हावी. तो मग भेद झाला. बडे साहेब महाराजापाशीं आले. महाराजास विचारलें, 'हा विचार आपले आज्ञेवरून झाला किंवा कसें आहे ?' तेव्हा महाराजानीं कानावर हात ठेविले. आणखी विचारलें कीं, विठ्ठल महादेव यानीं बदोबस्त करावा कीं न करावा ? अशीं आज्ञा झाली. मग उठोन विठ्ठल महादेव याजकडे गेले. त्याचे पदरीं हा दोष घालावा कीं, दौलत तुमचे डोक्यावर. दोन महिने घटवटणा होत असता तुम्हांस खबर नाहीं. यातील अर्थ तो काय ? अतःपर बंदोबस्त करून सावधानी ठेवीत जावी. असा दोष लावून आपले ठिकाणास गेले.

(१३५) नंतर बापू विष्णूस विठ्ठल महादेव यांणीं मासाहेबांकडे पाठविलें कीं, मासाहेबास पुसावें. झालें तें बरेंच झालें. पुढें बंदोबस्ताविषयीं आज्ञा कशी ? मासाहेबानीं खातरी केली कीं, तुम्हीं कांहीं एक मनात अंदेशा न आणितां जे हरामखोर या मसलतींत असतील त्याचें पारपत्य करावें. या भावीं खातरतसलीच्या गोष्टी

---

**(१३३) बैठकीचे पोटीं** — बैठक बसवून. व्यवस्था, तजवीज लावून. **सोहलतीचे पोटीं** — सावकाराकडून सवलतीच्या दरानें कर्जें काढून.

बापू विष्णू यांनीं येऊन सांगितल्या. त्याजवर जे जे या मसलतींत होते त्यांजला धरून आणले. त्या सधींत रावजी त्रिंबक, नर्मदेचे पुरानें महेश्वर वाहून गेलें, शेट-सावकार यांचें नुकसान सर्वोपरी झालें, त्यांचे खातरतसली करून आबादी करावी याजकरितां गेले होते, त्यांजकडे साडणीस्वार पाठवून तावडतोब घेऊन आले. रावजी त्र्यंबक आल्यावर जसा ज्याचा आचार तसें त्यास शासन करून काढून देण्याचें ते काढून दिले कामांतून काहाडावयाचे तेही काढून टाकिले. किल्ल्यावर पाठवावयाचे ते किल्ल्यावर पाठविले याप्रमाणें आचरण यथाशिक्षा करून पुढें बदो-बस्त पूर्ववत केला. त्याजवरही पांच चार वर्षें राजास राज्य प्रजेस चैन असें चाललें. सन १२३५ चे सालीं माघमासीं विठ्ठल महादेव याचे पाठी पुटकळी झाली. त्याचा उपाय करताना गुणावह न होता दिवसादिवस अधिक होत चाललें छावणींतील डाक्तर उपाय करीत होता त्यानें छावणीत हवा खाण्यास नेले एक दिवस तेथें होते. तेथें काहीं प्रकृतीस ग्लानी विशेष आढळून आली बडेसाहेब हवा खाण्यास गेले होते ते सागून गेले की आम्हीं येऊ तोंपर्यंत तुम्हीं जाऊ नये. याचे प्रकृतीस न माने. तेव्हा फाल्गुन वद्य ५ प्रातःकाळीं घरास आले. घरी येताच सर्व प्राय-श्चित्तपूर्वक तुळा केली. तों शरीर व्यापून अवसान–काळ प्राप्त जाला. पंचमीस अर्ध रात्रीचे समयीं दत्तक घ्यावा असें ठरवून, लेकीचा मूल घ्यावा, असें मासाहेब महाराज दरखदार सरकार आश्रित, शास्त्री, पुराणिक वगैरे अवघे बोलावून सर्वानु-मते निश्चयात आणून, सूर्योदयात्प्राक् दत्तविधान होऊन माडीवर घेतला नतर वद्य ६ स दीड प्रहर दिवस चढता देहावसान झालें नतर बडेसाहेब आले. त्यांनींही बहूतच गमी मानली तात्यासारखे माणूस गेले आमची भेट झाली नाहीं. त्या सधींत बाईनें सहगमनाविशीं आग्रह विशेष केला. मग मासाहेब व बडेसाहेब यांनीं खात्री फारशी केली तेव्हां महकूब होऊन दहन केले.

(१३६) पुढें कारभार रावजी त्रिंबक करूं लागले. तो सन १२३६ चे वैशाख शुद्ध ११ पावेतों कारभार केला. खावदाचें सधान ठेवून काम केलें नाही. सबब द्वादशीस रावजी त्रिंबक यासी बिदाकीचीं वस्त्रें होऊन कारभाराचीं वस्त्रें दामोदर काशी किंबे यासी झालीं. त्यांनींही माहे जमादिलाखर ऊर्फ मार्गशीर्ष मास सन १२३७ पर्यंत वहिवाट केली. परतु आक्रमणाचे कमती यामुळें बदोबस्ताची गोष्ट दिसून आली नाहीं.

---

(१३५) **यथाशिक्षा** – यथायोग्य **गमी** – दुःख, श्रम.

(१४०) **बिदाकीची** – निरोपाची. **आक्रमणाचे कमती** – आवर घाल-ण्याच्या कामीं असमथ.

( १३७ ) मग मासाहेब व महाराज एक विचार करून आपाजी कृष्णराव फिरंग्याचे साहेबींत वागलेले कर्तृत्वाची व सौजन्याची कीर्त परस्परें ऐकिण्यांत विशेष. ते आग्रजाचा संबंध सोडून अनाहूत आले होते त्यांचीं बोलणीं होऊन, कारभाराची सोंप झाली. या दौलतीस अनमाहीत, परंतु सौजन्यतेचे पोटीं सर्वांस आपलेसे करून दौलतीस आळा घातला. पुढें चैत्रमासीं यजमानाचे अनुषंगें महेषावतीस नर्मदातीरीं सोमयाग ब्राह्मणाकडून करवावा असें ठरवून वेदमूर्ति राजश्री नारायणबाबा तळेगावकर सत्पात्र पाहून, त्याजकडून आधान सिद्ध करवून, × × पूर्वक सोम केला सरकारस्वारीही प्रसगास गेली होती. अनुष्ठान मोठें, परंतु खावद पुण्यवान, अंत करणपूर्वक मनोत्साह व कारभारी सुशिक्षित इतिकतव्यता निर्विघ्न सिद्धीस जाऊन, समारभ फार मोठा होऊन, कारभारी यांचे जपण्याचे पोटीं शोभाही अद्वितीय झाली धरला बेत न रहाता पैकाही विपुल लागला. ब्राह्मणाचा लौकिक कीर्ति बरीच झाली पुढे पुनः इदुरास आले पुढें पांच सात महिने वहिवाट एक विचारे बरीच चालली त्यात ज्याच्या माथां ओझें त्याजला खावदार्चे संधान ठेवून सर्वांचे मनोधारण राहील ते करावें ही नेक सल्ला त्यात मार्गाची गोष्ट नसल्यास न रुचली त्यासी भवतव्यानुरूप अनुभव प्राप्त होऊन दौलतीचा क्रम चालविण्याचा तसा चालतच आहे. या अन्वये सेवा सेवकत्वाचे संभाग चालतो त्याप्रमाणें चालवून दौलतीचे विभागी गोरगरीब याजवरही कूर्मदृष्टि राहील याचे पोटीं श्रीमार्तंडकृपेनें पूर्वरंगास आणले. परमेश्वरास अगाध नाहीं. अग्रे ईश्वरोक्ति भावी पदार्थ आगमन ऐकिलें पाहिजे त्या धोरणावर इतिहास यच्यावत् लिहिला असे मिती




---

(१३७) **अनमाहीत** – अपरिचित. **सोम** – सोमयाग. **इतिकर्तव्यता** – योजलेलें काम. **जपण्याचे पोटीं** – व्यवस्था ठेवण्याच्या शिस्तिमुळे.

# होळकर कैफियत

## परिशिष्ट १ — पुरवणी टीपा

पृष्ठ ५ श्रीमंताची फौज बढवणीस येऊं लागली:— बढवणीचा ठाकूर अनुपसिंग नावाचा होता.

पृष्ठ १४ परिच्छेद १२ यातील तपशिलासाठी बाबूराव विष्णूचे गोविंदपंतास पत्र आहे ते पहा. २१-२-१७५१

" नेनवेयाहून मजल दरमजल जैनगरास चालिले दोन तीन मजली जैनगर राहिलें, तो राजियास वर्तमान कललें. त्याणीं वकील व याचा — गणेश मालीं राजे यानें दोन लाख रुपये देऊन पाठविलें. त्याची भेट जाली. सुभेदार इतराज जाहाले. कांहीं केल्या न येकत. मजल दरमजल चालिले. वकिलांही लेहून पाठविले कीं हे येकत नाहीं. केशवदास मारिला त्याचा सूड आपणांस घेणें आहे, येसें लेहून पाठविलें. राजियाचे कारभारी जुने घरीं बैसले होते. हरगोविंद व विद्याधर दोघे राजियापासीं गेले कीं सुभेदार येतात. फौज आपली आणावी, बाहिर जाऊन लढाई करावी अगर गावांतून लढाई करावयाची असेल तरी मोर्चेबदी करावी. तोंफा बुरजे बुरुज ठेवावी, येसें उभयेतानीं सांगितलें. त्याजवरी इतराज राजा जाहला. त्याचे कारभारी नवे माहावत व येक नाहावी त्याजला बोलाविलें कीं, सुभेदाराच्या चित्तांत कीं केशवदास आपण मारिला, त्याचा सूड घेणार. याजकरितां तुम्ही सुभेदारापासीं जाऊन गोष्टमात करणें, च्यार पांच लाख रुपये मागतील तर देऊन वाटेस लावणें, येसें दोघां कारभारी-यासी सांगितलें. कारभारी म्हणाले कीं आम्ही येकंदर न जाऊ. आम्हास तो मारील. तुम्ही आपले हातें मारणें, परतु आम्हांस तिकडे न पाठवणें. मग राजा उगाच राहिला. सध्याकाल जाहला. वर्तमान येकिलें कीं सुभेदार येथून दाहा कोसावर आले. खिजमतदारास सांगितलें कीं काला नाग जित आणवणे व सोमलखार घेऊन येणें. औषध करणें आहे. त्याणीं आणून दिल्हें. दोन प्रहर रात्रीस जहर राजे याणें घेतलें. नाग अगास डसविले. पहाटे ईश्वरसिंग राजा याचा प्राण गेला. तिघी बाईकानीं जहर घेतलें. व येक कलावतिण इणें जहर घेतलें. येसे चार बाईका व राजा येसे जहर घेऊन प्राण दिधले. हें कोणास शहरात ठावकें नाहीं व कारभारी यासीहि ठाऊक नाहीं. येक खिजमतगारास मात्र ठाऊकें होतें. पौष वद्य १२ सुक्रवार प्रहर दिवसा फौज खडेराऊ व गगाधरपत तात्या ( चद्रचूड ) नगरावर गेले. सुभेदार व बुनगे

तीन कोसावरी मागें राहिले. दोन प्रहर पावेतों कोण्ही गोले टाकिले नाहींत. फौज बाहिर उभी. कारभारी राजीयासी गेले कीं माहाराज फौज बाहेर येऊन लागली, आपण अजून निजलेसे काय ? म्हणून उठवावयास लागले तों खिजमतगार म्हणाला कीं माहाराजानें येसें कर्म केलें !! मग आकांत शाहरांत जाहला. जुने कारभारी हरगोविंद व विद्याधर यांणीं थांबाथाव शाहरांत करून मग बाहिर भेटीस आले. उभयतांस भेटले. सुभेदारासहि सांगोन पाठविलें. तिसरा प्रहरास कूच करून शाहराजवळ फौज सुधां राहिले पाहावयास माणसें पाठविलीं, तों खरेंच जाहालें. मग यांणीं चौकीया दरवाज्यावर जागजागीं ठेविलें. राजमंदिरीं चौकी ठेविली राजेयाचा मुरदा च्यारी प्रहर दिवसपर्यंत होता मग सुभेदारानीं कारभारी आपले मातबर दोघे पाठऊन व सेला पाठऊन अगिनडाव दिघला. तीन बाईका व येक कलावतीण येसें जलालें. दुसरीया दिवशीं राजेयाचे हवेलींतून चौक्या बसविल्या आणि इकडे माधोसिंगास सांडणीस्वार पाठविला. पत्र पाठविलें कीं जलदीनें येऊन पोहचणें आणि इकडे हरगोविंद व विद्याधर सुभेदारापासीं येऊन बहुत रदबदल करून शाहरचा व राजियाचे आपेश तुम्ही माथां न घेणें, राज्य भारी आहे, याची स्थापना करावी. मग सुभेदाराचे चितास येऊन जागजागा चौकिया बसविल्या होत्या. त्या खडणीचा करार करून चौक्या उठविल्या येसा करार मदार होऊन च्यार रोज जाहले. राज्याची येक राणी व वीस कलावतिणी तेहि सती पडल्या. रुपयाच्या वसुलास लागले. तो माधोसिंग पधरावे रोजीं आला. सुभेदार पुढें जाऊन भेटले. येक हतीवर उभयता बसले. तैसेंच गांवांत जाऊन त्याच्या हवेलींत घातलें. सुभेदार माघारे आले. माधोसिंग आल्यावरी आठवे रोजीं राजश्री जायाजी सिंदेहि आले. आपण दोन तीन वेला सुभेदारास त्यांस विचारिले कीं आमच्या येवजाची वाट काय ? तिकडे पतास निकड लागली आहे, वरातावर वराता होतात, आमची वाट काय ? त्यांणीं सांगितलें कीं हे रुपये वसूल होतील, यातून रुपये हुंडिया करून तुम्हांस रवाना करू. येसें उत्तर दिल्हें. आणप्रमाण केलें. वसुलास लागले. इतकियात माधोसिंग याची फौज दाहा पधरा हजार आली होती. सेखावन वगैरे लोक जमाव जाल्यावर त्याची नजर फिरली. मग कुविद्या धरिली कीं सुभेदारास व जायाजी शिंदे यास जेवावयास करावें. अन्न अवघें विखाचें करावें. दाहा पांच हजार खासे होतील यांस जेऊ घालावें आणि मारावें येसें केलें. यांजला बहुत प्रकारें विनति केली. सुभेदार कबूल जाहले. जायापानी गोष्ट उडविली कीं, आपण येकदर जात नाहीं. तुम्ही जाल तरी जा, परतु आपण येकदर जाणार नाहीं. मग राहिले. त्यांणें पांच सात दिवस पकवानें केलीं होतीं. त्यात अवघे वीख घातलें. पाणियात वीख घातलें आणि ब्राह्मणांस पेढे विखाचे केले. सोमलखार दोन

ग्रण घेतला होता. यैसा प्रसन्न केला होता. ईश्वरे सरदारास वांचविले. जामापानें मोडा घातला, व उमेदसिंग बुंदीवाले याणें मोडा घातला. मग त्याणें अन्न मार्गीत पुरलें. याजला खबर नाही. दुसरे रोजीं दुसरा विचार केला कीं, गंगाधरपंत व आणखी कारभारी बोलाऊन आणून येथें मारावें. पहिले जात असत. दोन च्यार दिवस गांवांत राहात असत. याजकरितां बोलाऊ पाठविलें. दरवाजेयावरी ताकीद केली कीं, चौघाच्या पालख्या येतील, आम्हांकडे येऊ देणें, मग शाहरचे दरवाजे लावणें. यैसे करार करून याजला बोलाऊ पाठविलें. त्याजला सागोन पाठविलें कीं आपण प्रहर दिवसांत येतो. तैसेच जायाजी सिंदे याजकडे गेले. तिकडे सध्याकाल पवेतों लागला. शाहरांत लोक दाहा पाच हजारी माणूस शहर पाहावयासी व उटें व घोडी —— सूत घ्यावयासी जात असत. ते दिवशीं जायाजी शिंदे यांजकडील खासे फार शहरांत गेले. च्यार पालखियाचे सरदार बसोन गेले. याणी म्हटलें की तात्या आले वर्तमान रा × सागितलें. दरवाजे लाविले. माघ वद्य ९ रोजीं गुरुवासरी राजियाचा हुकूम जाला की महराठे लोक अले. कतल! यैसे सांगोन अगोदर लोकास विसारत होती. होताच राजा उठोन माडीवर जाऊन बसला. शहरचे दरवाजे लावले. दोन प्रहरापासून आपलेकडील माणसें मारीत होते. तों प्रहर रात्रपर्यंत माणूस कापिलें. तीन हजार माणूस कापले व येक हजार माणूस जखमी जाहले. जायापाकडील मातबर मातबर सरदार नामांकित हजार व सिपाय व चाकर वगैरे सुभेदाराकडील मातबर पंचविस व चाकर वगैरे हजार दीड हजार व ब्राह्मण शभर व बटकी व पेंढारी व मुलें यैसें कापून काढलीं. जखमी जे आले ते कितेक मरतात. सें पनास माणूस वगैरे कितेक जे गावांत वांचलें तितकें मात्र आले. गावकुसावरून उड्या घालून आले. त्याचे पाय मोडले व कमर मोडले, कितेक वाचोन आले. यैसा कहर शहरात केला. येक हजार घोडे भलभले चागले बसोन गेले होते तितकेहि गेले. सोनीयाचीं कडीं व मोतीयाच्या जोड्या व पैका वस्तभाव घ्यावयास गेले इतके मानूस गेले. सुमार नाही. मारले फार गेले. त्यास जायाजी शिंदे याजकडील मातबर सरदार वगैरे फार मारले गेले."

[ लेखांक न. ३१ पृष्ठ ५१ ते ५४ पानिपत प्रकरण भाग २ रा. पेशवे दप्तर. ]

पृष्ठ १६ त्याची पहाडावर गढी, मार्ची (स) शहरः— मॉंची नावाचें एक गांवहि जयपूर नजिक आहे. कदाचित् 'मॉची शहर' असाहि पाठ मुळांत असण्याचा संभव आहे. "जयपूरच्या दलैरायनें मॉंचीचें मीणे लोकांचा पराभव करून तोहि हस्तगत केला. हे मीणे लोक फार शूर होते व अद्यापहि त्या भागांत बहुसंख्येनें

ते वस्ती करून आहेत. मॉचीच्या भागांत मोठें जगल आहे आणि तेथेंच वाघांची वगैरे शिकार करण्यासाठीं जयपूरच्या राजांनीं विशेष प्रकारची व्यवस्था केली आहे. या ठिकाणीं बाणगगा नदी अडवून पाण्याचा संचय करून जयपूर शहरास पाण्याचा पुरवठा अलीकडे केला आहे. मॉची जयपुरापासून १५।१६ मैल आहे. निसर्गाची शोभा फार रम्य आहे. एका बाजूस भले उच पर्वत आहेत त्यांत जुन्या काळीं शिकारीकरतां बाधलेली एक मॉची आहे. त्यापलीकडे जमवाय माताजीचें मंदिर आहे. मॉचीस दुलैरायनें रामगडचा किल्ला बाधला तो अद्यापहि दिसतो. ”

[ जयपूर दर्शन ले. म म द. वा. पोतदार पृ. ३. ]

पृष्ठ ३६ व ३८ **विसाजी लावहाते किंवा विसोबा लाभाते.**– हा थोरल्या मल्हारराव होळकराचा व्याही. या विसाजी लाभात्याच्या नातवाला मल्हाररावाची सीताबाई नावाची एक मुलगी होती ती दिली होती. विसाजी लांभाते मोठा पांडुरंग भक्त होता त्याची आषाढी कार्तिकीची पंढरीची वारी कधीं चुकली नाहीं. पुढें वार्धक्यामुळें विसाजीस वारीला जाणे अशक्य झाले. म्हणून विसाजीच्या नातवानें इंदुरास इंद्रेश्वरापासून नजीक पंढरीनाथाचें देऊळ बाधलें विसाजीच्या नातवाचें नांव सताजी लाभाते. त्यालाच सिताबाई दिली या सताजीचा नंबर दोनचा मुलगा सुलतानजी त्याने हें देऊळ बाधलें [ मालवसाहित्य इंदूर विशेषांक वर्ष ५ अंक १ शके १८५५ इंदूरचे ऐतिहासिकदृष्टया अल्प विवेचन. ले दा ब. दाडेकर. ]

पृष्ठ ४१ परिच्छेद ३२ **मल्हारराव शके १६८७ भाद्रपद वद्य ११ प्रहर दिवस चढतां पंचत्व पावले:**– महेश्वर दरबारच्या बातमीपत्रांत “ छ. ९ सव्वाल शनवार वैशाख ११ रोजीं मल्हारराव होळकराचें श्राद्ध केल्याचा उल्लेख आहे.” ( ले. २५४ ) यावरून चंद्रचूड दप्तर कलां १, ले. १०४ यात वैशाख शु ॥ ११ शके १६८८ ( म्हणजे ता. २०–५–१७६६ ) रोजीं मल्हाररावाचा काळ जाहला असें लिहिलें आहे, तेंच खरें ठरते. कैफियतींत मल्हाररावाचा मृत्यू शके १६८७ भाद्रपद व ॥ ११ स दिला आहे तो मल्हाररावाच्या एकाद्या पक्षावरून दिला असावा. डफ मल्हाररावाचा मृत्यू सन १७६७ त देतो. तोही असाच चुकला आहे. आमचे बखरकार मल्हाररावास साडेसात महिने अगोदर मारतात, तर पाश्चात्य इतिहासकार त्याला कांहीं महिने अधिक जगवितात ! ! अहल्याबाईचे चरित्रकार पुरुषोत्तमहि असेच या बाबतींत चुकले आहेत. ते शके १६८७ चा वैशाख समजतात. वस्तुतः त्यांनीं थोरल्या माधवरावाचें ता. १० जून १७६७ चें अस्सल पत्रही पृष्ठ ७४ वरील

टीपेंत दिलें आहे. पण शकाची चुकी त्याच्याही लक्षात आल्याचें दिसत नाहीं.
[ महेश्वर दरबारच्या बातमीपत्रांचा परिचय, विविधज्ञानविस्तार, लेखांक २ रा, पृष्ठ ४४०, वर्ष ७५, अंक ९. सप्टेंबर १९४४. ]

पृष्ठ ४१ परिच्छेद ३२ मल्हाररावाचा इंग्रजाकडून पराभव :- "श्रीमत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी–पोष्याकित अपाजी राम कृतानेक सा नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। अशाढ शुद्ध ९ पर्यंत अपले कृपेंकरून यथास्थित आसो विशेष. दिवस जाले. आपल्याकडून कृपा पत्र येऊन परामृश होत नाहीं तेणें करून चित्त चिंतातूर आसे येसे नसावे सदैव आलिया वार्तिक समवेत पत्र पा। सांभाळ करीत आसिले पाहिजे जे वेळीं पत्रे येतात ते वेळेस आनदावाप्त होत जाती ते पत्रीं लिहिता पुर्वत नाहीं इकडील राजकी वर्तमान नजीबखानासी व जाठासी सलाह करून देऊन तेथून दर मजल आनूपशहरास आलो. तेथें सुज्यायतदौले येऊन भेटी बहुत मिनतमानी केली कीं फिरगी यानीं आमचा मुलुख घेतला आहे आमची साईता करावी. त्यावरून श्रीमत राजश्री सुभेदारानीं कबूल केले (रो) हिले पठाण याचे पारपत्य करण तैसेच च्यार रोज महकूफ करून दरमजल जाजमुहूस आला तेथें बातमी आली कीं कुराज्याहानाबादेंत नजफखान च्यार हजार फौजेनसी आहे त्यासी शिकस्त दिल्ही. तदतर फिरगीच चालोन आले. त्यासी जुझ मातबर जाले. च्यार पांचसें घोडे आणले. तीन तोफा व चाली (स) पनास उटे आणली. तेही दम धरून मुकामास आले. आम्हीहि घेरा घालोन होतो. बातमी तो आली, रोहिले पठाण येकत्र होऊन बुणग्याव (र) आले मग तैसेच चालोन ते कालपीस बुणगे उतरून पुनरोक्त फौज रवाना तीर्थरूप राजश्री तात्यास केले, तेथे येक लढाई जाली. हरोल तमाम बुडविला. हजार + + + घोडे व च्यारसें उटे फिरगी दोन पलटणें व बाणाच्या कैच्या व वीस पचवीस निशाणें आणलीं, ते गावचा आश्रयें धरून राहिले. तेथें च्यार सा (को) स पावेतो फौजा राहेत येसे पाणी नवते. यामुळें उलटोन कालपीस आले. तेही रिकामी जागा पाहून कालपीस आले. नाकेबदी केली मग च्यार पांच नावा मेळऊन रातवा धरून उतरले. मोर्चे तोफाखाले उधळलें च्यार पांच घडी जुझ जाले परतु बेहड भारी. घोडियाचा नाविलाज जाला. यामुळें गनिमाकावा करून बेहड पुढें देऊन उभे राहिलो. त्यानीं कालपींत ठाणें बसऊन माघारे गेले. आम्ही तैसेच उलटोण त्याचें ठाणें काढून देऊन आपलें ठाणे बसविलें. तेथून उमरगडचा बदोबस्त करून छावणीस ग्वालेर प्राते चाललो आहो. निश्चये जालिया लेहून पा। आपणाकडील साकल्यार्थ लिहावयासी आज्ञा केली पाहिजे. बहूत

कावे लिहिणें लोभाची वृधी कीजे हे विनती." माणक्या घोडा मुज्यावेतदौले याजवळ होता तो श्रीमत राजश्री सुभेदार घेऊन आले. हुजूरपागेंत आहे. बलो केला आहे. भेटीनतर आपलाच आहे. कलावें म्हणोन लिहिलें आहे. विनती

[भारत–इतिहास–सशोधक मडळ, पुणें. वर्ष ९ वें. त्रैमासिक अक २ रा होळकर–इग्रजाची झटापट (१७६५) ले. कृष्णाजी वासुदेव पुरदरे, पूर. पृष्ठ ३१–३२.]

पृष्ठ ४१ परिच्छेद ३२ थोरल्या मल्हारराव होळकराचा मृत्यु.

पत्र न १ श्री १६८८ वैशाख वद्य ४, १७६६ मे २७

तीर्थस्वरूप राजश्री जोसीबावा वडिलाचे सेवेसी —

विद्यार्थी माधवराव गगाधर कृतानेक सा।। नमस्कार विनती उपरी येथील कुशल वैशाख वद्य ४ भौमवासर मुकाम लस्कर दर जागा बेरछा नजीक सेवढे प्रात दतीया येथास्छित जाणून स्वकीयें लेखन करीत असिले पाहिजे. विशेष दिवस जाले आपणाकडील असिवाद पत्र येऊन परामर्ष होत नाहीं यास्तव चित उद्विग्न असे तरी यैसे न करावे. निरतरी येणारा वार्तिका समागमे असिर्वाद पत्रीं सांभाळीत असावे तेणें करून चित सतोषातें पावेल. तदनतर इकडील वर्तमान श्रीमत राजश्री दादासाहेबांच्या व श्रीमत सुभेदारांच्या भेटी जाल्यानतर राजश्री महादजी सिंद्याच्या व श्रीमताच्या भेटी करून दिल्ह्या असे असता पेशजी श्रीमत सुभेदारांचे शरीरी दोन अडी (च) मास समाधान नवतें. दरम्यान गुजराकडील मुलकी बदोबस्त ठाणी पेशजीची घेऊन खडणी घेऊन जाटाचे पारपत्याकरितां श्रीमतसहवर्तमान अलपुर प्रात झासी या मुका (मा) स आल्यावर श्रीमत सुभेदार बहुतच काइली जाले. दैवी मानवी उपाय करून अनुष्ठान दानधर्म बहुत काहीं केले. आयुर्मर्यादे करून गुणास न येता सेवटीं भूमीवर उतरले. उपरातीक दुसरे रोजीं वैशाख शुध्ध ११ मगलवारीं पावणे दोन प्रहर दिवस येता देवआज्ञा जाली. समागमे सौ।। मातुश्री द्वारकाबाई व सौ।। मातुश्री बनाबाई यानीं सहगमन केलें. विश्वात धन्य धन्य होऊन येहलोक परलोक उत्तम गती जाली. परतु परमेश्वरें सर्वांचें छत्र नेऊन बहुत वाईट केलें. श्रीमत देखील सर्वजन बहुत शोकार्णवातें पावले. भगवत सता प्रमाण काळानुरूप होणारास उपाय काय! अलमपुरी तीन दिवस होऊन आस्ती गोळा करून रक्षा सपूर्ण बटगीया भरून भागीरथीस पाठविली. तेथून कुच करून पाच कोस काळीसिंद नदीवर मुकाम केले. येथें काल सातवे दिवसापासोन क्रियेस आरभ होऊन आज आठवा दिवस जाला. येथें आकरे बारे तेरावा दिवस होऊन उपरातीक गोहदकराचें पारपत्य करून श्रीमताची आज्ञा घेऊन देशास फौजेचे बदोबस्ताकीरतां यावे. कदाचित श्रीमतच इकडे फौजा व

सरदार छावणीस ठेऊन देशास आले तर समागमेच यावे, वैसे तीर्थस्वरूपाचे मानस आहे. श्रीमत सुभेदारांचे क्रियेस दीड दोन लक्ष रु ( प ) वेपर्यंत खर्च करावा वैसे तीर्थरूपानीं चित्तीं धरिले आहे. होऊन येईल अगाध नाहीं. श्रीमत सुभेदारांची पुण्याई प्रताप थोर, सर्व यथास्थित होऊन येईल चिंता नाहीं.

[ चद्रचूड-दफ्तर-रूला पहिली पान १७ लेखांक १०४. ]

पत्र न. २ श्रीमोरया १६८८ वैशाख शु. १५, १७६६ मे २४.

श्री मार्तंडजी

तर्थिरूप सौभाग्यादिसपन्न मातुश्रीबाई वडिलाचे सेवेसी —

आपत्ये सदासिवानें व कृष्णरायाने चरणावर मस्तक ठेवून सा।। नमस्कार विज्ञापना. येथील कुशल वैशाख शुद्ध १५ पर्यंत मुकाम अलपुर नजीक गोहद बारा कोस येथास्थित जाणून स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे. विशेष वडिलीं पत्रें पाठविलीं ते पावून त्याचीं उतरें साकाल्यार्थे मुजरद कासीद जोडी देऊ व नबा या समागमें पेशजी लिहिले आहे त्याजवरून ध्यानास येईल. अलीकडील वृत श्रीमत राजश्री दादासाहेबाच्या सर्वांच्या भेटी होऊन येकत्र जाल्यानतर गुजराकडील खडणी चुकऊन वरकड ठाणीं व मुलकी बदोबस्त करून पुढें गोहदचें पारपत्याकरिता मुकाम मजकुरी सर्व आल्यानंतर श्रीमत सुभेदाराचे शरीरीं दोन अडीच मास समाधान नव्हतेंच. औषध उपाय, देवी उपाय, अनुष्ठाने, दानधर्म, श्री सी दर्शनाचा निश्चय सर्व उपाय केले परंतु गुणास न येतां वैशाख शुद्ध ११ मगलवार पावणे दोन प्रहर दिवस येता देवाज्ञा जाली. ईश्वरें बहुत वाईट केलें. सर्वांचें छत्र नेलें. सर्व कुटुब देखील श्रीमतसुधा सर्व मडळी सानिध्य असतां देहावसान जालें. सर्वत्रांस शोक बहुत प्राप्त जाला. श्रीमत दादासा ( हेब ) ( कि ) तेक प्रकारें स्तव करून श्रीमत कैलासवासी ++ प्रमाणें मानून शोक करितात. सुभेदाराची पुण्याई थोर. योग्याप्रमाणें बहुत शरीरश्रम न होतां मृत्यु जाला. सौभाग्यादिसपन्न मातुश्री बनाबाई व सौ. मा दारकाबाई उभयेतानीं सहगमन केलें. सर्व जनांत धन्य धन्य जाली उतरक्रिया कालींसीद नदीवर होऊन पुढें सिष्टाचार जाल्यानतर गोहदकरांचा वगैरे मनसबा कालदेशवर्तमानरूप होऊन येईल तदनुसार सेवेसी लिहिला जाईल.

[ चद्रचूड दफ्तर रूला पहिली, पान १८, लेखांक १०५. ]

पृष्ठ ४२ तो दहावे महिन्यांत माल्हराव होळकर याचा काळ झाला:— दादासाहेब पेशव्यांचें गगोबा तात्या चद्रचूड यांस पत्र ५।४।१७६७ चें. "माल्हराव

होळकर यास फाल्गुन वद्य द्वादशीस ( १७।३।६७ ) देवाज्ञा जाली म्हणून राा सदाशिव गगाधर यांनीं निवेदन केलें ”

[ चद्रचूड दप्तर कला १ ली लेखाक २०२ पृष्ठ १७३।७४. ]

“ अहिल्याबाईच्या अदृष्टांत पुत्रसौख्य नव्हतें. कारण मुलानें उधळलेले गुण तिला प्रत्यक्ष दिसत होते. अधिकार मिळाल्यापासून दहाच महिन्यात मालेरावाचें देहावसान झालें. मालेरावाला हत्तीच्या साठमाऱ्या पाहण्याचा फार नाद होता दुष्टांच्या नादी लागून हातून घडलेल्या अन्यायी हत्येच्या पातकाचे मनावर दडपण पडलेलें असतांना मालेरावाचा अत झाला. छत्री बागेत त्याची छत्री आहे. छत्री बागेंत पूर्वाभिमुख छत्री खडेराव होळकराची आहे त्याच छत्रींत उत्तरेकडील कोपऱ्यांत अहिल्याबाईच्या मृत्यूनतर तिची मूर्ति बसविण्यांत आली. या छत्रीच्या दक्षिण अगास मल्हारराव होळकराची छत्री असून उत्तर बाजूस मालेरावाची आहे. या छत्रीवर हत्तींची टकरा खेळत असलेलीं दगडी चित्रे कोरलेलीं आहेत आपल्या हत्तीच्या करमणुकीकरतां मालेरावानें बांधलेला ‘हत्तीचा पाळा’ शिवागजाच्या दक्षणेस आहे ” ( इंदूरचें ऐतिहासिकदृष्ट्या अल्प विवेचन दा ब दांडेकर. मालवसाहित्य इदूर विशेषांक पृष्ठ ३५. )

“ मालेराव आपल्या दुष्टपणाच्या व वेडसरपणाच्या चाळ्यांत एका मनुष्याचा खून करून त्या खुनाबद्दल पश्चात्ताप करीत लवकरच मेला. तो पश्चात्तापच म्हणावयाचा. कारण खून केलेला मनुष्य भूत होऊन आपला प्राण घेत आहे असे ओरडत मालेराव मेला ! ” [ अहिल्याबाई चरित्र परीक्षण कै. चिं वि. वैद्य वि. ज्ञा. विस्तार पु. ४४ अंक १० पृष्ठ ३९७. ]

पृष्ठ ४२ सरदारास – मालेराव होळकरास – ‘कांहीं’ या शब्दाचा संबंध आत्मकृत्यविकृतीकडे आहे

“ मालेरावाच्या वाड्यांतील एका कुळंबिणीशी गावांतील एका शिंप्याचा कांहीं अनैतिक सबध होता. या सशयानें त्याला मालेरावानें ठार मारिले. पण पुढें ते त्याच्या मनाला फार लागले व शेवटी त्याला वायू होऊन तो मोठमोठ्यानें आरोळ्या मारू लागला व म्हणू लागला, ‘ मी तुझा भयकर रीतीनें सूड घेईन ! ’ तो शिंपी समध होऊन मालेरावाला त्यानें झपाटलें आहे अशा समजुतीनें अहल्याबाईनें त्यास परोपरीने समजाविले पण तो म्हणे, ‘ मी निरपराधी असताना तुझ्या मुलानें माझा प्राण घेतला. आतां मी जिवास जीव बळी घेईन तेव्हांच तृप्त होईन ! ’ अशा समंधबाधेंतच मालेरावाचा अत झाला. अहल्याबाईचें देवाधर्माकडे जे पुढें लक्ष लागलें

त्याचें हें एक कारण असावें. [ "गर्जना" दिनांक ८-१-१९५४ देवी अहल्याबाई होळकर. लेखक श्रीनिवास गुरुराव देशपांडे. ]

पृष्ठ ४३ **हरकुबाईः—** थोरल्या मल्हाररावाची उपस्त्री.

पृष्ठ ४३ **उदाबाई वाघमारेः—** ही थोरल्या मल्हारराव होळकराची दुसरी कन्या. हिच्याच नांवानें इंदुरांतील उदेपुरा वसविण्यांत आला. हा पुरा बजाजखान्या-जवळ आहे. [ होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें खंड १२, संपादक अ. ना. भागवत पृष्ठ २८. ]

पृष्ठ ४३ **नथ्याबा फणसेः—** हा अहिल्याबाईचा नातू. मुलगी मुक्ताबाई फणसे हिचा मुलगा. "अहिल्याबाईचे तुकोजी होळकराशीं वितुष्ट फार वाढलें तेव्हां सन १७७९ त तिनें आपला नातू नथ्याबा फणसे यास दत्तक घेण्याचा ठराव पेशव्याकडून करून घेतला होता. 'तुकोजीची वर्तणूक सुधी नाहीं सबब त्याची सरदारी बरतर्फ करून त्यास कैद करावे आणि फणशांचा मूल दत्तक घेऊन त्याचें नांवें सरदारी करावी. यास नजर सरकारची पंचवीस लक्ष एक, यशवंतराव गंगाधराचे विद्यमानें करार केली असे. (८-८-१७७९). मात्र ही गोष्ट पुढें प्रत्यक्ष अमलांत आली नाहीं." [ मराठी रियासत उ० विभाग २, पृ. १२. ]

पृष्ठ ४५ **हमराई बदरूनः—** 'बदरून' या वाचनाबद्दल 'दाखवून' असा तर मूळ पाठ नसेल असा एक तर्क बळवंत कमळाकर यांनीं सुचविला आहे. तो पाठ स्वीकारला तर पुढील प्रमाणें अर्थ बसेल. "तुकोजीचे व अहिल्याबाईचे बरें नव्हते. पण आतां त्यालाच वारस करण्याचा प्रसंग आला. म्हणून तुकोजीला हमराई म्हणजे दोस्ती दाखविणें जरूर झाले."

पृष्ठ ४५ परिच्छेद ३५ **गारडा खेंडीसः—** 'गाडरा खेंडीस' असें पाहिजे. गाडराखेडी हें गांव इंदुराजवळच आहे. गाडराखेडी म्हणजे धनगरवाडी. गाडर म्ह. मेंढरू. आणि खेडी म्हणजे त्यांचें राहण्याचें ठिकाण किंवा गांव. त्यावरून गाडराखेडी नांव पडलें.

पृष्ठ ५६ **बाजी स्वयंपाक करितात, श्रीमंत जवळ बसून साहित्य देतातः—** राजे लोकांच्या घरात गृहकलह लागला म्हणजे कट, गुप्त घात, मारेकरी, विषप्रयोग यांचा सुळसुळाट होतो. 'दुरितैरपि कर्तुमात्मसात् प्रयतते नृपसूनवोहितवत्' इ० प्रकार सनातन आहे. आणि म्हणूनच राजे लोकांच्या खाण्याभोजनाच्या बाबत

फार दक्षता बाळगण्याची पद्धत असते. राजे लोकांचें जेवण आधीं 'चोखे' लोक ठेवलेले असतात त्यांनीं खाऊन पाहावयाचें व मग राजानीं तें अन्न सेवन करावयाचें असे !! राघोबा व थो. माधवरावाच्या कलहात माधवरावाला मारण्यासाठीं राघोबानें सर्व उपाय केल्याचा दाट प्रवाद तेव्हा होता. आणि म्हणूनच माधवरावाला स्वतःचा स्वयपाक स्वतःच करण्याची पाळी आली असावी. राजघराण्याची चालू व जुनी अतर्गत माहिती असणाऱ्याना यात बिलकूल आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं.

पृष्ठ ५६ **याप्रमाणे सरकार लक्षास जपून, अशा माणसास इ०:--** 'या प्रमाणें सरकारलक्षास जपून (असणाऱ्या) अशा माणसास' असें वाचलें म्हणजे अर्थाचा घोटाळा होणार नाहीं

पृष्ठ ५७ **अद्यापीहि हिंगली न वाफेलीः--** महाराष्ट्र वाक्प्रसप्रदाय कोश भाग २ पृ. ६४५ वर 'हिंगणे वाफणें' असा वाक्प्रचार उद्घृत करून त्याचा गोळा बेरीज अर्थ असा दिला आहे "पदार्थास प्रथम हिंग लावून मग फोडणीस टाकतात. [हिंगणें वाफणे हा वाक्प्रचार लक्षणेनें व निषेधात्मक वापरतात] १ आरभहि नसणें, अपुरे असणें."

पृष्ठ ६२ **शेखावटीः**—"हा जयपूर सस्थानांतील सुमारें पाच लाख वस्तीचा छोटासा प्रांत आहे. या प्रांतांतून अनेक धाडसी लोक बाहेर जाऊन लक्षाधीश झाले आहेत. रुइया, नेवाटिया, शेकसरिया, पोदार वगैरे अनेक प्रसिद्ध व्यापारी घराणीं या भागांतील व आसपासचीं आहेत" ['जयपूर दर्शन' म. म. पोतदार पृष्ठ २२.]

पृष्ठ ६२ **बयाणा.**—हे ठिकाण जयपूर देवशाच्या पूर्वेस व भरतपूरच्या दक्षणेस आहे.

पृष्ठ ६३ **पहारेवाला बसला होता. तीन डंके नौबतीवर गैबी झालेः-** 'होता (तों) तीन डके' असें वाचावे. शेवटचा डंका वाजवून नगारखान्याचे लोक झोपले असता प्रत्यक्ष मार्तंडानें गुप्तपणें येऊन तीनदा नगारा वाजविला.

पृष्ठ ६४ **मी शेणगोळा करून ठेवतेः—** तुकोजीराव जातीनें अधू होता परतु ऐट थोरल्या मल्हाररावाची आणावयाचा ! अत्यत मदिराभक्त व विषयासक्त. रखमाबाई त्याची अत्यत लाडकी बायको. ती फार सुस्वरूप होती. पण वर्तनानेंहि वाईट होती. रखमाबाईच्या मुठींत तुकोजीराव असे. रखमाबाईला तुकोजीरावाची हिंमत व पराक्रम पुरा ठाऊक ! म्हणून या वेळचें तुकोजीचें अवसान पाहून ती थट्टेनें हेळणेनें म्हणाली, "जा पराक्रम करून या. तुमच्या त्या पराक्रमाला दृष्ट लागायला नको म्हणून शेणगोळा इकडे तयार करून ठेवते." पुढें नारोपतनाना व रखमाबाईचें सख्य कानावर आल्यावर तुकोजीचा नारोपतावर अत्यत राग झाला व तो दश मनांत

असल्यामुळेंच त्याने त्याचे अनन्वित हाल करून त्यास कैदेंत कुजविले व आत्महत्या करावयास लावले. [ मराठी रियासत उ. विभाग २ पृष्ठ २३ पहा. ]

पृष्ठ ६५ गोषा:- धनुष्याला दोरी जोडतात तें धनुष्याचें किंवा कमानीचें टोंक. पर्शिअन शब्द आहे

पृष्ठ ६५ जाट जातीने विवस्त्र होऊन इ०.– "After two hours' close engagement Nawalsingh was obliged to retreat . . He threw away his ornaments lest he should be recognised by the enemy and with a few attendants reached the fort ( of Aring ) in safety " From the lost field Nawalsingh took refuge first in Aring ( 4 miles east of Gowardhan ) and later in Dig.

[ Fall of the Mughal Empire Vol. III page 11, 12 ]

पृष्ठ ६६ जाटापासून चार हजार रुपये घेऊन.– 'चार हजार' ही खासच वाचनाची चूक वाटते. मोडी 'साठ हजार' या शब्दाचें चार हजार असें चुकीचें वाचन होणें शक्य आहे. वास्तविक खरी रकम काहीं लाख असली पाहिजे.

पृष्ठ ६८ कसरावद:– मोठी व छोटी कसरावद अशी दोन गावे आहेत. तीं खरगोण महेश्वर रस्त्यावर आहेत. दोघात अतर ३ मैल आहे.

श्री

पृष्ठ ८५ परिच्छेद ५७ लालसोटची लढाई.– श. १७०९ अ. श्रा. शु. १५ ता. ३०–७–१७८७

विज्ञापना ऐसीजे. छ. १२ सवाल शनवारचे दिवशीं लढाई राजश्री पाटीलबावा याच्या फौजेची व जैपूर, मारवाडकर, हमदानी याची लढाई झाली. खासा पाटीलबावा चढाई चढून भाईच्या मुक्कामापुढें जाऊन उभे राहिले. तिकडून तेही खासा चढून आले. ते दिवशीं राजश्री शिवाजीपत बापू यांच्या फौजेनें वगैरे पाटीलबावाकडील सरदारांनीं मिळोन राठोड पुढें वाढून आले होते ते शिकस्त करून मोडून माघारा घातले. चार पाचशें राठोड लढाईत ठार पडले. चार पांच सरदार त्यांजकडील ठार जाहले. पांच सातशें जखमी होऊन ते माघारा निघाले. बापूकडील फौज वगैरे पाटीलबावांकडील फौज एक कोस पावेतो पाठीमागे लागून मारीत गेले. राठोडांचा मोड जाहला. तेव्हां महमदबेग हमदानी राजाचे डावे बाजूस उभा होता, तो राठोडाचे कुमकेस तेथून निघाला. त्यास वाटेंत अकस्मात तोफेचा गोळा लागून मृत्यु पावला. पुढें तेही

कोणी आले नाहींत. इकडील फौजांनीं चालून जावें तैंही झाले नाहीं. पर्जन्य आला व पुढें खावा, नाला, सध्याकाळचा समय जाणून परस्परें आपलाले जागीं उभे राहून अस्तमान पावेतों तोफांची मारागिरी परस्परें जाहली भाई उभे होते, त्याजवर दोन तीन तौफा जैपूरकरानीं थोरल्या लागू केल्या होत्या. गोळेही बहुत आले. शें पन्नास घोडीं माणसें मेलीं व जखमी झालीं. परतु भाई ठिकाणावरून हालले नाहींत. तोफेच्या गोळ्यानें भाईचे तरवारीच्या कवजाची वाटी उडाली, आणि तोच गोळा शिकार-बदाजवळ मोतदार उभा होता त्यास लागला. ईश्वरें भाईस कुशल केलें. इतकेंहि जाहलें, परतु भाई ठिकाण सोडून आलीकडे पलीकडे जाहले नाहीं. प्रातःकाळचे प्रहर दिवसापासून ते दोन घटका अवशीचे रात्रपावेतों तोफा परस्परें चालत होत्या उपरा-तिक तेहि सरून चवकी ठेवून आपले गोटात गेले. हेहि चवकी ठेवून गोटात आले परतु सरसी ते दिवशीं आपले इकडील चागली जाहली राठोड मोडून घातले. हमदानी मेला. पुढे एक लढाइ आणखी चागली द्यावी ही उमेद इकडील लोकांची. परतु आतून त्यानीं फौजेंत फितूर केला हे समजलें नव्हतें. पलटणें व मोगल यांजकडे सधानें करून खासा पाटीलबावास व भाई आदिकरून सरदारांस दगा करावा व लढाईत घालवावे, हे न साधल्यास लढाईच वेळेस आम्ही चालून घेऊ, ते वेळेस तोफाची मारागिरी चुकवून आम्ही त्याचे फौजेंत शिरलों म्हणजे आम्हांस शरीख होऊन दक्षण्यांची लढाई मारावी, अशा तऱ्हेनें त्यांचीं सधानें सिद्ध झालीं होतीं. शनवारचेच लढाईत त्याना सधान करून घालवावें असें होतें. परतु राठोड मोडून घातले हमदानी मेला बाजूकडील सरे पाहिली म्हणून तोफांची मारागिरी करूं लागले. तेहि तोफाचे मोहरे जमीदोज् धरून गोळा जातो. कोणी त्याचे गोळा पावेतों पोंहचे, कोणी न पोंहचे गोळे हजारो चालतात अद्याप राजाकडील फौज उभी आहे तेथून हालत नाही. तेव्हा गोळे जातात कोणीकडे हा भाईस सदेह येऊन बातमीदार पाठविले, ते येऊन सागू लागले, गोळा तेथपावेतो जात नाहीं. तेव्हां गोलदाजास पुसू लागले, गोळा तेथवर कां जात नाहीं ? ते म्हणू लागले, तोफा धाकट्या, गोळा तेथवर पोहचत नाहीं. तेव्हां बिडी थोरल्या दोन तोफा नेऊन तेथें लाविल्या त्याचा गोळा हमदानीस लागून ठार झाल्याची बातमी आली. पुढें गोळे जाऊन राजाचे फौजेंतील पांच सातशे घोडीं माणसें मेलीं जखमी झालीं. हें शनवारच्या लढाईचें वर्तमान. उपरातिक दुसरे दिवशीं छ. १३ सवाल आदित-वारचे दिवशीं भाई वगैरे फौजा चढवून लढाईचे जाग्यापुढें वाढून जाऊन दोन चार गोळे तोफाचे मारले. ते कोणी बाहेर आले नाहींत. तिसरा प्रहर पावेतों उभे राहून अस्तमानी गोटात आले. बावा तेथेंच भाईजवळ मुक्काम करून राहिले होते. त्याजवर

छ. १४ सवाल सोमवारचे दिवशीं सारे पलटणांनीं तलब आमची सात आठ महिन्याची चुकवून द्या म्हणोन बोलणें तटाचें घालून मलई केली. सात हजार माणूस एक जागां झालें. वरकड आपापले जागा बद्दा करून बसले. तेव्हा बावांनीं बहुतां प्रकारच्या तडजोडी त्यास मध्यस्तांकडून बोलविल्या. शेवटीं सौ बायांवरील वस्ता ठेवून तुम्हांस तीन रोजमरे यांचा ऐवज देऊ, वरकड हिशेब लढाईअखेर झाल्या-नतर चुकवून देऊ असेंहि बोलले. काही नक्तीहि द्यावयास लागले. त्यांत वरकड पलटणींनीं थोडाबहुत ऐवज घेऊन तोंड पाडिली. सात हजार माणसांची मलई एकें जागा झाली होती, ते कोणताहि जाबसाल ऐकतना. लढाईचे वेळीं व आधीं त्या पलटणाचे निसबतीस मिळून सवाशे तोफा त्याच्या जिमेस दारूगोळा छरेसुद्धां होत्या त्या तोफाचीं तोंडें याजवर फिरवून तलब चुकवून द्या, नाहीं तर तोफा आम्ही घेऊन जाऊ. यांणीं बहुत सांगितलें, परतु न ऐकता छ १५ सवालचे दिवशीं तिसरा प्रहरां कूच करोन सवाशें तोफा, दारूगोळे, गाडीवान, गोलदाजासुद्धां घेऊन चालले. तेव्हा शिवाजीपंत बापू व रावराजा आदिकरून तमाम सरदार बोलावून सलाह पुसली. आपल्या तोफा व सात हजार बदूक घेऊन चालले. पुढें याचें कसें करावें ? कपूनीं कूच केलें त्यापूर्वी त्यांणीं जैपुरकराकडे सूचना करून त्यांची फौज चार पांच हजार चवकीपुढ यऊन उभी राहिली. मागून गोटांत तमाम फौजेची तयारी झाली. याप्रमाणे बातम्या पैदरपै येऊन पोंचल्या. तेव्हां सर्वांचे विचारें ठरलें जें, लष्करांत फितूर झाला नकळे. हिंदुस्थानी कोण कोण फितुरात मिळाले आहेत. साऱ्याच पलटणानीं तलबेचा बद्दा केला होता. परतु वरकड राहिले. तोंच कपू सात हजार माणूस कूच करून चालले. वरकड लष्करात पलटणें व मोगल वगैरे हिंदुस्थानी येथें आहेत यांचा विश्वास काय ? येसमयीं लढाई घेणें सलाह नाहीं. लष्करांत एकच गर्दी होऊन आपले पारखें कोणाचा विश्वास कोणास न येतां पाणिपत होईल. कपू तोफा घेऊन जातों, जाऊ द्यावा, या वेळेस त्याशीं लढाई घेऊ नये, याप्रमाणें समस्तांनीं बावांशीं बोलून तेथेंच बसले आहेत, तोंच कपू कूच करोन दीड कोस इकडून गेला. तिकडून राजाची फौज पुढें येऊन तोफा व कपूस घेऊन त्यांची चवकी उभी राहत होती तेथें त्यांस उतरविले. त्याजवर अस्तमान झाला. तितक्यांत बातमी आली जे, कपू दाखल जाहल्याचें वर्तमान राजास जाऊन पोहचलें. त्यावरून राठोडसुद्धां त्यांच्या फौजा तमाम तयार होऊन लढाईचे इराद्यानें येतात. दुसरी बातमी आली जे दवलतराम, पहाडसिंग फौजा घेऊन पुढें आले. राजे अद्यापि आले नाहीं. तेव्हां येथेंहि जिनबदी होऊन चार शेरांची धारण. शिलेदारांस उपास. परतु तेथें भाईसमागमें तमाम सरदार फौजसुद्धां लढाईच्या जाग्यावर जाऊन उभे

राहिलें. मागाहून बावांनींहि सिद्धता केली. पुढें चार पांच घटका रात्र गेल्यानंतर कपूनें एक शिलक तोफांची केली. तेव्हां सर्वांस समजलें, आतां ते चालून घेतात. कोणी तर्क केले, कपू त्याकडे गेला, त्याणें सलामी तोफांची शिलक केली. त्याबर बातमीहि या अन्वयेंच आली. परंतु फौजा राठोडसुद्धां तमाम उभे आहेत, तेव्हां बावांनीहि आपले चिलखत आणविलें, आणि निश्चय केला जे, ते तिकडून पुढें वाढून आले म्हणजे इकडून आपण चालून जावें. ईश्वरानें नेमिलें असेल तें होईल. त्याजवर बातमी आली जे, त्याच्या फौजा माघारा गेल्या, तोफखान्याजवळ चवकी हजार पाचशें स्वार आहेत. तेव्हां याणींहि चवकी ठेवून भाई गोटात बावाजवळ आले. त्या उपरातिक प्रहर सहा घटिकांनीं शिवाजीपंत बापू पाटीलबावाजवळ येऊन बावा व भाई यास एकांती घेऊन बसून बोलले. समय पाणिपतसारखा प्राप्त झाला. आज रात्रीसच ते चालून येते म्हणजे मरणें प्राप्त. उद्या प्रातःकाळीं कच्छे व राठोड तमाम याच्या फौजा चालून येणार. आपली पलटणें तोफा त्यांजकडे गेल्याने त्यांस हुशारी येऊन ते हावभरी जाहले. आपले फौजेची हुशारी मदावली. फौजेंत पलटणें व मोगल रागडे हिंदुस्थानी आहेत त्याचा विश्वास नाहीं. परिच्छिन्न ते लढाईचे समयीं घालवितील. अझून परीक्षा पहावयाची बाकी राहिली नाहीं. दक्षणी फौज किती आहे ती आपल्या ध्यानात आहे. चार शराची धारण, बाहेरून रसद येत नाहीं. शिलेदार उपासानें मेले. घोडीं मेली, राहिली त्यात सामर्थ्य नाहीं. वैरणीचा काळ. लढाई कशाचें बळावर घेणार? ये वेळेस चार दिवस येथून निघावें. मसलतीस टाळा द्यावा. पुढें पाहून घेऊ याप्रमाणें चांगले रीतीनें समयोचित बोलून कूच करावयाचा निश्चय ठरावून, मागील प्रहर रात्र राहतां सड्या फौजा तोंडावर ठेवून, बावा व आपण मागे राहून बुणग्याचें कूच माघारा करविलें. थोरले बुणगे चार पाच कोस मागें लालसोटानजीक होते तेथें साडणीस्वार पाठवून त्याचेंहि कूच करविले. तितक्यात मागील घटकात रात्र राहता सडया फौजेचेहि बुणगे थोरल्या बुणग्यांत येऊन सामील जाहले. लोक आपापले लादायचे गडबडींत, त्या सर्वीत बुणग्यात तोफा होत्या. त्यांतील एक सदूक दारूचा कोणे पलटणच्या प्याद्यानें बत्ती लावून उडविला. त्याचा प्रकाश व बार थोरल्या तोफेप्रमाणें कडाका होऊन जवळ दारू आणली होती तेहि उडाली. बाणाच्या गाडया तेथें होत्या, त्यांस मात्र बत्ती जाऊन पोंहचली नाहीं. सधान करणारानें कसूर केला नाहीं, परंतु ईश्वरें मोठें कुशल केलें. बाणांस बत्ती जाऊन पोंहचती म्हणजे लष्कर ते दिवशींच बुडालें होतें. सदूक उडाला त्यावरून तमाम बुणग्यातील लोकांस वाटलें जे, येथें पलटणें होतीं त्यांणीं तोफा लष्करावर फिरविल्या. आधींच समय पलटणीचा, त्यांत हें साहित्य जाहल्यानें

वसवास जाऊन धडका केला. पळू लागले. वस्तभाव लादालाद ज्यांची झाली होती ते घेऊन निघाले. ज्याची राहिली त्यांणीं कार्याकारण घेऊन वरकड तसेच टाकून पळाले. फार करून बाजारकऱ्यांचा दाणादुणा, कापड, कोणाची राहुटी, कोणाचीं पालें, खाशा पाटीलबावाच्या मुदबकाचीं भांडीं, फरासखान्यातील ओझीं खाण्याची वगैरे तळावर तशीच राहून लोक जीव घेऊन पळतात तशासारखें पळू लागले. कितेक तळावर आहेतच, तों अफरासियाबखानाचा बाजार लष्करचे सोद्यानीं व पेंढारी याणीं लुटला. विना लढाई एकच गर्दी चहूकडून विलग तऱ्हेची होऊन बुणगे तेथून निघाले. त्याजवर पाठीमागून चौसहा घटकांनीं पाटीलबावा तळावर आले. पहातात तों पळाल्याप्रमाणे अवस्था दिसली. तेव्हा तेथें उभें राहून खाशा मुदबखाचीं भाडीं व फरासखान्याची ओझीं साडण्या सुतरनाळाचे उटावर घालून लोकास सागितले, तळावरील तुमचे उपयोगी असेल तें घ्या, वरकड जमा करून फुकून द्या. अफरासियाबखान याची स्त्री व मूल तळावरच राहिलें होतें ओझीं त्याचीं नित्य भाड्याचे उटावर चालत. ते दिवशीं उट मिळाले नाहींत तेव्हा बावानीं हत्तीवर त्यांचीं ओझीं लादून त्यांस मार्गस्त करून आपण चार घटका तळावर बसून तळास आग देविली. ते दिवशीं पिंपळाईस घेऊन तिसरा प्रहरीं मुक्काम जाहला. बुणग्यास बारा कोसाची मजल पडली. सडथा स्वारीचे लोकांस सोळा सत्रा कोसांची मजल जाहली. अस्तमानी बावा बुणग्यात आले. पाठीमागून चार सहा घटका रात्रीस भाई वगैरे फौजा तोफखाना साभाळून घेऊन गोटात आले दरम्यान दयाराम पुरब्याची दोन पलटणें अडून उभीं राहिली होतीं. तलब आमची द्या नाहीं तर आम्ही येत नाहीं. सरकारच्या दहा पधरा तोफा त्यांचे निसबतीस. बावानीं बहुता प्रकारें सागितले न ऐकत. पाठीमागून भाई आले. त्याणीं बावास पुढें बिदा केलें, आणि सागितले जे याशीं बोलून पाहतों, आले तर उत्तम, नाहीं तर हीं दोन्ही पलटणें कापून काढून तोफा आपल्या घेऊन येतों आपण पुढें जावें. त्यावरून बावा पुढें आले भाई तेथें उभे राहून फलटणाशीं सख्त रीतीनें बोलून तोफा पलटणें लष्करात घेऊन आले. दुसरे दिवशी त्याच ( अन्वयें ) बुणगे पुढें घालून आपण पाठीमागें राहून आठा कोसावर येऊन मुक्काम केला. खुशालगडात एक दोन तोफा व फरासखाना वगैरे होते ते तेथील तेथेंच राहिले. आणावयास बनले नाहीं. कमावीसदार जीव घेऊन पळून आला. रांगड्यानीं ठाणें आटोपले. पाठीमागून हमदानीचा पुतण्या व पहाडसिंग दवलतराम हलद्या पधरा हजार फौजेनिशी पाठलाग करावयास येतात. बातमी आली. त्यावरून नित्य खासा बावा व भाई वगैरे सरदार पाठीमागें फौज सुद्धां राहून बुणगे पुढें घालून मजल दरमजल मोठ्या मोठ्या मजली करीत, या अन्वयें डिगेपावेतों आले.

रांगड्यांची फौज पिंपळाईपावेतों आली होती, तेथून माघारा फरतोन गेले. नित्य लष्करांत अवाया पडत. आतां स्वस्थ आहे. परतु लष्करानें अवाई खादली आहे. पुढें पहावें. येथून पुढें फितुराची चवकशी व फितुरीयाचे पारपत्याचा विचार होणें तो होईल. नौबतरायाचे जिमेस तोफखाना पलटणें होतीं. इतका फितूर केवळ एका दोहों रोजात जाहला नाही दोन चार महिने सधान चाललें आहे हें आतां समजण्यांत आले. रात्रदिवस नौबतराय तेथें असता त्यास न समजता जाहलें किंवा तोहि यांत आहे कळे काय ! परतु त्याचा सदेह बावाच्या अतःकरणीं आला. वरकडास तो परिच्छिन्न आहेच. चवकशी होते बाहेरून त्याजवर चवकी स्वारांची आहे. पुढें काय निवडेल तें पहावे. परतु याउपर फितुरीयाचीं पारिपत्यें होतील. बावांनीं कुटुंबें वगैरे कुल कारखाने बुणगे ग्वालेरीस रवाना करून सडे होऊन आहेत. प्रसगीचें सविस्तर वृत्त निवेदन व्हावें यदर्थी तपसीलेंकरोन विनविलें आहे. नौबतराय याजकडे तोफ-खाना, पलटणें, बक्षीगिरी सांगितली. अलीकडे त्याजवर अखत्यार पाटीलबावानीं बराच दिला आहे परतु हिंदुस्थानी माणूस आर्जवी, फार तऱ्हेतऱ्हेनें आर्जवून कामकाज करून दाखवून मेळवून घ्यावें. समयास बनेल तरी वर्तणूक करावी अशी चाल आहे. याकरिता पाटीलबावांनीं बहुत सावधपणें वर्तत जावे म्हणून स्वामींनीं पूर्वी लिहिलें होतें व बाळाजीपत जामगांवकर यांजवळ बोलणें जाहल्यावरून त्याणींही या अन्वयें येथें लिहून पाठविलें. आम्ही स्वामींची वजिनस चिठी पाटीलबावास एकातीं वाचवून दाखवून मजकूर बोललों. ते समयीं म्हणू लागले येविशींचा बदोबस्त आहे, काळजी न करावी. निदान स्वामीच्या लिहिल्या अन्वयेंच प्रत्ययास आलें ! आता स्मरतात ! हिंदुस्थानी यांणीं दवलतच गारग केली होती. पाणपत होण्यांत बाकी नव्हती. परतु श्रीमताचे पुण्येंकरून व पाटीलबावाचे दैवेंकरून बचाव जाहला ही गोष्ट थोरली जाहली सांप्रत बावाही आपले जागीं खिन्न आहेत. श्रीमतांनीं लिहिलें व घरच्या मडळीनेंहि सांगितलें परतु होणारासारखी बुद्धि झाली. हिंदुस्थानीयांचे विश्वासावर मेलों त्याचें फल पावलों, असें म्हणत असतात. होणारास कोणाचा उपाय नाहीं. वाइट व्हावें याकरितां त्यांणीं सग्रह केला नव्हता. परतु हिंदुस्थानी बेइमान ! वेळेस त्यांणीं घालविले हें आतां प्रत्ययास आलें. पुढें दौलतीचा वगैरे बदोबस्त करितात तो जाहल्यावर मागाहून लिहून पाठवू. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ ऐतिहासिक पत्रव्यवहार लेखांक २६१ पृष्ठ २३२ ते २३७ सपादक गो. स. सरदेसाई, कृ. पा. कुलकर्णी, या. मा. काळे. ]

पृष्ठ ७१ परिच्छेद ५० अहल्याबाईनें हरिपंतास व महादजीस कशी

छणकाऊन उत्तरें दिलीं त्याचा नमुना

ता २८ आक्टोबर इ. स. १७८०

मि कार्तिक शुद्ध १ शके १७०२

" पुरवणी श्रीमत राजश्री नानासाहेब यासः— विज्ञापना, राजश्री बाळाराव गोविंद यांसी व मातुश्री अहिल्याबाईशीं बोलणीं झालीं ते समयीं बाई व बाळाराव व आबाजी नाईक बानवळे, बाईकडील मंडळी राजश्री कृष्णाजी मुरार व मुकुंदराव दिवाण व वासुदेव चिमणाजी व जयराम रावजी व आबाजी रणछोड इतके बसले होते बाईनीं फडणीसास सांगितलें जे, चौ पांचां वर्षांचा हिशेब बाळारावांस दाखवा. सरदार दक्षणेस होते. चौ साला जमा नी खर्च जो जाला, तो दाखवा म्हणून बाईनीं सांगितलें. त्यास फडणीसांनीं बाळारावास हिशेब दाखविला. समजावून दिल्हा. बाई बोलली जे, 'हा वेळपर्यंत आम्ही हिशेब तुम्हास नाहीं दाखविले. सुभेदाराचे वेळेस तुमचे हिशेब आम्हांकडे आले. कितीकदां आम्हीं पाहिले आहेत. परतु सांप्रत तुकोजीबावा विजयध्वज दौलतकर्ते पैदा जाले, त्या योगेंकरून तरी हिशेबाचे महजब घरोघर देणें आम्हांस प्राप्त झालें ! बरें, भगवत् इच्छेस उपाय नाहीं ! परतु बाळाराव ! तुम्हांस कळलें असू द्या, अद्याप तुकोजी बावानींही कोठें पराक्रम करून अधिकोत्तर मेळविलें नाहीं. सुभेदाराचेंच मेळविलें खातात, आणि महादजीबावांनींही अधिकोत्तर कांहीं मेळविलें नाहीं. राणोजी शिंद्याच्याच दौलतीवर उड्या मारितात. जयाजी शिंदे मेल्यावर, दत्ताजी शिंद्यानें कशी लढाई केली, तदोत्तरही कसे पराक्रम केले, तसे तुम्हीं अगर तुकोजीबावांनीं कोठें काय पराक्रम केले आहेत ? आणि सांप्रत धनी लहान, मुत्सद्यांचा कारभार, राज्यांत मातबर सरदार तुम्हीच दोघे. तेही समयानरूप समजूनच तुम्हांशीं वर्ततात. कैलासवासी श्रीमत रावसाहेब होते, ते वेळेस त्यांच दाबही तसेंच होतें. तुमच्या वर्तणुकीही तशाच होत्या. असो. इतकें बोलावयास कारण हेंच कीं, तुकोजी बावांचें इतके दिवस वांकडें पाऊल पडलें नाहीं. परतु चार पाच वर्षें उभयतांच देशीं होते, तेथें उभयतांची मसलत जशी जाली असेल, तशी यांचीं पावलें पडत जातात. असो. काय चिंता आहे ? तुमचें मानस असेल कीं, बाईस चहूंकडून उपद्रव जाल्यानें, सारेच बंदोबस्त आपण केल्यावर बाईनी काय करावयाचें आहे ? परंतु तुम्हांसही कळलें असू द्या, मी सुभेदाराची सून आहें. केवळ तुकोजीबावाच दौलतीचे धनी आणि मी कशांत कांहीं नाहीं, असें समजू नका. तुकोजीबावा हे माझे हातचे कामास लावलेले आहेत. त्यांणीं निमकहरामीचे फंद आम्हांसी केल्यास, पुढें सुखरूप दौलत करू म्हणतील, तर त्या गोष्टी दुरापास्त आहेत. फार खराब होतील.

आजकाल पाटीलबावांचा दम तुकोजीबावा फार राखितात. आणि पाटीलबावांच्याही चित्तांत फार फद असेल, उभयतांही फौजसुद्धां मजवर चालून यावें. सुभेदारांचे पुण्यप्रतापें येथेंही कोणी बांगड्या लेऊन बसलें नाहीं. श्रीमार्तंड समर्थ आहे. जें ईश्वर घडवील तें खरें ! ' इतकें बाई बोलल्यावर बाळारावांनींही फार नम्रतेचीं उत्तरें केलीं कीं उभयतांसही वडील आपण आहेत. जितकी आपण रागें भरून आज्ञापिलें, त्याचे लेशही पाटीलबावाच्या चित्तांत नाहींत. असें असतां कितीकांनीं कितीक गोष्टी विपर्यास आपणास समजाविले असतील ते किमपी ध्यानांत न यावें. सुभेदाराचे जागां व राणोजी बावाचे जागा उभयतांसही आपण वडील आहेत. असें फार बाळाराव बाईशीं ममतायुक्त बोलले बाई बाळारावाशीं बोलली जे, बहुत ममतापुरस्कर बोलतां परतु दोन्ही ज्ञाने तुम्हांस पाठ आहेत. वरते तोंडानें बोलत जावें, पायानें तुडवीत जावें, हातपाय जोडून आदब करीत असावी, हे तालीम तुम्हाजवळून शिकणारांनीं शिकून जावी. असो. तुकोजीबावांनीं इतकें जें केलें आहे, तें तुमच्या मुखातरें पुण्यांतही श्रीमतांजवळ बदोबस्त केलाच असेल. येविशीं पुण्याहून धन्याचेंच पत्र आम्हांस आणा कीं, सुभेदाराचे तुम्ही काहीं नव्हां. त्यांचे दौलतीचे वारिसदारी तुम्हांस पोहचत नाहीं. सर्वविशीं मुगुटमणी तुकोजी-बावा आहेत. तुम्हीं उठून काशीयात्रेस जाणें. असें धन्याचें व कारभाऱ्याचें पत्र, शभर स्वार, एक कारकून येऊन, त्यानीं आम्हास उठून जा म्हटलें म्हणजे आम्ही तुमचे आज्ञेचा उजूर करणार नाही त्याचीच आज्ञा आम्हांस शिरसावद्य आहे. ' बाळाराव बोलले जे, श्रीमत धनी, ते आमचे ओंजळीनें पाणी पितात कीं काय ? बाई बोलली जे, तेही काय करतील ? आजचा काळ असाच आहे. अशीं फार बोलणीं झालीं मग बाळारावही बाईच्या सतोषानरूप बोलून बाईस सतोष करून निरोप घेतला. [ महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें. लेखांक १२ पृष्ठ ५२–५३. ]

पृष्ठ ७५ जसे तुम्ही आपल्या बायका सुपारीच्या खांडासारख्या गिळून गेला इ०.

" कोणे वेळेस ( अहल्याबाईच्या ) बोलण्यांत आलें आहे कीं, शिंद्यांनीं बायकांच्या मेखा खांदडीस दिल्या, तसें येथें होणार नाहीं. सुभेदारांच्या पुण्यप्रतापें जें घडणें ते यथायोग्यच घडेल, " असें दोन चार वेळां भाषणें जालीं आहेत.

[ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रे. लेखांक ४० भाग १ ला पृष्ठ १०४. ]

पृष्ठ ८१ काकडाबरः— मोडीवाचनाची चूक दिसते. "वाढवाडावर" असें

मुळांत असावें ? या बखरींत अन्यत्र काकड गांव आलें आहे, तें गुजराथेंत आहे.

काकडः— हेंच काकर असावें. या बाबत Imperial gazetteer of India यांत पुढील माहिती मिळते. Kankrej is a flat open and fairly wooded country situated on both sides of the बनास river ( Palanpur agency, Gujrat. ) Kankrej comprises twenty six different estates held by Rajputs. The principal village in Kankrej is Thara, five miles north of which is Kakar ( काकड ) the ancient capital of the state with some ruined temples.

( काकडादा नावाचें एक गांव महेश्वर परगण्यांत महेश्वर व माडूचा किल्ला यांमध्यें आहे. येथें सैन्याच्या छावणीसाठीं तळ पडत असे, असें सागतात. तेव्हां काकड व काकडदा एकच कीं काय ? )

पृष्ठ ८१ परिच्छेद ५५ यातील टिपूच्या मराठी लष्करावरील छाप्याची हकीकत व टिपूचे कागदपत्र सुभेदाराकडे येत यासंबंधीं माहिती व खुलासा. सन १७८६ नोव्हेंबर– " टिपूच्या लष्करांत मराठ्याच्या हालचालीच्या सर्व बातम्या कळत होत्या. सायकाळची सध्या आटपून हरिपत तात्या मोगल व भोसले यासह आवशीस कलकेरीकडे निघाले. तों वाटेंत बारी होती तींतून बाजारबुणगें व लष्कर जात असतां टिपूच्या फौजेनें येऊन त्यावर बाणांचा अतोनात वर्षाव केला व बेदड्यांच्या झुडी येऊन बेलाशक बाजार बुनगें लुटू लागल्या ! भोसल्यांचें बुनगें बरेंच लुटले गेलें आणि मोंगलांची तर अतोनात नासाडी झाली. या मोहिमेंत टिपूनें मराठ्यांच्या लष्करावर घातलेला हा शेवटचा छापा होय. छापा घालण्यापूर्वी व नतरसुद्धां टिपूकडून हरिपत व होळकर याजकडे प्रत्यहीं पत्रे येत होतीं कीं, तहाचे बोलणें करण्याकरितां वकील पाठवीत आहों. ते वकील कधीं पाठवावे हें लिहून यावें. होळकराच्या पत्रात टिपूनें लिहिलें होतें कीं, " वकील मातबर पाठविले आहेत. याचा बहुमान करून ज्या गोष्टीकडून दोहींकडील खलष दूर होय तें करावे. " त्यावर होळकरानीं जबाब लिहिला कीं, " वकिलाची रवानगी करितों, कधीं करावी हें उत्तर येतांच रवानगी करितों, म्हणून ( आपलीं ) पत्रें येत असता दरम्यान छापा आला ही गोष्ट न व्हावी. त्यास आपण दाना दुरंदेशी आहेत. असें असता ही गोष्ट घडू नये. त्यास ज्या समयीं सरकारात वकिलाचें प्रयोजन लागेल ते समयीं आणविले जातील. " हें होळकराचें उत्तर बाणेदारपणाचें होत. तहाबद्दल टिपूची मध्यस्थी आजपर्यंत व यापुढेंही होळकराकडेच होती. असें असतां ती मध्यस्थी एकीकडे राहून टिपूनें विश्वासघात करून छापा घातला ही गोष्ट होळकराच्या मनास बरीच लागली असावी. छापा आला त्या वेळीं

शत्रूच्या लोकांनीं गर्दी केली त्यांतच होळकराचे पेंढारी मिळून त्यांनीं आपलेंच लष्कर लुटलें, असा बोभाटा त्यावेळीं फार झाला होता, व त्यांत बरेंच तथ्य होतें. छाप्यानतर दुसरे दिवशीं भोसले व मोंगल यांच्या लष्करांतलीं उंटें, घोडीं, बैल वगैरे पेंढाऱ्यांकडे सांपडलें, हें त्यांस प्रत्यक्ष प्रमाण होय. शत्रूकडून आलेला तहाचा सदर्भ कबूल करण्यांत होळकरानीं कांहीं लांचलुचपत घेतली असावी, आणि त्यांच्याच प्रेरणेवरून पेंढाऱ्यानीं लष्कर लुटलें, व लुटीचा माल टिपूस निम्मा किंमतीस विकला, वगैरे अफवा त्या वेळीं मराठी लष्करात उठल्या होत्या, त्यांत सत्याचा अश पाहूं जातां ज्यांनीं या मोहिमेचा बराच बोजा आपल्या शिरावर उचलला होता असे थोर सरदार तुकोजी होळकर शत्रूस सामील होऊन मराठी राज्याशीं बेइमानी करितील हें मुळींच सभवत नाहीं. पेंढारी ते बोलून चालून पेंढारीच ! त्यांनीं पाहिजे तें कुकर्म केलें असलें तरी त्याचा दोष होळकरावर लादणें वाजवी नाहीं. होळकरांकडे तहाप्रकरणीं टिपूचे कागद नेहमीं येत असत व ते कागद वाटेंत धरून त्यांत कांहीं फितुराचें सापडतें की काय, म्हणून पुष्कळ शोध त्या वेळीं झाला. पण तसा लेखी पुरावा कोणास कांहीं एक सांपडला नाहीं लष्करच्या हालचाली होळकराच्या सल्लयानें हरिपत करीत असत ही गोष्ट पुष्कळ सरदार लोकास आवडत नव्हती हे मात्र खरें."

[ ऐतिहासिक लेख सग्रह खरेकृत पृष्ठ ४०१२, ४०१३, ४०३४. ]

पृष्ठ ८२ ओळ ७ वी **मोगल भोसले याचे येथें रामजानीचा तमाशा होत होताः**— या प्रसगाचा उल्लेख समकालीन ऐतिहासिक कागदपत्रांत नाहीं. परतु एका पोवाड्यात मात्र आहे. शाहीर राधुकृत बदामीच्या किल्लयावरील लढाईच्या पोवाड्यांत पुढील उल्लेख सापडतोः— "किल्लयात फिरगी रोहिला जगी, मारितो रग रकेल्याचा । तळ्याकडे मोर्चा भोंसल्याचा। आत कानडा लोक फांकडा, शिपाई सडे तलवार नेमिले चार हजार ।। तळ्याचा तिरीं भोंसला, शिरी श्रीमत बिनीवर । मोंगलाचें लष्कर ।। बसूनिया हबीर करिती विचार 'हल्ला करा एकदाची' खबर ऐका बदामीची ।। किल्लयाचें आग भिउनि फिरग भार हा पळतो कानड्याचा । मुजरा पाहती किल्लयाचा ।। पाटणकर दग, वाजे मृदग, माडला रग, गोळा सुटला तोफेचा । ठाय उडविला नायकिणीचा ।। "

पृष्ठ ८३ ओळ ७ वी **१० हजार फौज घेऊनः**— "१० हजार फौज देऊन" असें पाहिजे.

पृष्ठ ८४ **उज्जनीस येऊन गोळे करणें इ०:**— 'गोळे मारणें' असें मुळांत असावें.

पृष्ठ ८६ **पाटिलबावांनीं पागोटें टाकून फेटा बांधलाः**— केल्या कर्माचें फळ मला पावलें असा पश्चात्ताप केला— "सांप्रत बावाही आपले जागां खिन्न आहेत. श्रीमंतानीं लिहिलें व घरच्या मडळींनीं सांगितलें, परतु होणारा सारखी बुद्धि जाली. हिंदुस्थानी याचे विश्वासावर गेलों, त्याचें फल पावलों, असें म्हणत असतात. होणारास कोणाचा उपाय नाहीं. वाईट व्हावें याकरिता त्याणीं सग्रह केला नवता. परंतु हिंदुस्थानी बेईमान वेळेस त्यांणीं घालविलें, हें आता प्रत्ययास आले."

[ आप्पाजी रामाचें पेशव्यास पत्र ता. २८ जुलै १७८३ लेखांक ५०३ पृष्ठ न. ६९२. महादजी शिंदे यांची कागद पत्रे सपादक सरकार व सरदेसाई. ]

पृष्ठ ८८ ओळ २ री **करवंदीप्रमाणे थालनेर येथे.**— करवदी प्रगणें ( परगणे ) थालनेर असें तर मुळात नसेल ?

पृष्ठ ८९ ओळ १७ वी **मल्हारगड.**— उदेपूरच्या आग्नेयीस व मदोसराच्या वाव्यव्येस आहे.

पृष्ठ ९० परिच्छेद ६० ओळ ११ वी **हल्ला आला नाही** यापुढें पूर्ण विराम आहे तो नको.

पृष्ठ ९४ परिच्छेद ६३ ओळ ५ वी **नारो गणेश असताना चढवीत होतेः**— नारो गणेश अस्तन्या चढवीत होते. आवेश किंवा स्फुरण आलें असतां आपण अस्तन्य मागे सारतो. नारो गणेशाला ईर्षा आली होती व तो अस्तन्या सारू लागला, होता परंतु आबा चिटणीसानें त्याला बुद्धिवाद सांगून शांत केलें.

पृष्ठ ९६ परिच्छेद ६४ **तुकोजी होळकराने नारो गणेशाचा केलेला छळ**— "सुभेदारांकडील प्रकार म्हणावा तरी, राजश्री नारोपत यांचा दाब व चाल यथास्थित बरी अथवा वाईट होती. परतु सुभेदारांचा आब रक्षून सर्वांची मर्जी रक्षण केली होती. गुदस्तापासून येथें आलिया तागाईत पाटिलबावांसीं स्नेह सपादून, थोडी बहुत पांच लक्षांची वांटणीही घेतली व पांचा लक्षांचें इनामही करून घेतलें, आणि फिरोन भयप्रीतही राखिली होती, व दरबारांतही सर्वांसीं स्नेह लहान मोठ्यांसीं ठेविला होता. ऐसें असता, सुभेदारांनीं मशारनिल्हेची अब्रू बेतऱ्हा घेतली. ब्राह्मणाचें पारिपत्य श्रीमतांचे राज्यात ऐसें कोणींच केलें नाहीं. श्रीमतांचे घरीं मुत्स-द्यावर अथवा सरदारावर इतराजी जाली तर दरबार मात्र मना होतो. घरीं बसले नतर त्यास शिक्षा जाहालियानतर पांच रुपये त्याजपासून जागा असल्यास घ्यावे, नाहीं तर सरकारकामाचाच नसला तर दूर करावा. ही गोष्ट निदान जेथें तोडच नाहीं तेथें ह्या गोष्टी घडतात. बहुतच हरामखोर असला तरी किल्लाकोटही प्राप्त

होतो. परतु मातबर माणसास अथवा छोटेखान्यास ब्राह्मणास मारहाण करणें अथवा बदुखेचे जामगीनें आंग भाजावें, हें कार्ठे ऐकण्यांत नव्हते. तें नारोपतास येथें प्राप्त जाहालें. मशारनिल्हेची जप्ती केली घोडीं, उंटें, दौलत सर्व सरकारांत लाविली. त्यास कैद केलें. पुत्र व स्त्री या उभयतांस निरनिराळी आणि नारोपतास स्वतत्र याप्रमाणें ठेवून, मागतीं जे समयीं नारोपताचें पारिपत्य भिकाजी होळकर यांजकडून करविलें, तेव्हां त्यानीं मशारनिल्हेचे स्त्रीस व पुत्रास उष्णामध्यें उभे करून, त्यांचे रूबरू मशारनिल्हेस तव्यावर उभें केलें आणि कानास चाप लाविले. त्यांद्यावर बदुका दिल्या. ऐसी बहुत प्रकारे विटबना केली. प्रस्तुत कारभार राजश्री पाराशरपत बाष करीत असतात जे समयीं बहुतच निग्रह मशारनिल्हेवर केला, तेव्हां गोवर्धनचे मुक्कामींहून पाटिलबावानीं राजश्री राणेखानभाई व राजश्री सदाशिव मल्हार यांस पाठविलें. त्यांनीं जाऊन सुभेदारास बहुत निषेध केला तेव्हां बोलले कीं, याउपर त्यास मारहाण करणार नाहीं इतकी मात्र गोष्ट कबूल केली परतु खाण्यापिण्याची जैसी आटक होती, त्याप्रमाणेच आठ पध्रा दिवस होती. एक मार मात्र बद जाहला होता. नतर मशारनिल्हेपासीं पन्नास लक्ष रुपये मागों लागले. निदान पचवीसपर्यंत आले. तेव्हां मशारनिल्हेनीं उत्तर साफच केलें कीं, माझी अब्रू राहती तर पांच रुपये तुम्हास, माझे पदरीं होते किंवा नव्हते, परतु अब्रूकरितां देणें प्राप्त होतें. आतां कांहींच मिळत नाहीं. प्राण घ्यावा इतकी मात्र गोष्ट आहे. तेव्हा चोहोंकडून उपराळा नाहीं. हकनाहक प्राण जातो आणि विपत्य होतात. ऐसें जाणून पध्रा लक्षाचा ठराव जाहाला. शिवाय दरबार खर्च काय पडला तो न कळे. याजमुळें पाटिलबावास बहुतच वाईट वाटलें ”

[आप्पाजी रामाचें पेशव्यास पत्र. महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें लेखांक ५८६.]

पृष्ठ ९६ ओळ १ ली बापू सुभेदारापुढे ठेऊनः– ‘बापूनीं सुभेदारापुढें ठेऊन’ असे मूळात असले पाहिजे.

पृष्ठ १०२ ओळ ३ री “श्रीमंतास करण्यास–” “श्रीमताचे करण्यास” असें असावें.

पृष्ठ १०४–५–६–७ परिच्छेद न. ६६ यांतील मेडत्याची लढाई होळकराच्या मदतीनेंच केवळ फत्ते झाली अशी जी हकीकत सांगितली आहे, तिला पारसनीस सपादित जोधपूर येथील राजकारणें या पत्रव्यवहारांत आधार सांपडतो. पेशव्याचा जोधपूर येथील वकील कृष्णाजी जगन्नाथ २-११ १७९० च्या पत्रांत म्हणतो– “मेडत्याची लढाई श्रीमतांचे पुण्यप्रतापें फत्ते जहाली. डभाईचा तोफ-

खाना पिऊन खातरेंत न आणतां हजार स्वारांनीं तरवार अशी चालविली जे, दोन कोस माघारे फिरविले. राजश्री अलीबहादराचे दिवाण राजश्री बळवतराव सदाशिव, व राजश्री काशीराव होळकर व राजश्री बापूजी होळकर मागाहून येऊन तरवार चालविली, तेव्हां लढाई फत्ते जहाली. अस्सल वर्तमान या प्रकारें आहे."

पृष्ठ १०६ **अफूचा गाळावा घेऊन**– पैजेचा विडा उचलणें, किंवा आण प्रमाण करणें अशा वेळीं अफू गाळून प्यावयाचा कांहीं विधि रजपुतात असावासें दिसतें. उदाहरणार्थ पुढील उतारा पहा– "इद्रसिंग सवाईसिंगाचा भाऊ व सिवचद भडारी व बुधसिंग सर्व एकत्र होऊन, परस्परें निखालसता करून अफीम गाळून प्याले. आणभाष, क्रिया केली जे, बक्षीनें सवाईसिंगासीं नासू नये, सवाई-सिंगानीं बक्षीशीं दगा करू नये. याप्रमाणें ऐक्यता जहाली"

[ जोधपूर येथील राजकारणें. पृष्ठ १७ लेखांक २७ वा. ]

पृष्ठ १०९ **सत्वासची गढी खाली करून होळकराचें ठाणें उठवून (महादजीनें) बऱ्हाणपूरचा सुमार धरला वगैरे**–– "नर्मदेच्या दक्षणेस नेमावर महाल मोठा. सिंदे होळकरांचा समाईक. त्यात सत्वास जागा बहुत दिवस उजाड पडली होती तेथें (अहल्या) बाईनीं ठाणें ठेविलें. निमें ठाणें (महादजी) बावांचें असावें, तें बाई ठेवू न देत. म्हणत कीं, खर्च पडला तो देणें. असें एक वर्ष लोटलें साप्रत बावा त्याच मार्गे आले, त्यांनीं ते जागा खालीं करून घेतली. त्याचे बदला दुसरें स्थळ यास (म्ह. अहिल्याबाईस) लाऊन दिलें म्हणोन वर्तमान आलें. बाई फार श्रमी आहेत" [ मराठी रियासत उत्तर विभाग २ पृष्ठ २५९. ]

पृष्ठ ११३ **असे बोलणे होताच त्या समयीं**— असें त्याचें बोलणें होत आहे तोंच.

पृष्ठ ११४ **पण निशाणाचा हत्ती भवानी शंकर मागे फिरेना. तेव्हा निशाण उतरून घेतल्यावर मागे फिरला**–– ज्या हत्तीवर सैन्याचे मुख्य निशाण उभे केलेलें असतें त्याचें महत्त्व लढाईत फार. निशाणाचा हत्ती शत्रूनें घेरून वळवून नेला तर किंवा तो हत्ती माघारा फिरला, तर तो पराजय किंवा मोड झाल्याची खूण समजली जाई. सर्व सैनिकांचें लक्ष त्या निशाणाकडे असें यामुळेच हत्तीच्या पायांत अदू घालण्याची पद्धत पडली. अदू घातले म्हणजे मग हत्तीला जागचे हालता येत नसे. बाकी हत्ती हा स्वतःच अत्यत बुद्धिमान प्राणी असतो व त्याला एकदा हुकूम झाला म्हणजे तो एकनिष्ठेनें बजावतो. आपल्या जवळ निशाण आहे तों-

पर्यंत मागें फिरावयाचें नाहीं हें त्याला ठाऊक असतें. येथील युद्धप्रसंगांत तो त्याच न्यायानें वागला. त्याच्या वरून निशाण उतरून घेतलें तेव्हांच तो माघारी फिरला !

पृष्ठ ११५ याचा बेलभंडार त्यांची उदी— होळकरांनीं बेलभंडार उचलून व शिंद्यांनीं उदी उचलून शपथ प्रमाण केले. महादजी शिंद्याचा गुरु किंवा आराध्य दैवत एक मुसलमान साधु होता. सबब शिंद्यानीं उदी उचलून शपथ खावी हें सरळच.

पृष्ठ ११५ सवाई मल्हारराव होळकराचे बंड— सन १७९१. पहा ऐतिहासिक लेखसग्रह खरे पृष्ठ ४४८७ व ४४८९ "तुकोजी होळकर याचे पुत्र मल्हारराव होळकर बापाशीं भांडून हिंदुस्थानांतून दक्षिण देशीं आले. त्याबरोबर पांच हजार फौज व पाच तोफा असें सामान होतें. त्यांनीं इकडे आल्यावर नबाबाच्या मुलखात धामधूम केली व पेशवाईपैकीं काहीं गाव लुटले "चिरंजीवास समजून सांगावें. न ऐकत तर कैद करावें." अशीं तुकोजी होळकरांचीं नानांस पत्रें आलीं. त्यावरून मल्हारराव यास आणण्याकरितां नानानीं बहिरोपत मेहेंदळे यास दहा पागा बरोबर देऊन पाठविलें. त्यानीं जाऊन मल्हाररावाची समजूत करून त्यांस पुण्यापासून सतरा अठरा कोसावर आणिलें. तेथें ते बिथरून बहिरोपतांशीं कलागत करून वाफगावास गेले. बहिरोपतानीं जाऊन वाफगांवास वेढा घातला. तेव्हां मल्हाररावांनीं बाहेर पडून त्यांशीं लढाई केली आणि त्यास मोडून त्यांचा नगारा व निशाण हिसकून घेऊन त्यास तीन कोसपर्यंत पिटून घातले. त्यांनीं चासेस जाऊन नानास तें वर्तमान लिहिलें. मग नानांनीं बजाबा शिरवळकर याजबरोबर स्वतःचें पथक व रगराव त्रिंबक राजेबहाद्दर याजबरोबर हजार दीड हजार स्वार व चार तोफा असें आणखी सामान मल्हाररावांस धरून आणण्याकरिता पाठविलें. महिना दोन महिने राजेबहाद्दर यांनीं मेहनत केल्यावर मल्हारराव आपले फौजेस निरोप देऊन पंन्नास स्वारांनिशीं राजेबहाद्दर यास भेटले व त्याबरोबरच पुण्यास आले.

ज्या दिवशीं श्रीमंत डेरेदाखल झाले त्याच दिवशीं रगराव राजेबहाद्दर मल्हारराव होळकरास घेऊन वाफगावाहून पुण्यास आले. होळकरांच्या व श्रीमंतांच्या भेटी झाल्यावर श्रीमतानीं राजेबहाद्दर यांच्या रखवालीखालीं नदीपलीकडे तबू देऊन होळकरांनीं रहावें असा हुकूम केला. त्याप्रमाणें पांच सहा महिनेपर्यंत होळकर स्वस्थपणें राहिले."

पृष्ठ ११६ पन्नास स्वारानिशीं कुदून पडून फौजा हात बेहत्तर केल्याः-

पुंडलीक कातगडेकृत हिंदी-मराठी कोशांत 'इहाता' असा शब्द आहे. त्याचा अर्थ घेरा, मर्यादा किंवा हद्द असा तेथें दिला आहे. त्यावरून मूळ पाठ "फौजा

इहासा सारवतार केल्या " असा असण्याचा संभव आहे "पन्नास पन्नास स्वारानिशीं तटून पडून श्रीमत व मोंगलाच्या फौजा पळवून सीमेपार उधळून लावल्या " असा अर्थ वरील पाठ स्वीकारल्यास बसू शकेल.

पृष्ठ ११६ **त्यांचा कंपू**-- शिंद्यांचा कंपू. डिबॉइनच्या हाताखालीं तयार करण्यात आलेला.

पृष्ठ ११७ **फारबस**— मूळ शब्द काय असावा कळत नाहीं. 'सरमस्त' असा पर्शियन शब्द आहे त्याचा अर्थ Intoxicated असा आहे.

पृष्ठ ११७ **मल्हारराव फरबस होऊनः**— थोरला मल्हारराव, त्याचा पुत्र खंडेराव, तुकोजी, बापू, मल्हारराव सारे दारूबाज होते. " सरदार व कारभारी सदरहू आहेत त्यांचीं करणीं चाललीं आहेत. इतकें करून ममलत पुढें कोणती करणार ? तर गुजराथचेी मसलत नाहींशी जाली ! हे सरकार चाकरीपासून कृतार्थ व पाटिल-बावाकडील हा अर्थ गुजरल्यानें भय मनांतील जाऊन, हिंदुस्थानचे अधिकारी जालों याजवर कृतार्थता मानून, मद्यादिक महापानाचा योग ! शपथा केल्या ते दिवशी श्रीमतांचे पाय व कैलासवासी सुभेदार यांचे पाय व बाईचे पायाच्या शपथा वाहिल्या काय ? प्रांतांतील व लष्करांतील दुकानें मोडविलीं, सरकारचे जासूद, हुजरे व त्यानीं आपले जासूदसमागमें देऊन मोडविलीं, व ताकीद आजपर्यंत चालली असतां, पुन्हा प्रसिद्ध वर्तणूक व दुकाने यांसी परवानगी राजरोष चालली ! आम्ही स्वामींचें पत्र माझे नांवें आले त्यांत अनाचाराचा बंदोबस्त केला, हे फार चांगलें जालें म्हणून लिहिलें होतें, त्याजवरून सांगितलें कीं, " आपण बंदोबस्त केला, तेणेंकडून श्रीमतांस व श्रीमत राजश्री नाना, तात्यांस संतोष जाला, व पुढें या पापापासून निवृत्त जाल्यानें कल्याणाची उमेद जाली, कीं सरदारांची क्रिया चांगली जाली, कल्याण होईल, व दिल्ली आगरे जेथपर्यंत तुमचा लौकिक आहे तेथपर्यंत तुमचा सद्लौकिक जाला. तेथपर्यंत बातम्या आपल्या अखबारींत गेल्या. असें असून पुन्हां लष्करात दुकानें प्रसिद्ध बसलीं, तेव्हा ताकीद असावी." याचें उत्तर केलें कीं, " महापाना वेगळें माणूस वांचणार नाहीं. यास्तव नर्मदा उत्तरतीरीं सुटत नाहीं." तेव्हां उत्तर केलें कीं, " सुभेदार, तुम्ही शफथा पुत्रांसहित कोण कोणाच्या वाहिल्या, आणि त्याचें उत्तर हें खासें ! सरदार व हे निघाले तेव्हां न कूच (?) गोष्टीवर क्रिया तुमची ठीक न राहिली ! तेव्हा तुमची शपथ किंवा क्रिया मोठें कामात राजकारणांत कशी पथ्य पडल ? व खातरजमेवर कसें राहतील ? बाह्य इतका लौकिक तरी कशास्तव केला ? तर फजीती करून घेऊ नका. राज्यांत मनाई त्या चालीनें तुम्ही चाला. नाहीं तर दाखल्यास तुम्हांसी लोक बोलतील, हें करणें उचित नाहीं." परंतु मदांधता

अविवेकामुळें शपथा केल्या, त्यावर लक्ष राहिलें नाहीं ! कारकून कारभारी बाईसुद्धा फजीत करीतच आहेत. चालीस अंतर तिळप्राय नाहीं ! सरदारीची अब्रू नाहीं ! जवळचा पैसा खर्चिणें नाहीं ! दाभाड्याचे घरचा कारभार ऐकत होतों, ती दशा सांप्रत सर्व प्रकारें येथें प्राप्त जाली आहे. त्यांत दाभाड्याचे घरीं मद्य नव्हतें, वरकड विषय होतें. येथें मद्य व अविचार, रयत लुटणें, मल्हारजी वगैरे केवळ लुच्य तऱ्हा ! जेथें मुक्काम जाला, तेथें अविचार लिहितां विस्तार ! ! "

[ होळकर दरबारातली हिंगण्यांची वकिली लेखांक ८ वा पृष्ठ १८ व १९. ]

पृष्ठ १२० मुक्ताबाई फणसे.— अहिल्याबाईची कन्या यशवतराव फणसे यांस दिली होती.

पृष्ठ १२१ परिच्छेद ७५ " सुभेदाराचें शरीर अर्धें वायूने गेलें आहे. तशीच तजवीज व कायम मिजाजी व मसलतीचा अर्थ जाला आहे ! व जेष्ठ चिरंजीव काशीराव त्याचा एक हात पाय वायूनें कमी जन्मताच आहे, व तद्वतच बुध्य, मसलत, कायम मिजाजी आहे ! ! कनिष्ठ चिरंजीव मल्हारराव त्यांची अवस्था सर्व स्वामीस विदित. जघन्यच आहे, तेंच आहे. बापूजी होळकर पुतण्या आहे, तो मात्र स्वारी शिकारी चाकरीच्या उपयोगी. त्याचे ठिकाणीं यासी द्रोहबुद्धि विशेष वाजला जाली आहे कीं, माझे पुत्र मागें पडतील. यास्तव पुत्रास रूढीस घालावें. पुत्र जेष्ठ रूढीस घालावें, तर कनिष्ठ मल्हारराव म्हणतात कीं त्यास जिवें मारीन ! ! जेष्ठ पुत्र म्हणतात कीं, मी जेष्ठ, टिक्याचा धनी. मजला रूढीस न घातल्यास गोसावी होऊन छत्रीपाशीं बसेन. हें जेष्ठाचें भाषण ! मुख्यास पुत्रमोह विशेष जाला ! व्यसनासक्ति सर्वांस. मादक वस्तूचा संग्रह ! तेव्हा सर्वांस जमा करून आम्हीं सांगितलें कीं, यानें बहुताचे नाश जाले. आपण संग्रह करिता, हे ठीक नव्हे. समय काय गुजरला आहे, व अभिमानरहित होऊन तोंच उद्योग चालणें उचित नाहीं. आपलें रूबरू कोणी बोलत नाहीं, परंतु जग विरुद्ध जालें आहे. सुभेदार कैलासवासीचे पुण्याचे पुंज बहुत होते, त्याचा खर्च होत होत आपणहि तेंच पुण्य खर्चितां ! पापोत्कर्ष विशेष जाहला. पुण्यसंग्रह सरत आला. तुम्ही सरदार थोर, केवढे तुमचे मान, थोरपणा, त्यास हा बट्टा आहे. म्हणून पुत्रसहित जमा करून बोलणें झालें. त्याजवरून पुत्रांकडून आपण श्रीमंताचे पायांची व बाईचे पायाची व श्रीमार्तंडजीचे पायांची शपथ करून, दरोबस्त लष्करचीं दुकानें उठवून, प्रांतांत दरोबस्त मनाई राज्यांतील शिरस्तेंप्रमाणें चिठ्ठी वेगळी विक्री होऊ नये याप्रमाणें ताकीद निक्षून जाली.

[ होळकरदरबारांतील हिंगण्यांची वकिली लेखांक २ रा. पृष्ठ ७. ]

**पृष्ठ १२२ "दौलतीचें ओझें कोणाचे माथा द्यावें? दोन पोरे दोन प्रकारची ":--**

" राजश्री काशीराव होळकर यास वस्त्रें द्यावीं हा पहिला बेत होता, परंतु हल्लीं मल्हारराव होळकर बिघडून आहे. त्यांचें बोलणें परस्परें व सांगूनही पाठवणें कीं, काशीराव यास वस्त्रें कशीं देतां? माझी वाट काय? माझा मजला हिस्सा द्यावा, पुढें कर्तव्य तें करावें. असें न करिता, एखादी गोष्ट केली तर, मी एखादा अनर्थ करून उठून जाईन. या प्रकारचीं भाषणें ऐकून तूर्त वस्त्रें देणें राहिलें पुढें घडेल तें खरे!! [ महेश्वरदरबारची बातमीपत्रें लेखाक २५० पृष्ठ २२३. ]

पृष्ठ १२५ **विठोबा**:-- हाच विठोजी होळकर ज्यास पुढें बाळोजी कुंजराच्या सल्ल्यानुसार दुसऱ्या बाजीरावानें हत्तीच्या पायी देऊन ठार मारले. विठोजी हा यशवतराव होळकराचा सख्खा भाऊ.

पृष्ठ १२५ **प्रति बाबासाहेबास (?) सहजात उचलून घ्यावे असा प्रसंग.**— 'बाळासाहेब' या ऐवजीं 'बाबासाहेब' असें चुकीचें वाचन झालेलें दिसते. काशीरावाला बाळासाहेब म्हणत असत.

पृष्ठ १३४ **" त्यात पवारांची जमियत स्वारपायदळ हजार बाराशे. एक तोफ रंगराव वोढेकर याचे बरोबर. तीन हजार पेढारी ":--** हें वाक्य पुढील प्रमाणें दुरुस्ती करून वाचले पाहिजे " त्यांत पवारांची जमियत स्वार पायदळ हजार बाराशें ( व ) एक तोफ रंगराव वोढेकर यांचेबरोबर तीन हजार स्वार पेंढारी."

पृष्ठ १३५ **पेंढारीः**-- शिंदेशाही व होळकरशाही पेंढारी असें पेंढाऱ्यात भेद असत. यशवतराव होळकरानें कैद करून ठेवलेला करीमखान पेंढारी हा बुढणखान पेंढाऱ्याचा मुलगा. बुढणजवळ साठ पेंढारी जमात असे. तो महादजी शिंद्याचा राणाखानभाई याच्या पदरी होता. पानपतच्या लढाईतहि तो होता.

बाप वारला तेव्हां करीमखान पांच वर्षांचा होता तो चौदा वर्षांचा झाला तेव्हां त्याच्या जवळची पेंढारी जमात हजार घोड्याची झाली. व तो होळकराच्या पदरी राहिला. होळकराजवळ त्यानें तेरा वर्षें चाकरी केली. नतर तो शिंद्याकडे गेला. तेथें त्याचें माहात्म्य फारच वाढलें. त्याच्याकडे पांच महाल होते. पुढें इंग्रज व शिंदे यांच्या युद्धकाळांत त्यानें शहाजानपूर, सारंगपूर इत्यादि आणिकहि जागा बळकावल्या. १८०७ सालीं दौलतराव शिंद्यानें त्यास कैद केलें. कांहीं दिवसानीं त्यास मुक्त करण्यांत आलें. व शिंद्यांनीं त्यास गढाकोटा मुलूख आणि दुर्जनशालाचा बहादूर-

गड बहाल केले. पुढें एका लढाईत करीमखानाचा पराभव झाला. त्या लढाईत करीमखानाचा पुतण्या हा खुशाल कुवर आणि मोति कुवर याजबरोबर निसटून गेला.

पुढें त्या तिघांनीं भोपाळनजीक आसरा धरला. उपर्युक्त नामदारखानाच्या बापाचें नांव हबीबुल्ला ऊर्फ हिरू पेंढारी असे आहे. १८१२ सालीं त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत कैद करून ठेवण्यांत आले होते हिरूचा बाप इब्राहीम पेंढारी आणि करीमचा बाप बुढण पेंढारी हे सख्खे भाऊ

हिरूखान पेंढारी असईच्या लढाईनंतर लवकरच वारला. त्याला तीन मुलगे होते. त्यापैकीं ज्येष्ठ दोस्त महमद हा त्याच्या पेंढारी पथकाचा नायक बनला. १८१२ सालीं दोस्त महमदाजवळ १० हजार शिलेदार २–३ तोफा व कांहीं पायदळ होतें.

होळकरशाही पेंढारीः— १८०२ सालीं यशवतराव होळकराजवळ गनीखान नांवाचा पेंढारी जमातदार होता तो पुण्यावरील लढाईत ठार झाला त्याचा मुलगा इमामबक्ष हा नतर होळकराच्या सैन्यातील मुख्य बनला.

हे सर्व पेंढारी मूळ दोघा अफगाण भावांची अवलाद होत. युसुफभाई अफगाण जमातींतील महमदखान आणि समतखान असे दोघे याचे पूर्वज किंवा मूळ पुरुष होत. प्रथम काल्पीजवळ असता थोरल्या बाजीराव पेशव्यांनीं त्यांना आपल्या नोकरींत घेतले. त्यावेळीं ते रोहिलखडांत रहात असत. फक्त ५० अफगाण शिपायांचें पथक त्याजवळ त्यावेळीं होतें. पेंढाऱ्यांच्या जमातींना 'दरा' अशी एक सज्ञा आहे."

[ Poona Residency Correspondence Volume 14 लेखांक १३४. ]

पृष्ठ १३९ **मावशीबाईः**— हरकूबाईलाच मावशीबाई म्हणत असत. (महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें पृ. ६१ ) ही थोरल्या मल्हारराव होळकराची उप स्त्री

पृष्ठ १३९ परिच्छेद ८७ **जावडाचावडीः**— 'नावडातावडी' पाहिजे. या नांवाचा गाव महेश्वराजवळ आहे

पृष्ठ १४० **समेरूढचा घाटः**— सिमरोळ गावानजीकचा घाट. त्यावरून त्याला समेरूढचा घाट किंवा शमरूढचा घाट म्हणण्याची पद्धत पडली. सिमरोळ गाव महू परगण्यात असून तेथें एक कजळीगड नावाचा किल्लाहि आहे.

पृष्ठ १४२ **मग देशीहून लाडाबाईचे वर्तमान आलें**:— लाडाबाईच्या मृत्यूचें वर्तमान लाडाबाई ही यशवतराव होळकराची एक पत्नी.

पृष्ठ १४२ परिच्छेद ८९ व ९० **शिंदे बायांशीं यशवंतराव होळकराचा समेट व नंतर लगेच शिंदे बायांच्या सैन्यावर छापा**— या सबधांत जिवबादादा बक्षी चरित्रातील पत्रांत तपशीलवार माहिती आहे. "(बायांशीं)

समेटाविशी वानवडीहून रा० तात्या पागनीस व आबा चिटणीस व बाबूराव आंग्रे व कपूवाले फिरंगी असे पुसेसावळीचे मुक्कामीं आले होते. बोलणें झाले. ठराव म्हणाल तर ( दौलतराव शिंद्यानें ) श्रीमंत बायास असीरचा किल्ला द्यावा आण आकरा लक्षाची जहागीर बऱ्हाणपूर व सरकार हांडा व जहानाबाद असे व आणखी अकरा लक्षांचे महाल द्यावे. आणि बायाची खासगी वस्तभाव व जवाहीर वगैरे जें आहे तें द्यावे. रावजीनी ( नारायणराव बक्षी यानीं ) वानवडीस पाहिले प्रमाणें कामकाज करावें. आणि भाऊनी ( बाळाभाऊ बक्षी यानीं ) बरोबर असावे. ××× या प्रमाणे ठराव झाल्यावर बाया व त्याचे कारभारी बाळाभाऊ हिंदुस्थानात जहागिरीचे ठिकाणीं जाण्यास निघाले. रस्त्यात उज्जनीचे सुमारें पोचतात तों "मातोश्रींचा (बायांचा) मुक्काम आणि यशवतराव होळकराचा मुक्काम जवळ होता लष्करास लष्कर लागूनच होतें. दगा करील हे कोणास ठाऊक? पहाटेस छापा घालून चीजवस्त झाडूनसारी लुटली यशवत बाबूराव व धनबादादा व आनराव मळगावकर व सखोबादादा, व साबाजी नारायण यांची बहुत खराबी झाली. परतु जिवानिशीं आले. त्या गडबडींत एक लखबा वागळा यास तोफेचा गोळा लागून काळ झाला."

[ जिवबादादा बक्षी चरित्र पृष्ठ २४६. ]

"इकडील वर्तमान तर आपलें लष्कर उज्जनीवर मुकाम करून होतें. त्यास यशवतराव होळकर याचा व आपला एकोपा जाहला होता. आण लष्कर त्याचे आपले संनिध उतरले होतें. त्याणीं विश्वास दाखवून एकाकी लष्करावर कार्तिक शु॥ १५ चे दिवशीं छापा घालून लष्कर लुटून घेतलें. ते दिवशीं लखबा वागळा यास तोफेचा गोळा लागोन ठार जाहला. ×× एकएक घोडेनशी हजार दोन हजार जमेतिनशी मातोश्री बाई साहेबांस घेऊन ते दिवशीं वीस कोस आलों" [बाळकृष्ण विठल याचें पत्र १४।१२।१७९९ चें जिवबादादा बक्षी चरित्र लेखांक २९९ पृष्ठ ५३२. ]

पृष्ठ १४४ **झाडीत असल्यास लागून होतेः**— याचा अर्थ लागत नाहीं. मूळ पाठ काय असावा तें उमगत नाही.

पृष्ठ १५१ **काशीराव होळकर याजकडील सरमजाम महेश्वरीं होता त्याच्या मुकाबल्यासः**— होता या शब्दापुढें पूर्णविराम समजावा. पुढील त्यांच्या या शब्दाचा संबध गोपाळराव चिटणिसाकडे आहे.

पृष्ठ १५१ **रखमाबाई**— ही पहिल्या तुकोजीराव होळकराची दुसरी स्त्री होय. हिचाच मुलगा सवाई मल्हारराव. ही फार रूपवती होती. ती १७९२ च्या

सुमारास वारली. तिचा स्वभाव अत्यंत जलाल असल्यामुळें तुकोजीनें आपलीं तिन्ही मुलें म्हणजे काशीराव, यशवतराव आणि विठोजी यांना पांडुरंग शंकर नांवाच्या एका ब्राह्मणाच्या देखरेखेखाली कायथ्यास दूर ठेविले होतें. रखमाबाईचें व अहिल्याबाईचें बिलकूल पटत नसे. रखमाबाईची छत्री इदुरास हरसिद्धी मंदिराचे ईशान्य-बाजूस नदीस लागून आहे. [ मालव साहित्य इदूर विशेष अक वर्ष ५ अक १ पृष्ठ ३५ ] रखमाबाई ही सुलतानपूर येथें राहात असे

पृष्ठ १५२ बदखलीत— मूळ शब्द 'बदखल' हिंदी आहे त्याचा अर्थ H A depressed or low spot, a bottom, basin, hollow ( मोल्स )

पृष्ठ १५२ हरनाथः— हा होळकरांचा लेकवळा होता अर्थात त्याची गणना 'कुवर' मडळींत होत होती यशवतराव होळकराचा त्याच्यावर फार विश्वास असे.

पृष्ठ १५३ भारमल.— बखरीत येणारे भारमल व हरनाथ हे होळकराचे लेकवळे. "लेकवळे मडळीस दरमहा असून त्यास कागदोपत्री 'चिरजीव' असें लिहिण्याची पद्धत आहे. जेव्हां जेव्हां यशवतराव महाराजानी हरनाथसिंग यांस पत्रे लिहिली आहेत तेव्हा त्यानीं त्यास 'चिरजीव हरनाथसिंग' असें लिहिलें आहे. या लोकाची इदूर येथें 'कुवर आळी' म्हणून एक आळी माणिक चौकात प्रसिद्ध आहे. या कुवर मडळींत पुष्कळ पुरुष मुत्सद्दी, शूर, कर्तबगार असे होऊन गेले आहेत. या कुवर जातींत एकाच जातीचे लोक म्हणजे मराठे, धनगरच आहेत असें नाहीं तर त्यांत रजपूत, मुसलमान वगैरे जातीचेहि लोक असत. हरनाथसिंग या नांवावरून तो रजपूत असावा असें वाटतें सर्व कुवर मडळी 'होळकर' हेंच आपलें आडनाव बहुत करून लावतात. भारमलदादा हेहि हरनाथाप्रमाणेंच लेकवळे ( कुवर ) होते. हे मोठे मुत्सद्दी होते. महेश्वर सस्थानचा कारभार ते पहात असत."

[ भवानी शकर यांची रोजनिशी पृष्ठ २०. ]

दक्षणेंत लेकवळ्याना 'शिंदे' ही सज्ञा होती. हे लेकवळे आपापल्या आईचें आडनांव लावीत. पुण्यात शिंदे आळी म्हणून आहे ती प्रसिद्धच आहे.

पृष्ठ १६१ अंतुरचा घाट — सध्यां हा घाट आवऱ्याचा घाट या नावानें ओळखला जातो.

पृष्ठ १६१ मी याचा वेगळा कसा होऊं ? — मी यांच्यापासून वेगळा म्हणजे दूर कसा होऊ, असें त्यांस झालें. यांच्याजवळ राहिलो तर हे केव्हां अब्रू घेतील याचा नेम नाहीं अशी भीति त्यास उत्पन्न झाली.

पृष्ठ १६१ हिंगलाजगड — भानपुरापासून १४ मैलांवर आहे. हा पूर्वी जयपूरकराच्या ताब्यात होता. पुढें होळकरांनीं जिंकला. किल्ल्यावर हिंगलाज नांवाची

देवी असून रजपूत लोक विशेष करून तिचे भक्त असतात.

पृष्ठ १६१ रामपुरा — हें रामपुरा परगण्याचें मुख्य ठिकाण. पूर्वी हें उदयपूरच्या ताब्यांत होतें. येथील चद्रावतानीं मराठ्यांची सत्ता झुगारून देण्याचा अनेक वेळां प्रयत्न केला. परतु तो निष्फळ झाला. शेवटीं थोडीशी जहागीर घेऊन त्यांना स्वस्थ बसावें लागलें. रामपुरा येथील तलवारी प्रसिद्ध आहेत

पृष्ठ १६१ गरोठ — हें रामपुरा, भानपुरा जिल्ह्याचे सुभायतीचें ठिकाण होतें. तें पहिलें भिल्लांकडे होतें त्यांजपासून चद्रावतानीं जिंकून घेतलें. येथूनच ३ मैलावर नागदा, मथुरा रेल्वेचें स्टेशन आहे.

पृष्ठ १६२ प्रात धुंडाड — जयपूर ज्या भागांत आहे, त्या राजस्थानच्या भागाचें जुने नाव 'ढूँढाड' असें आहे या देशांतील डयौसाचें राज्य बडगुजराच्यापासून जयपूरवशातील दुलेह रायजी यानें जिंकून घेतलें.

पृष्ठ १६२ खुशालगड — यालाच कुशळगड किंवा कोसलगड म्हणतात. हें ठिकाण महू परगण्यात विंध्याद्रींत आहे. तेथील किल्ला प्रसिद्ध असून त्याची उंची समुद्रसपाटीपासून २६२१ फूट आहे.

पृष्ठ १६३ तेथून सोहरभचे सुमारे हासगनावरून आले — वास्तविक "तेथून सोरमचे सुमारे हासगजावरून आले." असा मूळ पाठ असावा. हासगन हे 'हसगज' या शब्दाचें चुकीचें वाचन आहे

पृष्ठ १६६ परिच्छेद १०७ भरतपूरची लढाई — ९।२।१७६७ च्या एका बातमीपत्रात भरतपूर किल्ल्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलेलें सांपडतें —

"भरतपुराची माहियत तरी शहरकोटा सभोंवता चार गज खदक असे. सभोंवतें रान, उतर अलगेस दोन कोस झाडी व पूर्व अलगेस दीड कोस झाडी असे व दक्षण अलगेस येक कोस झाडी असे व पश्चिम अलगेस कुमेरीचे रस्त्याकडे पाव कोस झाडी, बाकी मैदान असे. शहराचे बुरुजावर तोफ मोठी येक व दोन लहान येकून तीन. तीन भांडीं दर बुरुजास असेत. मध्यें सफीलीवर रेहकले व जजाला व जबुरे असे सामान शहरपन्यावर आहे. उपरी शहराचे पूर्व अलग व उतर अलगेचे कोनेयावर पका किला असे. त्याचा खदक वीस गज रुद असे. बुरुजावर मोठे भांडें येक व दोन लहान असी तीन तीन भांडीं भारी चागली दर बुरुजास असेत. मध्यें सफीलीवर लाहान भांडीं वगैरे जलेबी रेहकले भारी असेत. लहान भांडीं तर बहुत असेत. किले यास दोन द्वारें असेत. येक दक्षण अलगेचे, त्यापुढें जिभी. चौबुरुजी मातबर असे. उतर द्वार येक असी दोन द्वारें असेत.

[ ऐ. सकीर्ण साहित्य ख. ४. लेखांक न. ६ पृष्ठ २६. ]

पृष्ठ १६८ **गराडा फिरवून देऊन** — येतांच यशवतरावानें भेटीच्या बैठकीच्या डेन्याभोंवतीं आपल्या गार्डसचा पाहारा उभा केला. दगाबिगा होऊं नये यासाठीं ही तरतूद. गराडा म्हणजे गार्डस.

पृष्ठ १७१ **तारिख बंद हिशास्ते टाकली**— 'तारीख बदिस्त ते टाकली' असें मुळांत असेल ? बदिस्त = n a Settled stiperd or Salary. बदिस्ती— Well ordered or well arranged state, Proper management or regular disposition. भावार्थ असा की यशवतरावानें सैन्यांतील शिपायांचे दर तारखेस घ्यावयाचे हजेरी पट पाहण्याचे वगैरे कामें टाकलीं. सारांश सैन्य जय्यत ठेवण्याचें सोडून दिलें

पृष्ठ १७१ **ज्वालामुखी** — हें ठिकाण पजाबांत कांग्रा व्हॅलीमध्यें आहे. तेथें उष्ण पाण्याचे झरे आहेत. त्यातून गधकाच्या ज्वाला किंवा भपकारे बाहेर पडत असतात. जवळच देवीचेंहि स्थान आहे तिला 'ज्वालामुखी देवी' असेंच नांव आहे. कागडा आणि मडी सस्थानें सतलज आणि व्यासगगा यांच्या दुआबांत आहेत. तेथील हिदु देवालयें प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहेत. कोटकांगड्याचा किल्ला १७७४ त शीख सरदार जयचद यानें जिंकला परतु १७८५ साली ससारचद्र याने जिंकून घेतला. १८०५ च्या डिसेंबरांत यशवतराव होळकराचे वकील ससारचद्राला भेटले होते.

ज्वालामुखी देवीचें वर्णन कल्याण या हिंदी मासिकाच्या 'शक्ति' अकांत प्रसिद्ध झालें होतें. 'एका उकळत्या पाण्याच्या कुडांत पेटलेली ज्योत तेवत असते. पाण्याच्या लहरीमुळें ज्योत नाचलेली दिसते. हा चमत्कार पाहण्यास भाविक यात्रेकरूंची रीघ लागलेली असते.'

पृष्ठ १७२ **आफलावून** – कदाचित् 'अफलातून' असा मूळ पाठ असेल. अफलातून म्हणजे बेफाम.

पृष्ठ १७२ **बाराट फौज** – बरोट फौज असें पाहिजे. बरोट ही जयपुराकडील एक भाटांची जात आहे.

पृष्ठ १७३ **हरमाड्याचे मुक्कामास आले. तेथें खंडेराव होकळर यांचे प्रकृतीस विकृत जहाली** – सन १२१६ माघ शुद्ध ७ देहावसान झाले. "यशवतराव महाराज कोस्याहून रामपुरा, भानपुऱ्याकडेस येण्यास निघाले. रस्त्यांत शहापूर मुक्कामी महाराज यांचा पुतण्या खडूजी हा हैजानें (पटकीनें) वारला. या योगानें महाराजास फार दुःख झालें." [भवानी शकर बक्षी रोजनिशी पृष्ठ १४४.]

खंडेराव होळकराला यशवंतरावानें मारविला असा एक प्रवाद रूढ आहे.

पृष्ठ १७५ **भिमाबाई बुळे** – ही यशवतराव होळकराची मुलगी. भिमाबाई ही गोविंदराव बुळे यांस दिली होती. या लग्नाच्या वेळीं यशवंतराव महाराज यांनीं त्यांस बुंदेलखडांतील २ लक्ष उत्पन्नाचा 'कौंच परगणा' आंदण दिला होता. तो बुळे घराण्याकडे स्वतंत्रपणें प्रथम व नंतर रोख रक्कम असा मिळून इ स. १८४९ पर्यंत चालू होता त्याचप्रमाणे त्यांनीं चादवड परगण्यापैकीही त्यास तीन गांवें आणखी इनाम दिलीं होतीं.

पृष्ठ १७५ **सखाराम गोविंद निजबत नरतवेला नरतबेला** – घोड्याची पागा. या पागेंत घोडी मुळींच नसते या घोड्यांच्या पागेचें काम सखाराम गोविंदाकडे होते. 'कोतल नर कोतवाल घोडे मगनमस्त किलकरीत'– प्रभाकर शाहीराच्या एका लावणींत असा उल्लेख आहे

पृष्ठ १७७ **ह्राच मग** — 'ह्राच मार्ग' असा मूळ पाठ असावा.

पृष्ठ १७९ **एकलिंगजी** — हें सुप्रसिद्ध शिवमदिर उदेपूर सस्थानांत आहे.

पृष्ठ १८० परिच्छेद ११८ **त्याचे फौजेचा गाबावाबा हेरले बाहेर सुदरून काळ काढला** — इदूरकर बळवतराव कमळाकराच्या पुरवणी टीपांत 'गाबागुबा' असा पाठ सुचविण्यात आला आहे गाबागुबा याचा अर्थ किरकोळ खर्च. हा रांगडी शब्द आहे. तथापि 'हेरले बाहेर सुदरून' या पुढील शब्दाचा अर्थ अनिर्णीतच राहतो आमच्या मते मूळ पाठ असा धरला म्हणजे बरोबर अर्थ लागतो. 'त्याचे फौजेचा गाबावा बाहेरले बाहेर सुदरून काळ काढला' म्हणजे त्याच्या फौजेच्या पगारापैकीं काहीं रक्कम वरखर्चास म्हणून त्या फौजेंतील लोकांस दिली. ही रक्कम रामदिनच्या सुभ्यातील गांवावर रोखे करून परस्पर बाहेरल्या बाहेर उभी करण्यांत आली.

पृष्ठ १८१ **जयद** — जय्यत. अर्थात् साहित्य सामानानिशी व अनुभविक. कजाखी कवायती शिपायानिशी जय्यत असलेली पलटण. मूळ पर्शियन शब्द 'जह्द' असा आहे. त्याचा अर्थ Tried, Experinced असा आहे.

पृष्ठ १८२ **मैनाबाई** — ही तुळसाबाई हिची गुरुभगिनी. हिच्यामुळें इदुरांत जुन्या बाजाराच्या दक्षिणेकडील बुरुजासमोरील श्रीकृष्णाचे मानभाव पथाचें मंदिर स्थापन झालें. त्या पथाचा प्रवेश या होळकरी राज्यांत हिच्यामुळेंच झाला.

पृष्ठ १८२ **बोलपेशासारखा नमोद सिद्ध करून** — 'बोलापेशा' ऐवजीं मुळांत 'बालायेशा' असा पाठ असावा. बालायेशा याचा अर्थ पटवर्धन फारशी मराठी शब्दकोशांत उचावणी, सर्फराजी, सन्मान, असा दिला आहे.

पृष्ठ १८२ **भानपुरे मुक्कामीं यशवंतराव महाराजाचा काळ झाला** –

३१-१०-१८११ चें पत्र. "आज २७ ऑक्टोबर रोजीं यशवंतराव महाराज सकाळीं जागे झाले तेव्हांपासून त्यांची प्रकृती बिघडलेली होती. त्याबद्दलतोब तुळसा-बाईकडे वर्दी गेली. तिनें अत्यवस्थ स्थिति पाहून सर्व कारभान्यांस बोलावून आणलें. सकाळीं ९ वाजतां ( १ प्रहर दिवस येतां ) यशवतरावाचें प्राणोत्क्रमण झालें. श्रावण अष्टमी." [ Poona Residency Correspondence Volume No. 14 लेखांक ७६.]

पृष्ठ १८२ परिच्छेद १२० पासून पुढें-सन १८०९ नतर यशवतराव होळकराच्या दौलतीची जी कुतरोड झाली, व ग्रहकलहानें व फितुरीनें जो नगा नाच सुरू केला. त्यासबधीं समकालीन मराठी कागदपत्रांचा पुरावा उपलब्ध नाहीं. सुदैवानें रेसिडेन्सी दप्तरांतील पत्रव्यवहाराचें जे खड अलीकडे प्रसिद्ध झाले आहे त्यांत मात्र ती हकीकत मिळते. बखरींतील हकीकतीला उपोत्बलक असे पुढील पत्रांतील उतारे पहा

३०९-१८०९ चें पत्र. यशवतराव होळकर कूच करून निघण्याच्या बेतात आहे. बहुतेक सर्व होळकरी सैन्य गणपतरावाच्या ताब्यांत देण्यात आल्याचें कळतें. हा गणपतराव पूर्वीं होळकराचा दिवाण होता पूर्वीं यशवतराव होळकरानें भलतीच जलाली केल्यामुळें जे अनेक सरदार किंवा मुत्सद्दी त्याला सोडून गेले होते त्यांतच हा गणपतराव होता. परतु आता ते पुन्हां सर्व समजूत होऊन परत यशवतरावाकडे आले आहेत.

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखांक ९. ]

बाळाराम शेटः— ८-१२-१८११ चें पत्र. होळकराच्या लष्करांत शिपायाचा दगा झाल्यामुळें यशवतराव होळकराचा कबिला व अल्पवई बाळ राजा यांना घेऊन तुळसाबाई पळून रामपुऱ्याकडे गेली. दिवाण बाळराम शेट हा मार्गे राहून बेदिल झालेल्या शिपायाना समजुतीच्या गोष्टी सांगून शात करीत आहे. त्याचेकडून तुळसाबाईला जीं पत्रें येत आहेत त्यावरून कपूचे लोक शांत होत आहेत असें दिसतें.

[ Poona Residency Correspondence Volume No. 14 लेखांक ८४. ]

२८ डिसेंबर १८१५ चें पत्र होळकराच्या लष्कराची तलब चुकवून देण्यासाठीं बाळाराम शेट व तात्या आळतेकर फार धडपडत आहेत. परतु मुदलातच नसलेला पैका ते कोठून उत्पन्न करू शकणार ? बाबा गम्रेल येथें कोटेकराच्या सैन्याच्या सर-

कणाखालीं राहात आहेत. रामदीनच्या बेहड्यांतून नोकरी सोडून १ हजार स्वार बाहेर पडले असून ते गांग्रेलला येत आहेत. त्यांना मारून परत घालावें असें तुळसाबाई कोट्याच्या सैन्याला सांगत आहे. परतु आपणाला कोटेकर राण्याचा तसा हुकूम नाहीं असें ते सैनिक म्हणतात.

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखाक २४७ ]

९-२-१८१७ चें पत्र. मीरखानाने मल्हाररावाचा कबजा घेऊन तुळसाबाईला कारभारांतून अजिबात काढण्याचा कट केला केला आहे असा पक्का वहिम आहे. तथापि तीं दोघे वरकरणी एकमेकाविषयीं सशय बिलकूल दाखवित नाहींत बाळाराम शेट आणि मैनाबाई यांचे तुळसाबाईच्या प्रेरणेने खून पाडण्यांत आले (मैनाबाई ही मरहूम यशवतराव होळकराची एक बायको ) तसेंच बख्तर भाऊ (मैनाबाईचा भाऊ ) हरी होळकर ( यशवतरावाचा पुतण्या ) आणि महिपतराव चिटणीस यांचाहि तसाच निकाल लावण्यांत आला आहे.

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखाक ३०३ ]

८-४-१८१७ चें पत्र. मागच्या पत्रात तुळसाबाईनें बाळाराम वगैरेंचे खून केल्याचें वृत्त लिहिलें होतें, परतु तें खरें नाहीं. त्या लोकाना मारलें नाहीं, फक्त कैद करून ठेवण्यांत आलें आहे.

[ Poona Residency Corrsepondence Volume No. 14 लेखाक ३४८. ]

मे १८१७ — तुळसाबाईचे व गफूरखानाचे उघड वैर पडलें आहे. तुळसाबाईला काहीं प्रमुख मराठा सरदारांचा पाठिंबा आहे. रामजी शिर्के आणि रामदीन यांना होळकराचा चालू कारभार पसत नाहीं व ते होळकरास सोडून बाहेर पडून त्रिंबकजी डेंगळ्याला जाऊन मिळणार. रामदीन हा आपल्या बाराभाईसह लष्करांतून पळून गेल्याचें वृत्त आहे. ( बिनकवायती घोडदळाला बाराभाई अशी सज्ञा होती )

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखाक ३१९. ]

जून १८१७:— अबाजीपताचा काटा दूर झाल्यापासून गफूरखानाला कोणताच अटकाव राहिलेला नाहीं. तोच आता होळकरशाहींत सर्वाधिकारी बनला असून तो आतां काय उत्पात करील सागवत नाहीं बहुधा तुळसाबाईचाहि खून करवील. तुळसाबाईजवळ बळकट जमाव नाहीं. बहुतेक सैन्य गफूरखानाच्याच

हुकमतीखालीं आले आहे. आतां गफूरखान हा गादीचा धनी अल्पवई पोरगा आहे त्याला कबजांत घेण्याचा प्रयत्न करील, व कारभाऱ्यांना कैदेंत टाकील आणि त्यानंतर सारा कारभार मीरखानाच्या हवाली करील. तुळसाबाईनें मीरखानामार्फत गफूरखानास निरोपहि पाठविला आहे म्हणतात कीं, तुमचे कारस्थान मला सर्व कळलं आहे परतु मल्हारराव होळकर किंवा यशवतरावाचा पुतण्या हरि होळकर यांपैकीं कोणींहि तुमच्या हातीं जिवत लागतील ही आशा सोडून द्या ! तुळसाबाईनें महेश्वरास पळून जाण्याचा प्रयत्न केला परतु गफूरखानाचें सैन्य आडवें आल्यामुळें ती उत्तरेकडे कोटा सस्थानात आश्रयास गेली आहे परतु कोट्याचा सस्थानिक तर मीरखानाच्या मुठींतील तुळसाबाईचे चारित्र्य निर्मळ असते तर दौलतींतील प्रमुख लोकांनीं तिचा पक्ष पोटतिडकीनें उचलला असता परतु तिच्या अनाचारामुळें ते लोक तिच्यावर नाखूष होते.

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखांक ३२१. ]

६-११-१८१७ चें पत्र. मालकमसाहेबानें होळकराकडे पुढीलप्रमाणे अटी सागून पाठविल्या.— ( १ ) शिंद्याप्रमाणेंच तुम्ही पेढाऱ्यावर पाठविण्यासाठीं एक घोडेस्वारांची फौज द्यावी ( २ ) त्याचप्रमाणे एक किल्ला कपनीस द्यावा. ( ३ ) आणि पेशव्यास कसलीहि मदत देऊ नये परतु या अटी अमान्य होऊन शेवटीं इग्रज–होळकराची लढाईच झाली लढाईच्या आधीं गफूरखानाने होळकराचा दिवाण गणपतराव आणि तुळसाबाई याना कैद करून हिंगलाजगडास रवाना केले.

[ Poona Residency Correspondence Volume No 14 लेखांक ३४१. ]

पृष्ठ १८२ सन १२२१ कार्तिक शुद्ध ११ — २८–१०–१८११ या दप्तरींत सर्व सन ' फसली ' वापरले आहेत. तसेंच ' शक ' शालीवाहन न वापरतां विक्रमसवत् वापरला आहे नर्मदेच्या उत्तरेस विक्रम सवतच वापरतात.

**फसली सन** – " फसली सनास मृगासच आरभ होतो. शहाजहान बादशहानें दक्षणेंतील काही मुसलमानी राजास जिंकून तोडरमल्लाच्या जमाबदीची शिस्त सुरू केली, तेव्हा त्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत अकबराने सुरू केलेले फसली सालही दक्षिणेंत आले, व पुढें मराठ्यांनीं दक्षिणेत अम्मल स्थापन केल्यावर आपल्या कागदोपत्रींही याच सालाचा फार उपयोग करू लागले. एतद्देशीय सस्थानिक अद्यापहि फसली सालाप्रमाणेंच हिशेब वगैरे करितात. हें साल सुरू सनाहून ९ वर्षांनीं पुढें असतें. फसली सालांत मृगापूर्वी ५९१ व मृगानतर ५९० वर्षें मिळविलीं

म्हणजे इसवी सन निघतो. सुरू सन व फसली सन या दोहोंचेही मुसलमानी महिने व तारखा हिजरी सनाप्रमाणेंच असतात."

**विक्रम संवत्** — "विक्रम सवताचे व शालिवाहन शकाचे महिने व तिथि एकच असतात. विक्रम सवतांत १३५ वजा केले म्हणजे शालिवाहन आणि ५७ वजा केले म्हणजे इसवी सन येतात."

पृष्ठ १८४ **मासपक्ष फोडा भागून** — 'फोडा भोगून' असें पाहिजे. फोडा म्हणजे अडचण.

पृष्ठ १८४ **तुम्हास रोडगडावर शह देऊन** — "तुम्हास म्हसरोडगडावर शह देऊन" असें पाहिजे. म्हसरोडगडची मातेसरी (मातोश्री) देवी प्रसिद्ध आहे.

पृष्ठ १८६ **गंगरोडास बाया व महाराज किल्ले दाखल झाले** — १८ डिसेंबर १८१५ चें पत्र. "अल्पवई होळकराने ताबुताच्या मिरवणुकींत नेहमींप्रमाणें भाग घेतला परतु नतर होळकर कुटुंब गुप्तपणें पळून गेलें. नाहींतर स्वतःच्या सैन्याच्या कैदेत पडण्याचा त्याला हरघडी धोका निर्माण झालेला आहे. होळकर कुटुंब आतां भानपुऱ्यापासून १ मजलीच्या अतरावर असलेल्या गांग्रेळच्या किल्ल्यात आश्रयास गेले आहे. दुसरे दिवशीं त्याचे कारभारी दिवाण गणपतराव आणि बक्षी कृष्णोबा हेहि गाग्रेळास दाखल झाल. कृष्णोबा बक्षींची बायकामुलें मात्र शिलेदारांच्या ताव-डींत मागें अडकलीं आहेत. होळकर बायांनीं स्वतःच्या सरक्षणासाठीं जालीम-सिंगाचीं दोन पलटणें जवळ बाळगलीं आहेत.

[Poona Residency Correspondence Volume No 14 लेखांक २४६.]

पृष्ठ १९१ **तारोळा** — "पु. दे. प्रवृत्त कार्यास कांहीं प्राप्त होतें जें प्रतिबधक विघ्न तो तारोळा." अडचण, विघ्न [महाराष्ट्र भाषेचा कोश, परशरामपत गोडबोले वगैरेंनीं रचलेला. सन १८२९]

पृष्ठ १९३ **मासाहेब** — मल्हारराव (तिसरा) हा केसराबाई नावाच्या राखे-पासून झालेला यशवतराव होळकरांचा मुलगा. केसराबाई गरीब कुळांतली असताहि तिच्या सौंदर्यावर मोहित होऊन तिला यशवतरावानें आपल्यापाशीं ठेवलें होतें. केसरा-बाईलाच कृष्णामासाहेब म्हणत असत. तिच्या नावानें प्रसिद्ध असलेला केशरबाग व त्यांतील शिवमदिर हीं स्थळें तेजपूर गांवाला चिकटून आहेत केसराबाई १८४९ सालीं मृत्यु पावली. [मालव साहित्य, इदूर विशेषांक, दा. व दाडेकरांचा लेख.]

पृष्ठ १९५ **आधान सिद्ध करवून × × × पूर्वक सोम केला** — गळलेला शब्द 'पशुवध' असावा. सोमयागांत पशू बळी द्यावा लागतो.

---

# होळकर कैफियत

## परिशिष्ट नं. २ – व्यक्तिसूचि

ख



ग



च

## ज



## ट



## ठ



## ड



## त



## ध

## त्र



## द



## न



## प

## फ



## ब



## भ

### म



### य

र



ल



व

श



स



ह